श्री.

# जाहिरात.

आपल्या देशी भाषेच्या साहित्यांची अभिवृद्धी करण्याच्या सदुद्देशानें श्रीमंत सरकार महाराजा साहेब सर सयाजीराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहादूर, जी. सी. एस. आय्., ह्यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रक्कम अनामत ठेविली आहे तिच्या व्याजांतून "**श्री सयाजी साहित्यमाला**" म्हणून विविध विषयांवर पुस्तकें तयार करण्यांत येत असतात.

हें पुस्तक "**दीघनिकाय**"–भाग पहिला–पाली भाषेंतून भाषांतर केलेलें आहे, आणि तें प्रोफेसर चिं. वै. राजवाडे एम. ए., बी. एस सी., यांचेकडून वरील मालेंतील धर्मगुच्छांत पुष्प २३ वें म्हणून तयार करवून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

**A. B. Clarke**,
विद्याधिकारी,
बडोदें राज्य.

ज. पु. जोशीपुरा.
भा. आ.

बडोदें
ता. २५-६-१८

# श्री सयाजी साहित्यमाला.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | संस्कृत वाङ्मयाचा इतिहास ... | २—८—० | मराठी |
| २ | भूपृष्ठविचार ... ... | ०—१०—० | गुजराथी |
| ३ | आपणा लघुबन्धु अंग्रेज ... .... | १—०—० | ,, |
| ४ | अलकानो अद्भुत प्रवास .... ... | १—४—० | ,, |
| ५ | माबापनें बे बोल ( द्वितीयावृत्ति ) ... | ०—४—० <br> ०—६—० | ,, |
| ६ | हिंदुस्ताननना देवो ... ... | ४—०—० | ,, |
| ७ | नीतिशास्त्र ... ... | ०—१४—० <br> ०—१०—० | ,, |
| ८ | प्रेमानन्द ... ... | १—०—० <br> ०—१२—० | ,, |
| ९ | जमत्नो वार्तारूप इतिहास ( भाग पेहेलो ) | ३—८—० | ,, |
| १० | बालोद्यानपद्धतीचें गृहशिक्षण ... | ०—१०—० <br> ०—९—० | मराठी |
| ११ | देहधर्मविद्याना तत्त्वो ... ... | ,, | गुजराथी |
| १२ | विज्ञानप्रवेशिका ... ... | ०—११—० | ,, |
| १३ | जींदगीनो विमो ... ... | ,, | ,, |
| १४ | दयाराम ... ... | ,, | ,, |
| १५ | सुधारणा व प्रगति ... ... | ३—०—० | मराठी |
| १६ | वीर पुरुषो ... ... | (छापत आहे) | गुजराथी |
| १७ | उद्भिज्जविद्या ... ... | ,, | ,, |
| १८ | जीवविद्या ... ... | ,, | ,, |
| १९ | रोमनो इतिहास ... ... | ,, | ,, |
| २० | मिराबाई ... ... | ,, | ,, |
| २१ | शिस्त ... ... | ,, | मराठी |
| २२ | प्राणीविद्या ... ... | ,, | गुजराथी |

श्रीसयाजी साहित्यमाला-पुष्प २३ वें.

( धर्मगुच्छ )

# दीघनिकाय.

## मराठी भाषांतर.

## भाग पहिला.

प्रो० चिंतामण वैजनाथ राजवाडे, एम्. ए., बी. एस् सी.,
बडोदा कॉलेजमधील पाली भाषेचे अध्यापक.

बडोदें.

१९१८.

किंमत १॥ रुपया.



श्रीमंत महाराज

श्री सयाजीराव गायकवाड

जी. सी. एस. आय.

सेनाखासखेल समशेरबहाद्दर

यांस

अत्यंत कृतज्ञतेनें अर्पण केलें असे.



# प्रस्तावना.



सुमारें तीन वर्षांपूर्वी श्रीमंत महाराज श्री सयाजीराव गायकवाड यांनीं कांहीं पाली ग्रंथांचें मराठी भाषांतर करण्याची आज्ञा केली होती. तीस अनुसरून मीं दीघनिकाय या ग्रंथाचें भाषांतर करण्यास हातीं घेतलें. त्याचा पहिला भाग आज वाचकांपुढें येत आहे. सर्व ग्रंथ एकदम प्रसिद्ध करावा अशी माझी इच्छा होती, पण सांप्रतच्या महायुद्धामुळें सर्वत्र अडचण झाल्याकारणानें तूर्त पहिलाच भाग प्रसिद्ध करावा लागत आहे. सर्व ग्रंथ तीन भागांत संपूर्ण व्हावयाचा असून सरतेशेवटीं वाचकांच्या सोयीसाठीं विस्तृत सूची देण्याचा विचार आहे.

हें भाषांतर होतां होईल तों शब्दशः करण्याचा प्रयत्न केला आहे, पण मूळ ग्रंथांत पुनरुक्ति अतोनात असल्यामुळें ती बरीचशी गाळावी लागली आहे. पाली शब्दांस शक्य तेथें संस्कृत प्रतिशब्द दिले आहेत, ते संस्कृत भाषेच्या दृष्टीनें अगदीं बरोबर आहेत असें नाहीं. पण महायान पंथाच्या संस्कृत ग्रंथांतून अशा शब्दांचा उपयोग केलेला असल्यामुळें मींही ते तसेच ठेविले आहेत. विशिष्ट शब्द व विशेषनामें मात्र होतां होईल तों मूळ पालीच ठेविलीं आहेत.

आधुनिक चिकित्सक पद्धतीस अनुसरून त्रिपिटकांतील इतर ग्रंथांमधील भागांचें जेथें साम्य आढळलें त्या भागांचा निर्देश केला आहे, एवढेंच नव्हे तर संस्कृत वाङ्मयांतून व जैनांच्या अर्धमागधी भाषेंतील ग्रंथांतून देखील उतारे घेतले आहेत. कांहीं ठिकाणीं टीपा अतिशय दिल्या आहेत असें वाटेल, पण मूळ ग्रंथ नीट समजण्यास त्या जरूर आहेत असें वाटल्यावरून पाल्हाळाचा दोष पतकरून देखील मीं त्या दिल्या आहेत. शिवाय प्रत्येक सूत्रांतील विवरण वाचकांचे नीट ध्यानांत यावें म्हणून परिशिष्टांत मुख्य मुख्य मुद्यांचा विचार केला आहे. फार मोठ्या टीपा पानांचे खालीं न देतां स्वतंत्र जोडल्या आहेत. अशा तऱ्हेनें बौद्धधर्माचें अध्ययन करणारांस व विशेषतः पाली भाषेचे विद्यार्थ्यांस हें भाषांतर सर्वतोपरी उपयुक्त व्हावें असा मीं प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला आहे हें पाहणें सहृदय वाचकांकडे आहे.

श्रीमंत महाराजसाहेबांचे ठायीं वसत असलेलें सौजन्य, प्रजाकल्याणतत्परता, विद्यावृद्धीविषयीं कळकळ इत्यादि अमूल्य गुण व त्यांचे मराठी भाषेच्या अभिवृ-

द्ध्यर्थ चाललेले प्रयत्न महशूरच आहेत, आणि भगवान् बुद्धाच्या उपदेशांविषयीं त्यांस अत्यंत आदर व आवड आहे. मूळ पालीभाषेंतील भगवन्तांचे उपदेश मराठी वाचकांच्या पुढें फारसे आलेले नाहींत. ते या ग्रंथाच्या योगानें त्यांजपुढें मांडण्याची संधी दिल्याबद्दल मी महाराजसाहेबांचा फार ऋणी आहें.

माझे गुरु प्रो. धर्मानंद कोसंबी यांनीं तर मला बौद्धधर्माचें ज्ञान प्रथम करून देऊन भगवान् बुद्धाच्या उपदेशामृताचा आस्वाद घेण्यास शिकविलें व त्यापुढील माझें सर्व अध्ययन त्यांच्याच हाताखालीं झालें आहे. स्वतःचें अतिशय काम असतांही हें भाषांतर सर्व वाचून त्यांत महत्त्वाच्या दुरुस्त्या करून व पुष्कळ नवीन मजकूर घालून त्यांनीं मजवर उपकारांचें फार मोठें ओझें करून ठेविलें आहे. त्याची फेड केवळ आभारप्रदर्शनानें व्हावयाची नाहीं हें मी जाणून आहें, तरी लौकिक रीत्या मी येथें त्यांचे मजवरील उपकार नमूद करून ठेवितों. ग्रंथांतील दोषाबद्दल मात्र माझा मीच जबाबदार आहें.

त्याचप्रमाणें अनेक प्रकारांनीं मदत केल्याबद्दल बडोदा लायब्ऱ्यांचे क्युरेटर रा. कुडाळकर, संस्कृत सेक्शनचे लायब्रेरियन रा० दलाल, सेमिनारचे डिरेक्टर प्रो. विजरी, फर्ग्युसन कॉलेजमधील संस्कृतचे प्रोफेसर डॉ. गुणे, माझे सहाध्यायी रा. भागवत व रा. बापट, झेवियर व फर्ग्युसन या कॉलेजांतील पाली भाषेचे अध्यापक, व आर्यभूषण छापखान्याचे मॅनेजर यांचे आभार मानून मी हें भाषांतर वाचकांच्या हातीं देतों.

बडोदा कॉलेज,<br>ता. २० जून १९१८.

चिंतामण वैजनाथ राजवाडे.

# उपोद्घात.

बौद्धधर्माचा मूळ ग्रंथ म्हणजे त्रिपिटक ( तिपिटक ) होय[1]. याचे सुत्तपिटक, विनयपिटक व अभिधम्मपिटक असे तीन भेद आहेत. सुत्तपिटकांत भगवान् बुद्धांनीं निरनिराळ्या वेळीं केलेल्या उपदेशांचा संग्रह केला आहे. याचे पांच मोठे भाग केलेले आहेत. ते असे--

१ दीघनिकाय-मोठाल्या सूत्रांचा संग्रह.

२ मज्झिमनिकाय-मध्यम प्रमाणाच्या सूत्रांचा संग्रह.

३ संयुत्तनिकाय-लहान लहान सूत्रांचे संच करून त्यांचा केलेला संग्रह.

४ अंगुत्तरनिकाय-संख्येप्रमाणें सूत्रांची मांडणी करून त्यांचा केलेला संग्रह.

५ खुद्दकनिकाय-लहान सहान प्रकरणांचा संग्रह.

खुद्दकनिकायाचे पंधरा पोटविभाग आहेत. ते असे- १ खुद्दकपाठ, २ धम्मपद, ३ उदान, ४ इतिवुत्तक, ५ सुत्तनिपात, ६ विमानवत्थु, ७ पेतवत्थु, ८ थेरगाथा, ९ थेरीगाथा, १० जातक, ११ निद्देस, १२ पटिसंभिदामग्ग, १३ अपदान, १४ बुद्धवंस, १५ चरियापिटक.

विनयपिटकांत भिक्षु व भिक्षुणी यांच्या संघांच्या वागणुकीचे नियम दिलेले आहेत. याचे एकंदर पांच भाग आहेत. ते हे—

१ पाराजिक } =सुत्तविभंग. यांत भिक्षु व भिक्षुणी यांच्या संघांनीं पाळण्याचे
२ पाचित्तिय } नियम देऊन ते कोणत्या कारणानें रचिले गेले ते व त्यांवरील टीका हीं दिलीं आहेत.

३ महावग्ग } =खन्धक. यांत भिक्षुसंघ कसा अस्तित्वांत आला, चीवर,
४ चुल्लवग्ग } पिण्डपात, शयनासन व औषधोपचार यांविषयीं नियम कसे घातले गेले, भिक्षुणीसंघाची स्थापना कशी झाली, पहिल्या व दुसऱ्या संगीतींत काय काम झालें. इत्यादि माहिती दिलेली आहे.

५ परिवार. हें सिंहलद्वीपांतील कोणातरी भिक्षूनें रचिलेलें विनयपिटकाचें परिशिष्ट आहे.

---

१. बौद्धवाङ्मयाचा सविस्तर व विवेचनात्मक इतिहास Winternitz या जर्मन पंडितानें लिहिला आहे. Geschichte der Indischen Litteratur, Zweiter Band, Erste Hälfte, Die Buddhistische Litteratur, Leipzig. 1913.

अभिधम्मपिटकांत बौद्धधर्मांतील गहन तत्त्वज्ञानाविषयक प्रश्नांचा विचार केला आहे. त्यांत एकंदर सात प्रकरणें आहेत तीं अशीं— १ धम्मसंगाणि, २ विभंग, ३ धातुकथा, ४ पुग्गलपञ्ञत्ति, ५ कथावत्थु, ६ यमक, ७ पट्ठान.

हे ग्रंथ पालिभाषेंत लिहिलेले आहेत. या भाषेचें मूळ नांव मागधी होय. ही मगध देशांतील लोकांची बोलण्याची भाषा. या सर्व लोकांस सहज समजणाऱ्या भाषेंतच भगवान् बुद्धांनीं आपले उपदेश केले. ब्राह्मणधर्मांतील ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहिलेले होते. ती भाषा सामान्य जनांना समजण्यासारखी नव्हती, आणि भगवंतांचे उपदेश तर सामान्य जनांकरितां होते. लहानथोर घरांमध्यें जी व्यावहारिक भाषा वापरीत त्याच भाषेमध्यें त्यांस उपदेश करावयाचा असा भगवंतांचा कटाक्ष होता. मागधी भाषेमध्येंच सर्व हिंदुस्थानांत उपदेश केले जावे असेंही त्यांचें मत नव्हते, तर ज्या ठिकाणीं जी भाषा लोक व्यवहारांत वापरीत असतील त्या भाषेंत त्यांस उपदेश केला पाहिजे असें त्यांचें म्हणणें असे.[1]

मागधी भाषा ही प्राकृत भाषांपैकीं एक होय व त्याच भाषेंत बौद्धधर्माचे ग्रंथ लिहिलेले आहेत. या भाषेस साधारणतः पाली असें नांव आहे. पाली या शब्दाचा मूळ अर्थ 'ओळ' असा आहे, व त्याचा 'धर्मपुस्तकांतील ओळ' असा अर्थ केला जात असे. बुद्धघोषाचार्यांच्या अट्ठकथांतून मूळ धर्मग्रंथांचा निर्देश 'पालि' या शब्दानें केला आहे. या धर्मग्रंथांची जी भाषा तीसच पुढें पालिभाषा असें नांव पडलें.[2]

हे ग्रंथ भगवान् बुद्धांच्या कालापासून याच स्वरूपांत अस्तित्वांत आहेत असें मात्र नव्हे. भगवंतांनीं आपले उपदेश लिहून ठेविलेले नाहींत. त्यांनीं जे उपदेश केले ते भिक्षूंच्या स्मरणांत होते. त्यांवरूनच त्यांनीं त्यांचा सूत्ररूपानें संग्रह केला. अर्थातच या सर्व ग्रंथांचा काल एक नाहीं. त्यांत कांहीं भाग अगदीं जुने व कांहीं मागाहून आलेले आहेत हें अगदीं स्पष्ट दिसून येतें. त्यांचा क्रम Rhys Davids यांनीं पुढीलप्रमाणें लाविला आहे[3].

---

१. चुल्लवग्ग ५.३३.१ पहा. २. श्रीविधुशेखर शास्त्री, पालिप्रकाश, प्रवेशक १–१५, Windisch. Ueber den sprachlichen charakter des Pali. Winternitz. p. 10 note 3, Rhys Davids, Buddhist India 152-160, Oldenberg. 176-177, व प्रो. कोसंबी. विविधज्ञानविस्तार. वर्ष ४१ अंक ५ ( १९१० पृ. १३९ ) येथील 'पालिभाषेचा कालनिर्णय' हा लेख पहा. ३. Buddhist India p. 188. या क्रमामध्यें कांहीं दोष आहेत. सुत्तनिपात हा ग्रंथ निकायांच्या पूर्वीं रचिलेला आहे, कारण अंगुत्तर निकायांत त्यांतील उतारे घेतले आहेत. उदान, जातक व इतिवुत्तक हे ग्रंथहा जुने दिसतात. खरोखरी बुद्धवचनें त्रिपिटकरूपानें संग्रहित होण्यापूर्वीं 'नवंगसत्थुसासन' या स्वरूपांत असावीत. ( पृ. ४८ पहा. ) अभिधम्मपिटकांत धम्मसंगाणि हा पहिला असावा. कथावत्थु हा शेवटचा ग्रंथ असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. त्रिपिटक सिंहलद्वीपांत गेल्यावर देखील त्यांत भर टाकण्याचें काम चालू होतें. परिवार हा ग्रंथ तर सिंहलद्वीपांतील कोणी तरी भिक्षूनेंच रचिला आहे.

१ सर्व ग्रंथांतून ठराविक शब्दांमध्यें आढळून येणारीं बौद्धधर्माचीं मूलतत्त्वें.
२ दोन किंवा अधिक ग्रंथांतून ठराविक शब्दांत वर्णिलेले प्रसंग.
३ शीलें, पारायणवग्ग व अट्ठकवग्ग हे सुत्तनिपाताचे दोन भाग व पातिमोक्ख.
४ दीघ, मज्झिम, अंगुत्तर व संयुत्त निकाय.
५ सुत्तनिपात, थेरगाथा, थेरीगाथा, उदान व खुद्दकपाठ.
६ सुत्तविभंग व खन्धक.
७ जातक व धम्मपद.
८ निद्देस, इतिवुत्तक व पटिसंभिदामग्ग.
९ पेतवत्थु, विमानवत्थु, अपदान, चरियापिटक व बुद्धवंस.
१० अभिधम्मपिटक. ( त्यांत पुग्गलपञ्ञत्ति हा पहिला व कथावत्थु शेवटीं रचिलेला ).

हा क्रम साधारणतः बरोबर आहे असें मानून चालण्यास हरकत नाहीं. कथावत्थु हा ग्रंथ तर अशोक राजाच्या वेळीं भरलेल्या संगीतींत मोग्गलिपुत्त तिस्स या स्थविरानें रचिल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. अशोक राजाची कारकीर्द इ. स. पूर्वी २७३ ते २३२ पर्यंत झाली. तेव्हां भगवंतांच्या परिनिर्वाणापासून तो अशोकराजाच्या कारकीर्दीपर्यंत म्हणजे इसवी सनापूर्वी पांचव्या शतकापासून तों तिसऱ्या शतकापर्यंत हिंदुस्थानांत पाली ग्रंथांचा संग्रह करण्याचें काम चाललें होतें असें दिसतें. अशोक राजानें बौद्धधर्माचा प्रसार करण्याकरितां निरनिराळ्या स्थविरांना काश्मीर, गांधार, अपरन्तक, यवन, हिमालय, ब्रह्मदेश, सिंहलद्वीप, इत्यादि प्रदेशांत पाठविलें होतें. त्यांत सिंहलद्वीपास खुद्द त्याचा पुत्र महामहिन्द व कन्या संघमित्ता हीं गेलीं होतीं. त्यांनीं तेथें बौद्धधर्माची स्थापना केली. त्यावेळीं त्रिपिटक ग्रंथही सिंहलद्वीपांत गेला. त्यानंतर त्यांत खात्रीपूर्वक अशी परिवार या ग्रंथांचीच भर टाकिलेली दिसते. बाकी बहुतेक त्रिपिटक ग्रंथ तेथील स्थविरांनीं जशाचा तसा राखिला असावा. यावरून इसवी सनापूर्वीच्या पहिल्या शतकांत हा ग्रंथ हल्लीं दिसणाऱ्या स्थितींत संपूर्ण झाला असें म्हणावयास हरकत नाहीं.

---

१. प्रो. कोसंबी, बुद्ध, धर्म आणि संघ ८७-८९, Winternitz 6-7. त्रिपिटकाच्या कालाविषयीं सविस्तर विवेचन Rhys Davids यांनीं Dialogues. I Preface. यांत केलें आहे तें पहा. Buddhist India. ch IX., S. B. E. XI. pp. xiii–xxiii Windisch, Ueber den sprachlichen charakter des Pâli p. 37 ही पहा. महावंसादिक ( ३३-१०५ ) सिंहलद्वीपच्या इतिहासावरून असें दिसतें कीं, वट्टगामणि राजाच्या कारकीर्दींत (इ. स. पूर्वी ८९-७७) त्रिपिटक ग्रंथ लिहून ठेविण्यांत आला.

आतां यांतील फक्त चार निकायांकडे नजर दिल्यास असें दिसून येईल कीं, त्यांतील दीघ व मज्झिम हे निकाय पहिल्यानें संग्रहित केले असावेत. संयुत्त-निकायांतील सूत्रें त्यांतील विषयावरून त्यांचे वर्ग करून संग्रहित केलेलीं आहेत व अंगुत्तरनिकाय तर सूत्रांतील विषयांच्या संख्येनुरूप त्यांचे विभाग करून बनविलेला ग्रंथ आहे. या त्यांच्या स्वरूपावरूनच ते दीघ व मज्झिम यांच्या नंतरचे आहेत हें सिद्ध होतें. शिवाय त्यांमध्यें दीघ व मज्झिम यांतील सूत्रांचा उघड उल्लेख सांपडतो.

दीघ व मज्झिम यांमध्यें आधीचा कोणता व मागाहूनचा कोणता हें ठरवितां येणें शक्य नाहीं. दोन्ही समकालीनच आहेत. हे दोन्हीही एकंदर त्रिपिटका-प्रमाणेंच ग्रंथ असे नसून तुटक सूत्रांचे संग्रह आहेत. यांत कांहीं सूत्रें आधींचीं व कांहीं नंतरचीं असा मात्र भेद दृष्टोत्पत्तीस येतो. दीघापेक्षां मज्झिमांतील सूत्रें लहान प्रमाणाचीं आहेत, त्यांतील प्रत्येकांत एकेकाच विषयाचें संपूर्ण विवेचन केलें आहे व त्यांतील बहुतेक भगवान् बुद्धांनीं एकेका वेळीं उपदेशिलीं असण्याचा पुष्कळ संभव वाटतो. त्याच्या उलट दीघांतील सूत्रें फार लांबलचक असून त्यांतील कांहींत निरनिराळे तुटक भाग एके ठिकाणीं जोडलेले आढळून येतात. त्यांतील पहिला भाग सीलक्खंध यांतील घेतलें तर कित्येक ठिकाणीं ओढून ताणून तेथें आणून बसविलेलीं दिसतात. महापदानसुत्तांतील बोधिसत्वाच्या जन्माच्या वेळचे चमत्कार हा भाग मज्झिमनिकायांतील अच्छरिय-अब्भुतधम्मसुत्तांत सांपडतो व तो तेथूनच घेतला असावा. महासतिपट्ठानसुत्त हें तर उघड उघड मज्झिमांतील सतिपट्ठानसुत्ताची वाढविलेली आवृत्ती आहे[१].

दीघनिकायांतील सूत्रांमध्येंही हा कालाचा फरक दिसून येतो. सुभसुत्त, महापरिनिब्बाणसुत्त (यांतील कांहीं प्रसंग) व पासादिसुत्त यांतील प्रसंग भगवंतांच्या परिनिर्वाणानंतर घडलेले आहेत. महापरिनिब्बाणसुत्तांत तर निरनिराळ्या वेळीं बरेचसे प्रसंग संग्रहित केले असल्याचा पुष्कळ संभव आहे.

१. Dr. Neumann हे दीघनिकाय हा मागाहून रचिलेला संग्रह आहे (in ganzen verhältnismässig späte und oft apokryphe sammlung) असें म्हणतात (Reden Gotamo Buddho's des Suttanipáto IV p. X). पण हे विशेषतः शेवटच्या दोन सुत्तांसंबंधींच खरें असण्याचा संभव आहे. Winternitz p. 33 n. 2 पहा. विनयपिटक व सुत्तपिटक यांतील आधी कोणतें व नंतर कोणतें रचिलें असावें याविषयींही वाद आहे. Winternitz p. 17 n. ३ पहा.

पासादिकसुत्त व संगीतिसुत्त यांत निगण्ठ नातपुत्त उर्फ महावीर याच्या मरणाचा उल्लेख आलेला आहे. तो इ. स. पूर्वी ४८४ या वर्षाच्या सुमारास मरण पावला असावा. भगवंतांचें परिनिर्वाण इ. स. पूर्वी ४८० या वर्षी झालें असें मानिलें तर हीं दोन सुत्तें भगवंतांच्या अगदीं शेवटच्या कालासंबंधीं आहेत असें दिसून येईल. सामञ्ञफलसुत्तांतील प्रसंग बिंबिसारराजाच्या मरणानंतर अर्थात् भगवंतांच्या परिनिर्वाणापूर्वीच्या सात वर्षांत केव्हांतरी घडला असला पाहिजे. महालिसुत्तांतील प्रसंग जालियसुत्तांतील प्रसंगानंतर घडला आहे व कस्सपसीहनादसुत्तामध्यें उदुंबरिकसीहनादसुत्तांत घडलेल्या प्रसंगाचा उल्लेख केला आहे. या संक्षिप्त विवेचनावरून हीं सूत्रें मूळचीं अगदीं स्वतंत्र असून पुढें त्यांचे संग्रह केले गेले व त्यांमध्यें मागाहून कांहीं अनवश्यक भाग घुसडले गेले हें स्पष्ट दिसून येईल.

हीं सूत्रें केवळ वरवर चाळून पाहिलीं तरी त्यांतील प्रवचनपद्धती कांहीं निराळ्या प्रकारची आहे हें सहज नजरेस येतें. प्रत्येक सूत्रांत जरी साधारणतः एक विषय घेऊन त्याचें विवेचन केलेलें असतें, तरी तें करण्याची तऱ्हा आपल्या हल्लींच्या तऱ्हेहून अगदीं वेगळी आहे. या फरकाचें मुख्य कारण बदललेल्या परिस्थितींत आहे. अत्यंत कंटाळवाणी पुनरुक्ति या सूत्रांतून जागोजागीं आढळते व कांहीं ठिकाणीं तिचा इतका अतिरेक झालेला आढळून येतो कीं, ती वाचणें अतिशय त्रासदायक होतें. कित्येक वेळां कलमेंच्या कलमें तोच तोच मजकूर त्यांतील फक्त एखादाच शब्द बदलून आलेला असतो. ही पुनरुक्ति टाळण्याकरितां मूळ पोथ्यांतून पेय्यालं ( पे अथवा ल ) यांचा उपयोग केलेला असतो. ही सर्व पुनरुक्ति गाळून नवीन पद्धतीनें जर त्रिपिटक लिहिलें तर त्याचा विस्तार कितीतरी कमी होईल[२].

दुसरा विशेष म्हटला म्हणजे विषयांचे संख्यात्मक समूह होत. सहज विवेचनांत देखील तीन शास्ते, धरणीकंपाचे आठ हेतु, भगवंतांची आठ प्रकारची

१. पण हें अनुमान बरेंच धोक्याचें आहे, कारण नातपुत्ताच्या मरणाविषयीं या दोन सूत्रांखेरीज मज्झिमनिकायांतील सामगामसुत्त ( नं. १०४ ) यांतही उल्लेख आहे. हे तिन्ही उपदेश एकाच प्रसंगावरून केले नसावेत. संग्रह करितांना स्थविरांनीं उपदेशांना आपल्या स्मरणशक्तीप्रमाणें प्रसंग जोडून दिले. म्हणून त्याच प्रसंगावर अमुक सूत्राचा पाया आहे असें खात्रीलायक म्हणतां येत नाहीं. २ ही पुनरुक्ती गाळण्याचा मी बराच प्रयत्न केला आहे. फक्त तिचें स्वरूप वाचकांच्या नजरेस यावें म्हणून ब्रह्मजालसुत्तांत तेवढी पहिल्यानें ती ठेविली आहे. Windisch, Ueber den sprachlichen charakter des Pâli. p. 36 पहा.

स्तुती इत्यादि प्रकार आढळतात. पंच नीवरणें, आठ विमोक्ष, चार ध्यानें चार आरुप्यें इत्यादि समूहांहून हे वेगळ्या तऱ्हेचे आहेत. हे दुसरे समूह धर्माचीं तत्त्वें तरी आहेत, पण साध्या गोष्टी सुद्धां या सूत्रांतून संख्येशिवाय येत नाहींत.

या दोन्हीही विशेषांचें कारण उघड आहे. भगवान् बुद्धांनीं जे उपदेश केले ते त्या त्या प्रसंगास अनुसरून तोंडीं केले. त्यावेळीं ते लिहून ठेविण्याची चाल नव्हती. यामुळें ते ध्यानांत ठेविण्यास सोपे जावे म्हणून प्रवचनाची पद्धतीही त्याचप्रमाणें ठेविणें जरूर होतें. बहुतेक भाग जसेचे तसे राहून एखाद्याच शब्दाचा फरक असला म्हणजे तें प्रवचन पुन्हा जसेंच्या तसें उच्चारणें कठीण नसतें. त्याचप्रमाणें प्रवचनांतील मुख्य मुख्य गोष्टी संख्येनें बद्ध असल्या म्हणजे त्या ध्यानांत ठेविण्यास त्रास पडत नाहीं ही साध्या अनुभवाची गोष्ट आहे. यावरून या विशेषांचें मूळ हीं सूत्रें तोंडानें उपदेशिलीं—लिहून ठेविलीं नाहींत—यांत आहे असें दिसून येईल.[१]

भगवान् बुद्धांनीं उपमांचा उपयोग सूत्रांतून जागोजागीं केला आहे, तो आपलीं प्रवचनें सामान्य जनांस समजण्यास सोपें जावें म्हणून होय. उपमेनें कांहींही सिद्ध होत नाहीं, उपमा हें कांहीं प्रमाण नव्हे, परंतु एखादी गोष्ट लोकांच्या मनावर ठसविण्यास तिचा फार उपयोग होतो. हजारों प्रमाणांनीं होणार नाहीं इतका परिणाम एका सुंदर व चित्ताकर्षक उपमेनें होतो हें भगवान् ओळखून होते व म्हणून आपले उपदेश मनोरंजक व सहज पटण्याजोगे करण्याकरितां उपमा या शस्त्राचा अवलंब त्यांनीं केला.

या उपमा नेहमीं अगदीं साध्या व्यवहारांतील असतात, व केव्हां केव्हां त्यांत एक प्रकारचा विनोद भरलेला असतो. या वाढतां वाढतां कोठें कोठें गोष्टींच्या स्वरूपांत आढळतात. महाविजित राजाचा यज्ञ, महासुदस्सनाची गोष्ट, दव्हनेमि राजाची गोष्ट, इत्यादि गोष्टी म्हणजे तत्त्वांच्या समर्थनार्थ आणिलेल्या मोठमोठ्या उपमाच होत. या खऱ्या आहेत असें भासविण्याचा मुळीं देखील हेतु नसतो. हें अग्गञ्ञसुत्तांत अगदीं उघड दिसतें. त्यांत सांगितल्याप्रमाणें

---

१. Oldenberg ( Buddha p. 182 ) यांनीं म्हटलें आहे कीं, बुद्धाच्या वेळीं मनुष्यांस लहान पण शक्तिमान शब्द 'आणि' हा माहीतच नव्हता; कीं, काय कोण जाणे ! त्यावर Winternitz (p. 52) म्हणतात कीं, एवढेंच नव्हें तर आणखी सर्वनामें देखील जणूं काय, त्यास माहीत नव्हतीं ! हा अर्थातच निव्वळ विनोद आहे. Rhys Davids. Dialogues I. p. xxi पहा. २. Oldenberg 176–195, Winternitz. 52–59 पहा.

जगदुत्पत्ति झाली असें भगवंतांचें स्वतःचें मत होतें असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. वस्तुस्थिति तशी नव्हतीच. प्रतिपक्षाचीं मतें किती चुकीचीं व हास्यास्पद आहेत हें दाखविण्याच्या उद्देशानेंच अशा तऱ्हेच्या गोष्टी सांगितल्या असल्या पाहिजेत.

या सूत्रांस ‘ संवाद ’ ( Dialogues ) असें Rhys Davids यांनीं नांव दिलें आहे तें समर्पक नाहीं. यांतील बरेचसे संवाद नाहींतच. त्यांत फक्त बुद्धांनीं केलेले उपदेश आहेत. कांहीं मात्र संवादात्मक आहेत. पण त्यांत देखील भगवंतांचेंच प्रामुख्य दिसून येतें. बाकीचे सर्व निमूटपणें ऐकून माना डोलविणारे व विचारल्या प्रश्नाचें उत्तर देणारे असतात. त्यामुळें त्या संवादास एकांगीपणा येतो. ही साधारण सूत्रांची तऱ्हा आहे. परंतु कांहीं ठिकाणच्या संवादांत जिवंतपणा दिसून येतो, व तेथें प्रतिपक्षाचीं जोरदार वाटणारीं विधानें व तीं खोडून काढण्यांत भगवंतांचें दिसून येणारें चातुर्य यांचा मिलाफ दिसून येतो. [२]

असा जेथें खरा वाद्विवादाचा मासला दिसतो, त्याठिकाणीं भगवान् बुद्धांच्या उपदेश करण्याच्या पद्धतींतील खरें मर्म लक्षांत येतें. सर्व साधारण उपदेशाची तऱ्हा म्हणजे प्रसंगास साजेल असा विषय घेऊन तो अगदीं कमी बुद्धीच्या मनुष्याला देखील सहज समजेल इतक्या सोप्या रितीनें व उपमा, गोष्टी वगैरे मधून मधून सांगून मनोरंजक होईल अशा प्रकारें विवरण करावयाचा, परंतु जेथें प्रतिपक्षीय कांहीं ठाम मतें घेऊन वाद्विवादास आला असेल त्या ठिकाणीं भगवंतांची पद्धत अशी असे कीं, पहिल्यानें प्रतिपक्षाचें म्हणणें कबूल करावयाचें व नंतर त्याला सोपे सोपे प्रश्न करून हळूं हळूं त्याला आपल्या पूर्वीच्या म्हणण्यापासून दूर नेत नेत शेवटीं आपला मूर्खपणा कबूल करावयाला लावावयाचा. अशा रितीनें त्याचें मन तयार झालें म्हणजे मग त्यास आपली स्वतःची ( सामुक्कंसिका ) धर्मदेशना सांगून धर्मचक्षु प्राप्त करून द्यावयाचा.

---

१. विनयपिटकांतही हाच प्रकार आढळून येतो. एखाद्यानें कांहीं तरी चुकीचें वर्तन करावयाचें, तें भिक्षूंनीं भगवंतांस जाऊन सांगावयाचें, मग त्यांनीं त्यास बोलावून आणून ‘ तूं असें केलेंत काय ? ’ म्हणून विचारावयाचें, त्यानें तावडतोब आपला अपराध कबूल करावयाचा व बुद्धांनीं नंतर ‘ असें करूं नयें ’ म्हणून नियम घालून द्यावयाचा. हा जिकडे तिकडे प्रकार व याचीच सर्व ठिकाणीं पुनरावृत्ति।

२. उदाहरणार्थ सोणदण्डसुत्त, तेविज्जसुत्त व पाटिकसुत्त पहा. ३. पृ. १५१ पहा. ‘ Sie geben uns zum mindesten eine ebenso gute Vorstellung von der Lehrweise des Buddha, wie die Platonischen Dialoge von der des Sokrates. ’ Winternitz. p. 54.

एकंदरींत या सूत्रांत आपणास इसवी सनापूर्वीच्या पांचव्या व सहाव्या शतकांतील उत्तर हिंदुस्थानांतील लोकांच्या जीवनाचें चित्र पहावयास मिळतें. यांतील बहुतेक ऐतिहासिक दृष्ट्या सत्याचेंच आविष्करण करणारीं आहेत यांत शंका नाहीं. नुसत्या धार्मिक गोष्टीच नव्हेत तर साध्या व्यवहारांतील प्रसंगही येथें वर्णिलेले आहेत. निरनिराळ्या धर्मपंथांतील भांडणें, त्यांचीं वेगवेगळीं मतें, एकमेकांशीं झालेले वादविवाद, सामान्य लोकांचीं मतें, कामधंदे, देशाची राजकीय व सामाजिक स्थिति इत्यादि गोष्टींचें यथायोग्य चित्र येथल्याइतकें स्पष्ट दुसऱ्या कोठेंही दृष्टीस पडत नाहीं. इतकें या सूत्रांचें ऐतिहासिक दृष्ट्या महत्व आहे.

या त्रिपिटक ग्रंथावर मूळ सिंहली भाषेंत टीका लिहिल्या होत्या. त्यांना अट्ठकथा ( अर्थकथा ) असें म्हणत. इ. स. च्या पांचव्या शतकाच्या आरंभीं बुद्धघोष नांवाच्या आचार्यांनीं त्यांचें पालिभाषेंत रूपांतर केलें [3]. या आचा-

१. यांजबरोबरच जैनांच्या धर्मग्रंथांचाही निर्देश केला पाहिजे. त्यांची तऱ्हाही अशीच आहे. सर्व ग्रंथांतून अतोनात पुनरुक्ती आहे. पण त्यांतूनही अनेक ऐतिहासिकदृष्ट्या उपयुक्त व चित्ताकर्षक प्रसंग भरलेले आहेत. या दोन्हीं धर्मांतील ग्रंथांची योग्य चिकित्सा करून बौद्ध व जैन धर्मांच्या उदयाच्या सुमाराचा उत्तर हिंदुस्थानचा इतिहास लिहिण्याची फार जरूरी आहे. बौद्ध धर्मापुरतें हें काम Rhys Davids यांच्या Buddhist India या पुस्तकानें पार पाडिलें आहे. २. Winternitz. 152-153; ERE ii. 885 पहा. ३. या अट्ठकथा पुढीलप्रमाणें:– दीघ–सुमंगलविलासिनी, मज्झिम–पपंचसूदनी, संयुत्त-सारत्थप्पकासिनी, अंगुत्तर–मनोरथपूरणी, विनय-समन्तपासादिका, धम्मसंगणि–अट्ठसालिनी, विभंग-संमोहविनोदनी, धातुकथा, पुग्गलपञ्ञत्ति, कथावत्थु, यमक व पट्ठान–पंचप्पकरणट्ठकथा. बुद्ध, धर्म आणि संघ पृ० १०८–११० पहा.

सुमंगलविलासिनीच्या आरंभीं पुढील उल्लेख आहे.

सीहळदीपं पन आभताऽथ वसिना महामहिन्देन
ठपिता सीहळभासाय दीपवासीनमत्थाय ।
अपनेत्वान ततोऽहं सीहळभासं मनोरमं भासं
तन्तिनयानुच्छविकं आरोपेन्तो विगतदोसं ।
समयं अविलोमेन्तो थेरानं थेरवंसदीपानं
सुनिपुणविनिच्छयानं महाविहाराधिवासीनं ।
हित्वा पुनप्पुनागतमत्थं अत्थं पकासयिस्सामि
सुजनस्स च तुट्ठत्थं चिरट्ठितत्थं च धम्मस्स ।

[ पुढें चालू.

यांची हकिकत महावंस व बुद्धघोसुप्पत्ति या ग्रंथांतून दिली आहे, परंतु ती फारशी विश्वसनीय नाहीं. त्याविषयीं प्रो. कोसंबी यांनीं फर्ग्युसन कॉलेज मॅगेझिनच्या सप्टेंबर १९१३ च्या अंकांत ( पृ. ९७–१०४ ) सविस्तर विवेचन केलें आहे, त्याचें सार त्यांच्याच शब्दांत पुढीलप्रमाणें आहे. "सारांश, बुद्धघोषाचार्य दाक्षिण हिंदुस्थानांत क्षात्रिय किंवा वैश्य कुलामध्यें जन्मले असावे. त्या कालच्या वहिवाटीप्रमाणें लहानपणींच संन्यासदीक्षा धारण करून बौद्धधर्माचा त्यांनीं अभ्यास केला असावा. पुढें सिंहलद्वीपांतील बौद्धपंडितांची ख्याति ऐकून ते त्या द्वीपास गेले असावे. तेथें त्या वेळीं अभयगिरी व महाविहार असे दोन प्रसिद्ध बौद्धपंथ होते. पैकीं बुद्धघोषाचार्यांनीं महाविहारवासी भिक्षूंचा पंथ स्वीकारिला व सिंहलभाषेंमध्यें नैपुण्य संपादून महाविहारांत असलेल्या सर्व अट्ठकथांचें अध्ययन केलें. अध्ययन पुरें झाल्यावर त्यांनीं चारी निकायांच्या अट्ठकथा लिहिण्याचा संकल्प केला. परंतु त्यांतलि पुनरुक्ति गाळण्यासाठीं व तरुण भिक्षूंच्या उपयोगासाठीं विसुद्धिमग्ग हा ग्रंथ त्यांनीं प्रथमत: लिहिला आणि नंतर चारही अट्ठकथा लिहिल्या. अंगुत्तरनिकायाच्या अट्ठकथेनें त्यांचा मनोरथ पूर्ण झाला म्हणून त्या अट्ठकथेचें त्यांनीं मनोरथपूरणी हें नांव ठेविलें. त्या ग्रंथांनीं त्यांची सिंहलद्वीपांत अतिशय प्रसिद्धी झाल्यामुळें ब्रह्मदेशांतील धम्मपाल (थिन–लि–ग्यांग ) राजानें त्यांस आमंत्रण केल्यावरून ते थातोन येथें जाऊन कैलास नांवाच्या विहारामध्यें राहिले असावे व तेथेंच त्यांचा अंत झाला असावा."

---

.................................

इति पन सब्बं यस्मा विसुद्धिमग्गे मया सुपरिसुद्धं
वुत्तं तस्मा भिय्यो न तं इध विचारयिस्सामि ।

शेवटीं पुढील गाथा आहेत.

आयाचितो सुमंगलपरिवेणनिवासिना थिरगुणेन
दाठानागसंघत्थेरेन थेरवंसन्वयेन ।
दीघागमवरस्स दसबलगुणगणपरिदीपनस्स अट्ठकथं
यं आरभिं सुमंगलविलासिनिं नाम नामेन ।
सा हि महाट्ठकथाय सारमादाय निट्ठिता
एसा एकासीतिपमाणाय पाळिया भाणवारेहि ।

.................................

मूलकट्ठकथासारमादाय मया इमं करोन्तेन
यं पुञ्ञमुपचितं तेन होतु सब्बो सुखी लोको ।

सरतेशेवटीं 'बुद्धघोसोऽति गरूहि गहितनामधेय्येन थेरेन कता' असे शब्द आहेत.

या अट्ठकथा मूळाचा अर्थ समजण्यास अत्यंत उपयोगी आहेत. कांहीं कांहीं ठिकाणीं तर त्यांच्या मदतीवांचून अर्थ कळणेंच शक्य नाहीं. परंतु त्रिपिटक व अट्ठकथा यांमध्यें कालाचें अंतर बरेंच असल्याकारणानें त्यांतही पुष्कळ गोष्टींचा उलगडा केलेला नाहीं. मूळ परंपरा सुटत चालली असल्यामुळें बुद्धघोषाचार्यांनाही कांहीं शब्दांचा अर्थ लाविण्याची मोठी पंचाईत पडते. अशा ठिकाणीं ते बहुधा एकाच शब्दाचे निरनिराळे अर्थ देतात. परंतु साधारणतः त्यांनीं दिलेले अर्थ सरळ व स्पष्ट असतात.

सुमंगलविलासिनी या दीघनिकायाच्या अट्ठकथेवर लीनत्थवण्णना नांवाची टीका आहे. तिच्या कर्त्याचें नांव शेवटीं धम्मपाल असें दिलें आहे. परंतु हा कोण व याचा काल कोणता यासंबंधीं कांहींच पत्ता लागत नाहीं. परमत्थदीपनी वगैरे टीकांचा कर्ता धम्मपाल व हा धम्मपाल हे एकच असल्यास त्याचा काल इसवी सनाच्या सहाव्या शतकांत पडतो.[1] हें खरें असल्यास हा बुद्धघोषाचार्यांच्या मागाहून लवकरच झाला असें दिसतें. याला ब्राह्मणांच्या ग्रंथांचें बरेंच ज्ञान असावेंसें वाटतें. बुद्धघोषाचार्यांनीं ब्राह्मणांचे आचारविचार देतांना कांहीं ठिकाणीं आवश्यक असतां विवरण केलेलें नाहीं. अशा ठिकाणीं धम्मपालानें बरीच माहिती दिली आहे व ती बरोबर[2] आहे. पण तो मूळ ग्रंथांतील भागांचें मुळींच स्पष्टीकरण करीत नाहीं. अट्ठकथेंतील शब्दांवरच केवळ त्याची टीका आहे. अट्ठकथेंत ज्यांचें विवरण नाहीं अशा मुद्यांवर त्याच्या टीकेनें कांहींच प्रकाश पडत नाहीं. म्हणून अट्ठकथेचा अर्थ बरोबर समजण्यास ही टीका कितीही उपयुक्त असली तरी मूळ दीघनिकायाचा अर्थ लाविण्यास तिची फारशी मदत होत नाहीं.

---

१. ERE. iv 701 पहा.

२. उदाहरणार्थ पृ० ४२ वरील टीप पहा. त्यावरून त्यास निरनिराळ्या दर्शनांची बरीच माहिती असावेंसें दिसतें. पृ० २०८–९ यावरील टीपांत त्यानें उपनिषदांस आधार दिला आहे. तेविज्जसुत्तावरील विवरणांत त्यानें यास्काचार्यांचें निरुक्त वाचलें होतें हें स्पष्ट दिसून येतें.

# अनुक्रमाणिका.



# दीघनिकाय.

## १ ब्रह्मजालसुत्त.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके समयीं भगवान् [ बुद्ध ] पांचशें

---

१. भगवान् बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर महाकस्सपाच्या अध्यक्षतेखालीं जी प्रथम संगीति भरली होती, तींत सर्व त्रिपिटक उपालि व आनंद यांजकडून म्हणवून घेतलें होतें. त्यापैकीं सुत्तपिटक भगवान् बुद्धाचा पट्टशिष्य आनंद याच्या वांट्यास आलें होतें. त्याचे हे शब्द होत असें बुद्धघोषाचार्यांचें म्हणणें आहे. [ या संगीतीची हकिकत सुमंगलविलासिनी व समन्तपासादिका या बुद्धघोषाचार्यांच्या अट्ठकथांच्या आरंभीं व चुल्लवग्ग भाग ११ यांत दिली आहे. ]

हें कांहीं फार जुन्या सूत्रांसंबंधीं खरें असेल. परंतु कांहीं सूत्रें भगवंताच्या नंतर बऱ्याच कालानें रचिलीं गेलीं असल्यामुळें तेथें असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. कोठें कोठें तर उघडउघड विरोध दिसून येतो. उदाहरणार्थ याच पुस्तकांतील सुभसुत्त ( दीघ १० ) पहा. तेथें ' असें मी ऐकिलें आहे ' या शब्दांच्या पुढें आयुष्मान् आनंद श्रावस्तीनगरींत रहात होता असें विधान आलें आहे. त्या ठिकाणीं आनंदानें तें ऐकिलें असें असणेंच शक्य नाहीं. असा विरोध असण्याचें कारण उघड आहे. भगवान् बुद्धांच्या नंतर बराच काल हीं सूत्रें रचिण्याचें काम चाललें होतें असें दिसतें. भगवंताच्या उपदेशांपैकीं एखादा ज्या कोणाच्या लक्षांत राहिला असेल, त्यानें ता सूत्ररूपानें सांगावा असें चालत असे. अर्थातच ते सर्व भगवंताच्या मूळ उपदेशाबरहुकूमच असत असें नाहीं. [ महापरिनिब्बाणसुत्तांत ( दीघ १६.४. ७–११.) चार महापदेस सांगितले आहेत. तेथें सुद्धां म्हटलें आहे कीं जर काणी भिक्षू ' मी अमुकअमुक भगवंताच्या तोंडून ऐकिलें आहे ' असें सांगेल, तर त्याचें तें विधान एकदम खरें न मानितां सूत्र व विनय यांमध्यें तें आहे कीं नाहीं हें पहावें. नसेल तर तें खोटें म्हणून सोडून द्यावें. असेल तर तसें तें ग्रहण करावें. ] हे सर्व उपदेश एका साच्यांत घालण्याकरितां ' एवं मे सुतं ' या शब्दांनीं सुरुवात करण्याची पद्धती पडली व हे शब्द असल्याशिवाय सूत्रास सुरुवातच होईनाशी झाली. अशा रीतीनें वाटेल तेथें या शब्दांची योजना होऊं लागल्यामुळें कांहीं ठिकाणीं वरच्यासारखे घोटाळे होऊं लागले.

भिक्षूंच्या मोठ्या समुदायासह राजगृह व नालंदा यांच्या दरम्यान रस्त्यानें चालले होते. त्याचप्रमाणें सुप्पिय परिव्राजकही त्याच रस्त्यानें ब्रह्मदत्त नांवाच्या आपल्या शिष्याला घेऊन चालला होता. तेथें सुप्पिय परिव्राजक अनेक प्रकारांनीं बुद्ध, धर्म व संघ यांची नालस्ती करीत चालला होता. परंतु त्याचा शिष्य ब्रह्मदत्त हा अनेक प्रकारांनीं बुद्ध, धर्म व संघ यांची स्तुती करीत होता. अशा रीतीनें एकमेकांच्या अगदीं उलट बोलत ते गुरुशिष्य भगवान् व भिक्षुसंघ यांच्या पाठीमागून चालले होते.

२ याप्रकारें मार्ग आक्रमण करून भगवान् भिक्षुसंघासह अंबलट्ठिका नांवाच्या उद्यानांतील राजाच्या बंगल्यांत एक रात्र वास करण्याकरितां उतरले. सुप्पिय परिव्राजकही आपल्या शिष्यांसह तेथेंच राहिला. तेथेंही ते गुरुशिष्य बुद्ध, धर्म व संघ यांच्यासंबंधानें एकमेकांच्या अगदीं उलट बोलत होते.

३ दुसऱ्या दिवशीं कांहीं भिक्षू पहांटेच उठून सभामंडपांत एकत्र बसले असतांना त्यांच्या याच विषयासंबंधानें गोष्टी सुरू झाल्या. [ ते म्हणूं लागले ] " काय हो हें आश्चर्य ! किती अद्भुत ही गोष्ट कीं [ सर्व ] जाणणाऱ्या व पाहणाऱ्या अर्हत् सम्यक्संबुद्धानें [ या जगतीतलावरील ] प्राण्यांच्या भिन्नाभिन्न रुची असतात हें किती बरोबर जाणिलें आहे !

---

१. मगध ( बहार ) देशाची राजधानी. हल्लींचें नांव राजगिर. हें ई. आय. रेल्वेच्या तिलय्या स्टेशनापासून सोळा मैलांवर आहे. २. हें ठिकाण राजगृहापासून सुमारें सात मैलांवर ( एक योजन ) होतें. या ठिकाणीं पुढें बौद्धधर्माचें एक मोठें विश्वविद्यालय होतें. तेथें फार लांबून विद्यार्थी शिकावयास येत असत. हुएन त्संग हिंदुस्थानांत आला त्यावेळीं त्यानेंही तें पाहिलें होतें. तें राजगृहाच्या उत्तरेस ३० ली म्हणजे सुमारें ६ मैल होतें असेंच त्यानें म्हटलें आहे. Baddhi-t records of the Western World. ii 157-8 पहा. ३. हा संजय बेलट्ठिपुत्त नांवाच्या आचार्याचा शिष्य होता. ( बुद्धघोष ). सामञ्ञफलसुत्त ( दीघ २·३१–३३ ) पहा. ४. अंबलट्ठिका नांवाचें राजाचें उद्यान होतें. त्याच्या प्रवेशद्वाराशीं एक लहान आंब्याचें झाड होतें त्यावरून त्यास ' अंबलट्ठिका ' असें नांव पडलें होतें ( बुद्धघोष ). ५ राजागारक. राजाच्या क्रीडेसाठीं बांधलेलें चित्रांनीं भूषित गृह ( बुद्धघोष ). ६. मंडलमाल. कोठें दुपाखी कूटागारशालेला मंडलमाल म्हणतात. कोठें एकपाखी व ओळीनें खांब असलेल्या पट्टस्थानशालेस हा शब्द लावितात. येथें निसीदनशाला असा अर्थ आहे ( बुद्धघोष ).

हा सुप्पिय परिव्राजक बुद्ध, धर्म व संघ यांसंबंधानें अनेक रीतीनें वाईट बोलत आहे, पण त्याचाच हा शिष्य ब्रह्मदत्त बुद्ध, धर्म व संघ यांची स्तुतीच करीत आहे. अशा रीतीनें हे दोघेही गुरुशिष्य एकमेकांच्या अगदीं उलट बोलत भगवान् व भिक्षुसंघ यांच्या पाठीमागून येत आहेत."

४ इतक्यांत भगवान् [ अंतर्ज्ञानानें ] त्यांच्या या गोष्टी[1] जाणून सभामंडपांत येऊन पोहोंचले; व त्यांच्याकारितां अंथरलेल्या आसनावर बसून म्हणाले, "भिक्षूहो, कोणत्या विषयासंबंधानें तुम्ही येथें बसून बोलत आहांत ? कोणत्या गोष्टींचा माझ्या आगमनामुळें भंग झाला ? " भिक्षू त्यांस सर्व हकिकत सांगून म्हणाले, "यासंबंधींच आमच्या गोष्टी चालल्या होत्या, इतक्यांत भगवान् आलेच."

५ भगवान् म्हणाले, "भिक्षूहो, माझी, धर्माची अथवा भिक्षुसंघाची कोणीं निंदा केली तर तुम्ही आपणांस राग येऊं देऊं नका, वाईट वाटून घेऊं नका अथवा त्यांच्याबद्दल द्वेष बाळगूं नका. यासंबंधीं जर तुम्ही रागावाल अथवा वाईट वाटून घ्याल अथवा द्वेषबुद्धी बाळगाल तर त्यामुळें [ मोक्षाच्या मार्गांत ] तुम्हालाच अडथळा येईल. जर दुसरे निंदा करूं लागले असतांना तुम्ही रागावलांत किंवा वाईट वाटून घेतलेंत तर तें त्यांचें भाषण चांगलें आहे किंवा वाईट आहे, हें तुम्हाला कळेल काय ? "

" नाहीं, भगवन्. "

"भिक्षूहो, माझी, धर्माची अथवा संघाची कोणीं निंदा केली असतां 'हें खोटें आहे, हें असें नाहीं, हें आम्हांमध्यें नाहीं, हें आमच्यामध्यें वास करीत नाहीं,' अशा रीतीनें जें खोटें असेल तें खोटें आहे असें दाखवून द्यावें.

---

१. विप्पकताऽति ममागमनपच्चया अपरिनिट्ठिता सिखं अप्पत्ता (बुद्धघोष). पण व्हिस् डेव्हिड्स्, 'What is the subject of the conversation between you ?'
२. येथें मजांत तिसऱ्या पारिच्छेदांतील सर्व भाषण आहे.

६ " भिक्षूहो, माझी, धर्माची अथवा संघाची कोणीं स्तुती केली तर तुम्ही आनंदित होऊं नका, सुख मानूं नका व आनंदानें वाहून जाऊं नका. तसें केलेंत तर त्यामुळें [ मोक्षाच्या मार्गांत ] तुम्हांलाच अडथळा येईल. माझी, धर्माची अथवा संघाची कोणीं स्तुती केली तर ' हें खरें आहे, हें असेंच आहे, हें आम्हांमध्यें आहे, हें आमच्या ठायीं वास करीत आहे, ' अशा रीतीनें जें खरें असेल तें खरें आहे असें दाखवून द्यावें.

७ " भिक्षूहो, एखादा सामान्य मनुष्य तथागताची[1] स्तुती करूं लागला असतां जें बोलेल तें क्षुल्लक बाबींसंबंधानें असेल, अल्प असेल, केवळ शीलासंबंधींच असेल. तो काय म्हणेल ?

८ ' प्राणघात सोडून दिल्यामुळें श्रमण गौतम प्राणघातापासून अलिप्त राहिला आहे. त्यानें दंड व शस्त्रें[2] टाकून दिलीं आहेत. त्याला आतां [ कोणाही प्राण्याला दुखावण्याची ] लज्जा वाटते. तो दयायुक्त झाला आहे व सर्व प्राणिमात्रांच्या हिताचाच तो विचार करीत असतो.

' चौर्यकर्माचा त्याग केल्यामुळें श्रमण गौतम चौर्यकर्मापासून अलिप्त राहिला आहे. तो दुसऱ्यानें दिलेलेंच घेतो व इच्छितो, व चौर्यकर्मापासून अलिप्त राहून शुद्ध अंतःकरणानें वागतो.

' अब्रह्मचर्याचा त्याग करून श्रमण गौतम ब्रह्मचर्य पाळतो, व ग्राम्य मैथुनधर्मापासून दूर राहून त्यापासून अलिप्त असतो.

---

१. जीवन्मुक्ताला तथागत म्हणतात. भगवान् बुद्धांनीं आपल्याविषयीं हा शब्द पुष्कळ ठिकाणीं योजिला आहे. बुद्धघोषानें या शब्दाचे आठ अर्थ दिले आहेत. परंतु त्यांत मुळींच तथ्य नाहीं. ते येणेंप्रमाणें. १ पूर्वीच्या बुद्धांप्रमाणें जगाचा उद्धार करण्यासाठीं आला. ( तथा आगतो ). २ पूर्वीच्या बुद्धांप्रमाणें जन्मल्याबरोबर सात पावलें चालला ( तथा गतो ). ३ सर्व गोष्टींचीं लक्षणें बरोबर जाणिलीं ( तथलक्खणं आगतो ). ४ चार आर्यसत्यें नीट जाणिलीं ( तथधम्मे याथावतो अभिसंबुद्धो ). ५ नीट पाहिलें ( तथदस्सिताय ). ६ खरें बोलला ( तथवादिताय ). ७ बोलल्याप्रमाणें करून दाखविलें ( तथकारिताय ). ८ सर्व जग जिंकून श्रेष्ठ राहिला ( अभिभवनट्ठेन ).

२. निहितदण्डो निहितसत्थो.

निधाय दण्डं भूतेसु तसेसु थावरेसु च
यो न हंति न घातेति तमहं ब्रूमि ब्राह्मणं । धम्मपद ४०५

९ 'मिथ्या भाषण सोडून दिल्याकारणानें श्रमण गौतम मिथ्या भाषणापासून अलिप्त आहे. तो खरें बोलणारा, सत्यापासून न ढळणारा,[1] स्थिर व विश्वसनीय असून लोकांस कधींही फसवीत नाहीं.

'चहाडी करणें सोडून दिल्यामुळें श्रमण गौतम चहाडखोरपणापासून अलिप्त आहे. तो भांडणें लाविण्याकरितां येथें बोललेलें दुसरीकडे व दुसरीकडे बोललेलें येथें सांगत नाहीं. तो ज्यांच्यांत भांडण आहे त्यांच्यांत मैत्री जोडतो, व ज्यांच्यांत आधींच मैत्री आहे त्यांची ती अधिक दृढ करितो.[2] त्याला ऐक्य आवडतें, त्यापासून त्यास सुख व आनंद होतो व ऐक्य घडवून आणणारेंच भाषण तो करितो.

'कठोर भाषण करणें सोडून दिल्यामुळें श्रमण गौतम कठोर भाषणापासून अलिप्त आहे. जी वाणी निर्दोष, ऐकण्याला सुखकारक, मधुर, हृदयंगम, सभ्य व बहुजनाला प्रिय व आवडणारी असते, ती तो बोलतो.

'निरर्थक भाषण करणें सोडून दिल्यामुळें श्रमण गौतम निरर्थक भाषणापासून अलिप्त आहे. तो योग्यवेळींच बोलतो, सत्य बोलतो, अर्थयुक्त, धर्मयुक्त,[3] विनययुक्त व हृदयांत सांठविण्याजोगें बोलतो. तो योग्यवेळीं व सकारण[4] बोलतो, व तेही जेवढें पाहिजे तेवढेंच नेमकें व मुद्देसूद बोलतो.

१० 'श्रमण गौतम बीजें व वनस्पती यांस कधींही इजा करीत नाहीं. तो रोज एकदांच जेवतो, तो रात्रीं कांहींही खात नाहीं, व अवेळीं[5] भोजन करीत नाहीं.

'तो नृत्य, गीत, वादन यांसारख्या ग्राम्य गोष्टींपासून विरक्त असतो.

'तो माला, गंध, विलेपन, धारण, मंडन, विभूषण, इत्यादि गोष्टींपासून अलिप्त असतो.

'तो उंच किंवा मोठ्या आसनावर बसत नाहीं. तो सोन्यारुप्याचें ग्रहण

---

१. सच्चसंधो. सत्याशीं सत्य सांधणारा, मधून मधून सुद्धां खोटें न बोलणारा. २. मनु ८·३४२. ३. धर्म म्हणजे बुद्धाचे उपदेश अथवा नऊ लोकोत्तर धर्म. विनय म्हणजे भिक्षुसंघाच्या वागणुकीचे नियम (बुद्धघोष). परंतु इतका अर्थ घेण्याचें कांहीं कारण नाहीं. धर्मयुक्त म्हणजे धार्मिक, धर्मास अनुसरून; विनययुक्त म्हणजे योग्य वागणुकीस अनुसरून. ४. अथवा दृष्टांतांनीं युक्त (बुद्धघोष). ५. विकालभोजन. दुपारीं बारा वाजल्यानंतरच्या भोजनास विकालभोजन म्हणतात.

कधींही करीत नाहीं. तो कच्चीं धान्यें व मांस घेत नाहीं. तो स्त्रिया व कुमारिका यांचा स्वीकार करीत नाहीं. तो दासदासी, बकरीं, एडके, कोंबडे, डुकरें, हत्ती, गायी, घोडे, घोड्या, शेतवाडी इत्यादिकांचें ग्रहण करीत नाहीं.

'तो दूतकर्म, निरोप पोहोंचविणें, क्रयविक्रय, वजन, कांसें व माप यांमध्यें फसविणें, लांच, लबाड्या, फसवणूक व खोटेपणा, हातपाय तोडणें, खून करणें, बंदींत टाकणें, वाटमाऱ्या, दरवडे घालणें व साहसी कृत्यें यांपासून विरत आहे.

"असें एखादा सामान्य मनुष्य तथागताची स्तुती करूं लागला असतां म्हणेल."

चूलसील समाप्त.

११ 'ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन मूलबीज, स्कंधबीज, ग्रथिबीज, अग्रबीज, बीजबीज, या प्रका-

---

१. आमकधञ्ञ, आमकमंस. भिक्षूंनीं फक्त शिजविलेलें अन्न घ्यावयाचे असतें. इतर भिक्षेकऱ्यांप्रमाणें तांदूळ, डाळ वगैरे यांचा त्यांस स्वीकार करितां येत नाहीं. २. खेत्तवत्थु. जेथें कांहीं पेरतात तें खेत्त व ज्या जागेवर घर बांधितात ती वत्थु. ३. तुलाकूट. ताजव्यानें वजन करण्यांत लबाडी. बुद्धघोषानें या निरनिराळ्या लबाड्यांचीं बरीच उदाहरणें दिलीं आहेत. ४. कंसकूट. कंस म्हणजे सोन्याचें ताट. तेव्हां कंसकूट म्हणजे काशाचीं भांडीं सोन्याचीं म्हणून विकणें ( बुद्धघोष ). र्‍हिस् डेव्हिड्स् यांच्या मतें हा अर्थ ओढून ताणून आणिलेला आहे. ११ व १२ या भिक्खुणींच्या निस्सग्गियपाचित्तिय नियमांमध्यें कंस या शब्दाचा अर्थ नाणें ( १ कंस=४ कहापण ) असा आहे. तेव्हां कंसकूट म्हणजे नाण्यांमध्यें फसविणें. परंतु त्या ठिकाणीं कंस याचा अर्थ कोणतेंही नाणें असा नसून विशिष्ट नाणें असा आहे. तो साधारण नाणें या अर्थी घेतां यावयाचा नाहीं. एकंदरींत कांसें सोनें म्हणून विकणें हाच अर्थ बरोबर दिसतो. ५. मानकूट. मापानें मोजण्यांत लबाडी. ६. लघुशीलविभाग. ७. ज्या वनस्पतींचीं मुळें हीच बीजें असतात. उ० हळद, आलें वगैरे. ८. अश्वत्थ, उंबर वगैरे. यांच्या फांद्याच जमिनींत लावितात. ९. मूळ 'फळुबीज'. ऊंस, बांबू वगैरे यांचे डोळे लावितात. १०. फणिज्जक, हिरिवेर वगैरे. ११ बिया. सूयगडंग २·३·१ येथें अशाच तऱ्हेचा उल्लेख आलेला आहे. 'चत्तारि बीयकाया एवमाहिज्जंति तं जहा अग्गबीया मूलबीया पोरबीया खंधबीया.' त्यावर टीकाकारानें असें म्हटलें आहे कीं नागार्जुनीयांच्या मतें बीयबीया असाही एक पांचवा प्रकार आहे. तसेंच आयारंगसुत्त २·१·८·११ पहा.

रचीं बीजें व वनस्पती यांना त्रास देतात; अशाप्रकारच्या बीजें व वनस्पती यांना त्रास देण्यापासून श्रमण गौतम अलिप्त असतो.

१२ 'ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन अन्न, पान, वस्त्र, यान, शयन, गंधं[1], आमिषं[2] इत्यादिकांचा संग्रह करून त्यांचा उपभोग घेतात; अशा प्रकारच्या संग्रह करण्यापासून श्रमण गौतम अलिप्त असतो.

१३ 'ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन, नृत्य, गीत, वादन, प्रेक्ष्य[3], आख्यान[4], पाणिस्वर[5], वेताल[6], कुंभथूण[7], सोभनकरक[8], चंडाल[9], वंस[10], धोपन[11], हस्तियुद्ध[12], अश्वयुद्ध, महिषयुद्ध,

---

१. उटणीं, अंगास चोळण्याचे सुगंधी पदार्थ. २. अनेक प्रकारचीं खाद्यें व पेयें. ३. नाट्यप्रयोग. ४. भारतरामायणादि (बुद्धघोष). ५. कांसें वगैरे धातूंवर हातानें ताडण करून त्यांतून आवाज काढणें. यास पाणिताल असेंही म्हणतात (बुद्धघोष). जातक ५३७ पहा. ६. घनताल (उच्चस्वरांमध्यें गायन) अथवा मेलेल्या मनुष्यास जिवंत करणें वगैरे प्रकारची मांत्रिक विद्या (बुद्धघोष). ऱ्हिस् डेव्हिड्स् यांच्या मतें 'भाटांचे पोवाडे' (सं. वैतालिक) असा अर्थ घ्यावा. सूयगडंग २.२. २५-२७ येथें वेताली व अद्धवेताली अशा दोन विद्या सांगितल्या आहेत. वेताली विद्येंतील अक्षरें कांहीं दिवस जपिलीं असतां अचेतन काष्ठामध्यें चेतना येते (दण्डं उत्थापयन्ति) व अद्धवेतालीनें ती नाहिशी होते. हा अर्थ बुद्धघोषाच्या दुसऱ्या अर्थाशीं (मांत्रिक विद्या) जुळतो परंतु येथें गीतवाद्यांचें प्रकरण चालूं असल्यामुळें पहिलाच अर्थ घेतला पाहिजे. हेमचन्द्रानें (अभिधान०) वैतालिक याचा अर्थ खड्गताल (षड्जताल?) असा घेतला आहे. ७. मोठा नगारा वाजविणें अथवा भांड्यांतून शब्द काढणें (बुद्धघोष). जातक ५३७. भिक्खुनीविभंग. पाचित्तिय २८. ८. सोभनगरकं, सोभनकरणं, सोभनकं असेही पाठ आहेत सोभनकंऽति नटानं अक्खोक्किरणं, सोभनकरं वा, पटिभानचित्तंऽति वुत्तं होति (बुद्धघोष). सोभनकरणंऽति सोभनकारणं। सोभनघरकंऽति सारसमासे वुत्तं (टीका). ९. लोखंडाच्या गोळ्यांनीं खेळणें (अयोगुळकीळा) अथवा चांडालाची घोंगड्या धण्याची क्रीडा (सणधोवनकीळा). Jain Sutras ii. 386 येथें art of Caṇḍālas एवढेंच म्हटलें आहे १० वांबूवरील खेळ. ११. कांहीं देशांत मृत मनुष्याच्या अस्थी स्वच्छ धुवून तेलानें माखून त्या पुढें ठेवून रडत रडत मद्यपान करण्याची चाल आहे (बुद्धघोष). अगुत्तर० १०. १०७ येथें ही चाल दक्षिणजनपदांत सुरू आहे असें म्हटलें आहे. ऱ्हिस् डेव्हिड्स् यांच्या मतें चंडालवंसधोपन हा एक समास असावा. कारण जातक ४९८ येथें तो अशा तऱ्हेनें आला आहे. त्याचें भाषांतर ते Caṇḍāla-bamboo-washings असें करितात, त्याचा कांहींच अर्थ होत नाहीं शिवाय सर्व पोथ्या, अट्ठकथा व टीका यांमध्यें हे तिन्ही शब्द निरनिराळेच घेतले आहेत. १२. आयारंग २.११,१२ पहा.

वृषभयुद्ध, अजयुद्ध, मेंढयुद्ध, कुकुटयुद्ध, वट्टकयुद्ध[1], दडयुद्ध, मुष्टियुद्ध[2], निब्बुद्ध, उय्योधिक[3], बलग्ग, सेनाव्यूह, अनीकदर्शन इत्यादि पाहण्यास अयोग्य अशा गोष्टी पाहतात; अशा प्रकारच्या अयोग्य गोष्टी पाहण्यापासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

१४ 'ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन अष्टपद[6], दशपद, आकाश[7], परिहारपथ[8], संतिक[9], खलिकं[10], घटिकां[11], शलाकाहस्त[12], अक्ष[13], पंगचीर[14], वंकक[15], मोक्खचिक[16], चिंगुळकं[17], पत्ताळ्हक[18], रथक[19], धनुक[20], अक्खरिका[21], मनेसिका[22], यथावज्ज[23] इत्यादि

---

१. एक प्रकारचा पक्षी quail (व्हिस्स डेव्हिड्स्). Common grey squirrel अथवा चदक (होर्नले). २. मल्लयुद्ध. चुल्लवग्ग १·१३. ३· पहा. ३. मारामारी. शस्त्रयुद्ध. ४. सैन्याची मोजणी. ५. सैन्याची पाहणी. ६. एकेका ओळींत आठ आठ सोंगट्या असतात अशा पटावरील खेळ. सूयगडंग १·९·१७ पहा. या प्यारिग्राफांतील खेळ चुल्लवग्ग १·१३·३, सुत्तविभंग. संघादिसेस १३·१·२ व मज्झिम ३८ येथें आले आहेत. ७. आकाशांत पट आहे अशी कल्पना करून खेळणें. ८ जमिनीवर एका वर्तुळांत अनेक मार्ग काढून त्यांत खेळणें. ९. एके ठिकाणीं ठेविलेल्या सोंगट्या दुसऱ्यांस धक्का न लावितां नखानें एकेक काढून घेणें, सागरगोटे. बुद्धघोष पंतिक असा पाठ घेतो. १०. फाश्यांनी खेळणें. Eggeling ची शतपथ ब्राह्मण (S. B. E xli 106-7) येथील टीप पहा. ११. मोठ्या काठीनें लहान काठीस मारणें. विटीदांडू. घटांनीं क्रीडा (टीका). १२. लाखेंत अथवा रंगांत हात बुडवून त्याच्या जमिनीवर अथवा भिंतीवर घोडे, हत्ती वगैरेंच्या आकृती उठविणें. शलाका याचा an oblong piece of ivory or bone used in gambling असाही अर्थ आहे, व ज्याअर्थी येथें द्यूतप्रमादस्थानाविषयीं विवेचन आहे, त्याअर्थी द्यूतक्रीडा असा अर्थ घेण्यास हरकत नाहीं टीककारानें सुद्धां 'पुष्कळ शलाकांतून एक घेऊन त्यांत मिसळून पुन्हां ती उचलून घेणें' असा अर्थ दिलेला आहे. १३. गोट्यांचा खेळ. १४. पानांची पिपाणी करून ती वाजविणें. १५. वंकक, घटिक, मोक्खचिक, चिंगुळक, पत्ताळ्हक, रथक व धनुक यांचा लहान मुलांचे खेळ म्हणून अंगुत्तर १०.९९. ४ व मज्झिम ३८ येथें उल्लेख आलेला आहे. येथें ते पण लावून खेळावयाचे असल्याकारणानें त्यांना द्यूतप्रमादस्थानामध्यें घातलें आहे (टीका). वंकक म्हणजे लहान मुलांचे खेळण्यातील नांगर. १६. कठीवर अथवा जमिनीवर कोलांट्या उड्या मारणें. १७. तालपर्णाचें केलेले वाऱ्यानें फिरणारें चक्र. १८. पानांची टापली. तिनें वाळू वगैरे मोजून खेळतात. आळ्हक (सं. आढक) हें एक माप आहे. (=¼ द्रोण). १९. खेळांतील रथ. २०. खेळांतील धनुष्य. २१. आकाशांत अथवा पाटीवरील अक्षरें ओळखणें. २२. मनांत काय आहे तें ओळखणें. २३. काणे, लंगडे इत्यादिकांचीं व्यंगें नाट्यानें दाखविणें (बुद्धघोष). वादनास अनुरूप नृत्य अथवा गायन (टीका).

द्यूतप्रमादस्थानांमध्यें आसक्त असतात; अशा प्रकारच्या द्यूतप्रमादस्थानांपासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

१५ 'ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन आसंदी[1], पल्लंक[2], गोणक[3], चित्तिका[4], पटिका[5], पटलिका[6], तूलिका[7], विकतिका[8], उद्दलोमी[9], एकन्तलोमी[10], कट्टिस्स[11], कोसेय्य[12], कुत्तक[13], हत्थत्थर[14], अस्सत्थर[15], रथत्थर[16], अजिनप्पवेणी[17], कदलिमिगपवरपच्चत्थरण[18], सउत्तरच्छद[19], उभतोलोहितकूपधान[20] इत्यादि उंच व मोठ्या आसनांचा स्वीकार करितात; अशा प्रकारच्या उंच व मोठीं आसनें वापरण्यापासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

१६ ' ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन उच्छादन[21], परिमर्दन, नहापन, संबाहन[22], आदास[23], अंजन, माला, विलेपन, मुखचूर्णक, मुखलेपन, हस्तबंध[24], शिखाबंध, दण्डक[25], नाळिका[26], खड्ग,

१. योग्य प्रमाणापेक्षां अधिक लांबीरुंदीचें आसन ( बुद्धघोष ). बुद्धघोषानें या सर्वांचा विनयास अनुसरून अर्थ दिलेला आहे. परंतु तसा घेण्याचें कांहीं कारण नाहीं. साधीं आसनें सुद्धां भिक्षूस स्वतःचीं म्हणून घेतां येत नाहींत. तीं संघाच्या मालकीचीं असतात. हीं सर्व महावग्ग ५.१०.३. चुल्लवग्ग ६.८ व अंगुत्तर ३.६३.३ येथें आलीं आहेत. आसंदीविषयीं माहिती Macdonell and Keith. Vedic Index i. 71 येथें दिली आहे. २. खुरावर सिंहादिकांचीं चित्रें कोरलेले पलंग. ३. लांब लांब लोकर असलेली सतरंजी. ४. चित्रविचित्र आसन. ५. लोकरीचें पांढरें आसन. ६. फुलांची नक्षी काढलेलें लोकरीचें आसन. ७ कापूस भरलेलें आसन. ८. सिंह, वाघ इत्यादिकांचीं चित्रें ज्यावर काढलीं आहेत असें लोकरीचें आसन. ९. दोहींकडे लव असलेलें ऊर्णामय वस्त्र. १०. एकाच बाजूस लव असलेलें ऊर्णामय वस्त्र. ११. रत्नें जडविलेलें रेशमी आसन. १२. रेशमी आसन. १३. सोळा कलावंतिणींना नाचावयास पुरेल एवढें मोठें लोकरीचें आसन. १४. हत्तीच्या पाठीवरील झूल. १५. घोड्याच्या पाठीवरील झूल. १६. रथांत पसरावयाचें आसन. १७. पलंगावर आंथरण्याचें कातड्याचें आसन. १८. कदलिमृगाच्या कातड्याचें बनविलेलें उत्तम आसन. १९. छतासहित आसन. २०. डोकें व पाय यांकरितां दोन्ही बाजूस तांबड्या उशा असलेलें आंथरूण. २१. चूर्णादिकांनीं आंग स्वच्छ करणें. २२. मल्लांप्रमाणें मुद्गरादिकांनीं गात्रावर ताडन करणें. ( बुद्धघोष ). आंग चेपणें. २३. आरशांत स्वतःचें शरीर पाहणें. २४. हातांमध्यें वलयादिक घालून त्यांस शोभा आणणें. २५. नक्षीदार काठी. २६. औषधें ठेविण्याकरितां वांबूच्या बनविलेल्या नळ्या.

छत्र, चित्रोपाहनें[1], उण्णीषें[2], मणि, वाळविजनी[3], दीर्घ दशांचीं पांढरीं शुभ्र वस्त्रें इत्यादि मंडनविभूषणादिकांचा स्वीकार करितात. अशा प्रकारच्या मंडनविभूषणादिकांचा स्वीकार करण्यापासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

१७ ‘ ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन राजे, चोर, महामात्य[4], सेना, भय, युद्धें[5], अन्न, पान, वस्त्र, शयन, माला, गंध, ज्ञाति[6], यान, ग्राम, निगम, नगर, जनपद, स्त्री, शूर, विशिखा[7], कुंभस्थानें[8], पूर्वप्रेतें[9], इत्यादिकांच्या व दुसऱ्या अनेक निरर्थक कथा, लोकाख्यायिका[10], समुद्राख्यायिका[11], इतिभवाभवकथा[12], इत्यादि अनेक प्रकारचे ग्राम्य कथालाप करितात; अशा प्रकारच्या कथालापांपासून श्रमण गौतम अलिप्त आहे. ’

१८ ‘ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन तुला धर्म व विनय कळत नाहींत, मी ते जाणतों, तुला ते कसचे कळतात? तुझा मार्गच चुकला आहे, माझाच मार्ग बरोबर आहे, माझें म्हणणें मुद्देसूद आहे, तुझें तसें नाहीं, तूं आधीं म्हणावयाचें तें मागून म्हणतोस व मागून म्हणावयाचें तें आधीं म्हणतोस, तूं जें इतकें ज्ञान मिळविलेंस तें सर्व फुकट आहे, तुझा वाद दोषयुक्त आहे, तुला मीं वादांत पकडिलें आहे, त्यांतून सुटण्याचा प्रयत्न कर आणि तुझ्यांत

---

१. चित्रविचित्र पादत्राणें. २. शिरोभूषण. ३. चवरी. ४. मंत्री. ५. भारत रामायणादिक ग्रंथांतील अमक्यानें तमक्यास ठार मारिलें इत्यादि कथा ( बुद्धघोष ). ६. सगेसोयरे. ७. रस्ता. अमुक विशिखा चांगली, वाईट, शूर, समर्थ अशा तऱ्हेनें तिजविषयीं तृष्णायुक्त बोलणें चांगलें नाहीं. श्रद्धायुक्त, प्रसन्न, क्षय पावलेली असें म्हणावें ( बुद्धघोष ). घरसान्निवेस. या शब्दानें येथें ‘ तेथें राहणारे ’ असा अर्थ घ्यावयाचा ( टीका ). ८. उदकतीर्थ अथवा कुंभदासींविषयीं कथा. ९. मरण पावून प्रेतलोकीं गेलेल्यांविषयीं कथा. १०. अमुक लोक कोणीं निर्माण केला, अमक्यानें केला, कावळ्याचीं हाडें पांढरीं असल्याकारणानें तोही पांढराच असला पाहिजे, रक्ताच्या तांबडेपणामुळें बगळीही तांबडीच असली पाहिजे, वगैरे लोकायतवितंडसंलापकथा ( बुद्धघोष ). ११. सगरानें खणला म्हणून सागर म्हणतात, ‘ मी खणला ’ असें हस्तमुद्रेनें त्यानें दर्शविलें म्हणून समुद्र ( मुद्रेनें सहित ) म्हणतात वगैरे निरर्थक कथा. ( बुद्धघोष ). १२. या रितीनें वृद्धी, या रितीनें हानी होते वगैरे कथा ( बुद्धघोष ). About existence and non-existence (Rhys Davids).

शक्ती असेल तर आतांच आपणास सोडवून घे, अशा तऱ्हेचीं भांडणें उकरून काढतात; अशा प्रकारच्या भांडणांपासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

१९ 'ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन राजे, मंत्री, क्षत्रिय, ब्राह्मण, गृहपती, कुमार वगैरे जनांच्या इकडे ये, हें तिकडे घेऊन जा, तें इकडे आण, अशा हुकुमांस अनुसरून निरोप घेऊन जाण्यायेण्याचें काम करितात; अशा प्रकारचें निरोपी काम करण्यापासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

२० 'ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन अनेक तऱ्हेच्या लबाड्या करितात, लाभाकरितां वटवट करितात, आपणास अमुक पाहिजे आहे असें सूचनायुक्त भाषण करितात, कांहीं लाभासाठीं कोडगेपणानें पुन्हां पुन्हां त्रास देतात, व थोडें देऊन पुष्कळ लाभ मिळविण्याची इच्छा करितात; अशा तऱ्हेच्या फसवेगिरीपासून श्रमण गौतम अलिप्त आहे.'

" असें एखादा सामान्य मनुष्य तथागताची स्तुती करूं लागला असतां म्हणेल."

मज्झिमसील समाप्त.

२१ 'ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन

---

१. विसुद्धिमग्गाच्या सीलनिद्देस नांवाच्या पहिल्या परिच्छेदांत यांचें सोदाहरण विवेचन केलें आहे २. यांपैकीं पुष्कळशीं सूयगडंग २.२. २५-२७ यांमध्यें दिलेलीं आहेत. 'तं जहा भोमं उप्पायं सुविणं अंतलिक्खं अंगं सरं लक्खणं वंजणं इच्छिलक्खणं पुरिसलक्खणं हयलक्खणं गयलक्खणं गोणलक्खणं मिंढलक्खणं कुक्कुडलक्खणं तित्तिरलक्खणं वट्टगलक्खणं लावयलक्खणं चक्कलक्खणं छत्तलक्खणं चम्मलक्खणं दंडलक्खणं असिलक्खणं माणिलक्खणं कागिणिलक्खणं सुभगाकरं दुब्भगाकरं गब्भाकरं मोहणकरं आहच्चाणिं पागसासाणिं दव्वहोमं खत्तियविज्जं चंदचरियं सूरचरियं सुक्कचरियं वहस्सइचरियं उक्कापायं दिसादाहं मियचक्कं वायसपरिमंडलं पंसुवुट्ठिं केसवुट्ठिं मंसवुट्ठिं रुहिरवुट्ठिं वेतालिं अद्धवेतालिं उसोवणिं तालुग्घाडणिं सोवागिं सोवरिं दामिलिं कालिंगिं गोरिं गंधारिं उवातेणिं उप्पयणिं जंभणिं थंभणिं लेसणिं आमयकरणिं विसल्लकरणिं पक्कमणिं अंतद्धाणिं आयमिणिं एवमाइआओ विज्जाओ.' तेथें त्यास तिरच्छीविज्जा असेंच म्हटलें आहे. Jacobi ( Jain Sutras ii, 365 ) यांच्या मतें हा उतारा तेथें मागून घुसडलेला आहे.

( पुढील पृष्ठावर पहा. )

अंग[1], निमित्तं[2], उत्पातं[3], स्वप्न[4], लक्षणें[5], मूसिकच्छिन्न[6], अग्निहोम, दर्विहोम[7], तूस, तांदूळ, तूप, तेल इत्यादिकांचे होम, मुखहोम[8], लोहितहोम[9], अंगविद्या[10], वास्तुविद्या[11], क्षत्रविद्या[12], शिवविद्या[13], भूतविद्या[14], भूरिविद्या[15],

---

भिक्षू, श्रमण, वानप्रस्थाश्रमी यांनीं अशा विद्यांच्या योगें उपजीविका करूं नये असें पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे.

जे लक्खणं च सुमिणं अंगविज्जं पउज्जति
न हु ते समणा वुच्चन्ति एवं आयरिएहिं अक्खायं । उत्तरज्झयणसुत्त ८·१३.
छिन्नं सरं भोममन्तलिक्खं सुमिणं लक्खणदंडवत्थुविज्जं
अंगवियारं सरस्सविजयं जे विज्जाहिं न जीवति स भिक्खु । उत्तरज्झयणसुत्त १५·७.
न चोत्पातनिमित्ताभ्यां न नक्षत्रांगविद्यया
नानुशासनवादाभ्यां भिक्षां लिप्सेत कर्हिचित् । मनुस्मृति ६·५०.

१. हस्तपादादि अवयवांचें निरीक्षण करून त्यांवरून भविष्य वर्तविणें. अंगनेत्रबाहुस्फुरणादिक. २. कांहीं खुणांवरून ओळखिण्याची विद्या. चक्षुस्पंदनादि. यासंबंधांत बुद्धघोषाचार्यांनीं पुढील उदाहरण दिलें आहे. ' पांडुराजानें मुठींत तीन मोत्यें धरून ज्योतिषास विचारिलें कीं माझ्या हातांत काय आहे ? तो गोंधळून इकडे तिकडे पाहूं लागला. इतक्यांत कोळ्याच्या घरट्यांत सांपडलेली एक माशी सुटून गेलेली त्यानें पाहिली. त्याबरोबर त्यानें मुक्ता (मुक्ता=१ सुटली. २ मोत्यें) असें उत्तर दिलें. राजानें पुन्हा विचारिलें कितीं आहेत ? इतक्यांत कोंबडा तीनदां आरवला, तेव्हां त्यानें तीन असें उत्तर दिलें। ' ३. उल्कापातादि महा अनर्थांवरून कांहीं ओळखिणें. उत्पातिक, कपिहसितादिक, आकाशांतून रुधिरवृष्टि वगैरे. ४. अथर्ववेद ६·४६; १६·५,६. ५. चिन्ह. पद्मयवशंखचक्रादिक. ६. उंदरानें कपडे कुरतडून केलेल्या भोकांवरून भविष्य सांगणें. ७. अमुक लांकडाच्या पळीनें तुस वगैरेच्या आहुत्या अग्नींत टाकून केलेल्या होमानें अमुक फळप्राप्ती होईल अशा समजुतीनें होम करणें. वर दिलेल्या सूयगडंगांतील अवतरणांत दव्वहोम असें आहे. त्याचा अर्थ तेथील टीकाकारानें ' कणवीरपुष्पादिभिर्द्रव्यैः मधुघृतादिभिर्वा उच्चाटनादिकार्ये होमो यस्याम् ' असा केला आहे. ८. मोहऱ्या वगैरे तोंडांत धरून मंत्र म्हणून अग्नींत टाकणें. ९. उजवें कोंपर व गुडघा यांमधील रक्तानें होम करणें. अथर्ववेद ८·९,१८. १०. अंगयष्टि पाहून भविष्य वर्तविणें. वराहमिहिर बृहत्संहिता. अध्याय ५१ पहा. ११. घर बांधण्यास योग्य जागा कांहीं खुणांवरून ठरविणें. बृहत्संहिता. अध्याय ५३. १२. खत्तविज्जा. बुद्धघोषाचार्य खेत्तविज्जा (ब्रह्मी प्रत) असा पाठ घेतात व त्याचा अर्थ ' अंगेय्यमासुरक्खादिनीतिसत्थं ' ( सिंहली ) अथवा ' अब्भेय्यमासुरक्खराजसत्थादिसत्थं' ( ब्रह्मी ) असा देतात. यावर टीकाकार 'अब्भिनो सत्थं अब्भेय्यं, मासुरक्खेन कतो गन्थो मासुरक्खो ' एवढाच अर्थ देतो. यावरून एवढें स्पष्ट आहे कीं खत्तविज्जा म्हणजे नीतिशास्त्र अथवा राजशास्त्र. छांदोग्यउपनिषदांत ( ७·१·२. ) क्षत्रविद्या म्हणजे धनुर्विद्या असा अर्थ दिलेला आहे. सूयगडंग येथें खत्तियविज्जा असा पाठ असून टीकाकारानें त्याचा अर्थ धनुर्विद्या असाच केला आहे. १३. स्मशानांत जाऊन शांतिकर्म करणें अथवा कोल्ह्यांच्या शब्दावरून ओळखणें. १४. अंगांतून भुतें काढून टाकण्याची विद्या. १५. तळघरांत जाऊन मंत्र म्हणणें (बुद्धघोष). अरसबुद्धिकरणविज्जा (टीका). भूरि या शब्दाचा प्रचुर हा नेहमींचा अर्थ घेतला असतां धनधान्यादिकांची वृद्धि करणें असा अर्थ लावितां येईल.

आहिविद्या[1], विषविद्या[2], वृश्चिकविद्या, मूषिकविद्या, शकुनिविद्या[3], वायसविद्या, पक्कध्यान[4], शरपरित्राण[5], मृगचक्र[6], इत्यादि ग्राम्य विद्यांच्या योगानें व खोटचा मार्गांनीं आपली उपजीविका करितात; अशाप्रकारच्या ग्राम्य विद्यांपासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

२२ 'ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन मणि, दंड, वस्त्र, असि[7], इषु[8], धनु, आयुध, स्त्री[9], पुरुष, कुमार, कुमारी, दास, दासी, हस्ति, अश्व, महिष, वृषभ, गो, अज[10], मेंढ, कुक्कुट, वत्तक, गोधा[11], कर्णिका[12], कच्छप, मृग[13], इत्यादिकांचीं लक्षणें सांगून ग्राम्य विद्यांच्या योगानें व खोटया मार्गांनीं आपली उपजीविका करितात; अशाप्रकारच्या लक्षणें सांगण्यापासून श्रमण गौतम आलिप्त आहे.

२३ 'ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन राजे लोक कांहीं कामाकरितां प्रयाण करतील किंवा परत येतील, एतद्देशीय राजे परकीय राजांवर चालून जातील व परकीय राजे पराजित होऊन पळून जातील, किंवा परकीय राजे एतद्देशीय राजांवर चालून येतील व एतद्देशीय राजे पराजित होऊन पळून जातील, एतद्देशीय राजांचा जय होईल व परकीय राजांचा पराजय होईल, किंवा परकीय

---

१. सर्पांचें विष मंत्रांनीं काढून टाकणें. अथर्ववेद ५·१३; ६·१२,५६; ७·८८. २. अथर्ववेद ६·९०, ९३,१००; आश्वलायनश्रौतसूत्र १०·७·५. (काश्यपीयादिविषतंत्रम्). ३. पक्षांची भाषा, गति इत्यादि जाणणें. बृहत्संहिता अध्याय ८८,९०,९५. ४. परिपाकगतचिन्ता. कोणाचें जीवित किती आहे तें ओळखणें. ५. मंत्रविद्येच्या योगानें शरांपासून स्वतःचें रक्षण करणें. ६. सर्व पशुपक्षांची भाषा जाणणें. सूयगडंग २·२·२५-२७ येथील मियचक्क. आरण्यकजीवांच्या दर्शनानें अथवा शब्दांनीं शुभाशुभ वर्तविणें. ७. तलवार. ८. बाण. ९. हीं ज्या घरांत राहतील तेथें क्षेम राहील कीं आपत्ती येईल हें पाहणें. अथवा सामुद्रिक. १०. यांतील अमक्याचें मांस खावें, आमक्याचें खाऊं नये वगैरे ठरविणें. ११. घोरपड. एका विहारांमध्यें तोंडांतून अग्नि काढणाऱ्या घोरपडीचें चित्र काढलें होतें. तेव्हां तेथें रोज भांडणें होऊं लागलीं. एका नवीन आलेल्या भिक्षूनें हें पाहून तें चित्र पुसून टाकिलें. तेव्हांपासून भांडण नाहींसें झालें. ( बुद्धघोष ). १२. पिलंधनकण्णिका ( कानांतील,दागिना ) अथवा गेहकण्णिका ( घराचें आढें ). या शब्दाचा खरा अर्थ हा दिसत नाहीं. कर्णिका हा कांहींतरी प्राणी असला पाहिजे. १३. सर्व जातीचीं जनावरें.

राजांचा जय होईल व एतद्देशीय राजांचा पराभव होईल, अशा प्रकारें अमक्याचा जय होईल व तमक्याचा पराजय होईल अशा रितीनें भविष्य सांगून ग्राम्य विद्यांच्या योगानें व खोट्या मार्गांनीं आपली उपजीविका करितात; अशा प्रकारच्या भविष्य सांगण्यापासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

२४ ' ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन अमुक वेळीं चंद्रग्रहण होईल, सूर्यग्रहण होईल, अमुक एका नक्षत्राचें ग्रहण होईल, चंद्र, सूर्य व नक्षत्रें अमुक वेळीं सरळ मार्गानें जातील, अमुक वेळीं वक्र मार्गानें जातील, उल्कापात होईल, दिशादाह[1] होईल, भूमिचलन होईल, देवदुंदुभी वाजेल, अमुक वेळीं सूर्य, चंद्र व नक्षत्रांचा उदय होईल, अमुक वेळीं अस्त होईल, ते अनिष्ट आहेत कीं इष्ट आहेत, चंद्र, सूर्य व नक्षत्रें यांच्या ग्रहणाचीं फलें अमुक अमुक आहेत, त्यांच्या सरळ व वक्र गतींचीं फलें अमुक अमुक आहेत, त्यांच्या उदयास्तांचीं फलें अमुक अमुक आहेत, उल्कापात, दिशादाह, भूमिचलन, देवदुंदुभी यांचीं फलें अमुक अमुक आहेत असें सांगून या ग्राम्य विद्यांच्या योगानें व खोट्या मार्गांनीं आपली उपजीविका करितात; अशा प्रकारच्या ग्राम्य विद्यांपासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

२५ ' ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन चांगली वृष्टी होईल किंवा अवर्षण पडेल, सुभिक्ष होईल अथवा दुर्भिक्ष होईल, क्षेम होईल अथवा भय प्राप्त होईल, रोगराई होईल किंवा आरोग्य होईल, असें सांगून मुद्रा[3], गणना[4], संखानं[5], काव्यं[6],

---

१. जिकडे तिकडे काळोख होऊन अग्नि व धूम यांचा वर्षाव होणें. २. निरुदक मेघांची गर्जना. ३. बोटें मोजून प्रश्न सांगणें. ४. अच्छिन्दकगणना ( बुद्धघोष ). मनांतल्या मनांत मोजून प्रश्न सांगणें. वाजसनेयिसंहिता ३०·२० व तैत्तिरीयब्राह्मण ३·४·१५·१ येथें गणकाचा पुरुषमेधामध्यें बलि देण्याचा उल्लेख आहे ( गणक =श्रुतिजातिस्वरमण्डलादिगणनकुशलः), त्यावरून गणना म्हणजे ज्योतिष असा अर्थ घेतां येईल. ५. अतिशय जलद मोजण्याची विद्या. उदाहरणार्थ वृक्ष पाहिल्याबरोबर त्यास पानें किती आहेत तें बरोबर सांगणें. ६. काव्याचे चार प्रकार आहेत. चिंताकाव्य, श्रुतकाव्य, अर्थकाव्य व प्रतिभाकाव्य.

लोकायतं इत्यादि ग्राम्य विद्यांच्या योगानें व खोट्या मार्गांनीं आपली उपजीविका करितात; अशा प्रकारच्या ग्राम्य विद्यांपासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

२६ ' ज्याप्रमाणे कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन आवाहं[2], विवाहं[3], संवदनं[4], विवदनं[5], संकिरणं[6], विकिरणं[7], सुभगकरणं[8], दुर्भगकरणं, विरुद्धगर्भकरणं[9], जिव्हानित्थद्धनं[10], हनुसंहननं[11], हस्ताभिजल्पनं[12], कर्णजल्पन[13], आदर्शप्रश्नं[14], कुमारीप्रश्नं[15], देवप्रश्नं[16], आदित्युपस्थान,

१. या शब्दाचा अर्थ नेहमीं चार्वाकवाद अथवा नास्तिकवाद (Materialism) असा घेण्यांत येतो. परंतु तो येथे जुळणार नाहीं हें उघड आहे. शिवाय लोकायत हें ब्राह्मणांच्या विद्येपैकीं एक आहे असें अनेक ठिकाणीं म्हटलें आहे ( लोकायतमहापुरिसलक्खणेसु अनवयो ). तेव्हां हा शब्द एखाद्या विशिष्ट मताचा दर्शक न धरितां अर्थशास्त्रादि सामान्य ज्ञानासंबंधीं घ्यावा हें बरें दिसतें. Rhys Davids यांचें Dialogues of the Buddha Vol. I. P. 166 येथील विवेचन पहा. त्यांनीं Casuistry, sophistry असा अर्थ घेतला आहे. २. मुलाचें लग्न. दुसऱ्याची मुलगी आपल्या घरीं आणणें. ३. मुलीचें लग्न. आपली मुलगी दुसऱ्याच्या घरीं देणें. ४. अमुक नक्षत्रावर लोक एके ठिकाणीं जमा करणें, मग त्यांचा वियोग होत नाहीं अशी समजूत आहे ( बुद्धघोष ). मैत्री जोडणें. अथर्ववेद ३.३०; ७.५२. ५. मित्रांची ताटातूट करणें ६. दुसऱ्यास दिलेलें धन विशिष्ट नक्षत्रावर परत घेतलें असतां चिरकाल टिकेल असें सांगणें. Charms for success in throwing dice ( Rhys Davids ).

७. धन विशिष्ट नक्षत्रावर दुसऱ्यास दिलें असतां तें दुप्पट चौपट वाढेल असें सांगणें. Charms to bring ill luck to an opponent throwing dice (Rhys Davids).

८. मंत्र म्हणून एखाद्याच्या मनांत प्रेम उत्पन्न करणें किंवा त्याच्या उलट करणें; अथवा सश्रीक किंवा त्याच्या उलट करणें. The art to make one happy or miserable. (Jacobi, Jain Sutras ii, 366). Charms to make people lucky or unlucky ( Rhys Davids. ) अथर्ववेद. १०.३,५;१६.४,९.

९. गर्भाचा नाश होण्याची भीती असतां औषधोपचारांनीं तो नाश थांबविणें (बुद्धघोष). परंतु Charms to procure abortion ( Rhys Davids) हाच अर्थ सयुक्तिक दिसतो. १०. मंत्रांनीं जिव्हा जड करणें. ११. मंत्रांनीं हनुवटी हलवितां येणार नाहीं अशी योजना करणें. १२. मंत्रांनीं दुसऱ्यास हात हालविण्यास लावणें. १३ मंत्रांनीं दुसऱ्याचे कान बधिर करणें. १४. आरशांत बघून प्रश्नाचें उत्तर सांगणें. १५. कुमारिकेच्या अंगांत देव आणवून त्याजकडून प्रश्नाचें उत्तर वदविणें. १६. देवदासीच्या अंगांत देवतासंचार करविणें.

महदुपस्थानं[1], अभ्युज्जलपनं[2], सिरव्हायनं[3] इत्यादि ग्राम्य विद्यांच्या योगानें व खोटया मार्गांनीं आपली उपजीविका करितात; अशा प्रकारच्या ग्राम्य विद्यांपासून श्रमण गौतम अलिप्त आहे.

२७ ‘ज्याप्रमाणें कित्येक श्रमण व ब्राह्मण श्रद्धेनें दिलेलीं भोजनें जेऊन शांतिकर्म[4], प्रणिधिकर्म[5], भूरिकर्म[6], वस्सकर्म[7], वोस्सकर्म[7], वास्तुकर्म[8], वास्तुपरिकीरणं[9], आचमनं[10], नहापन, जूहनं[11], वमनं[12], विरेचनं[13], ऊर्ध्वविरेचनं[14], अधोविरेचनं[15], शीर्षरेचन, कर्णतैल, नेत्रतर्पणं[16], नत्थुकर्म[17], अंजनं[18], प्रत्यंजनं[19], शालाक्यं[20], शल्यकर्म[21], दारकचिकित्सा[22], मुळ्यांपासून तयार केलेलीं औषधें देणें, क्षारादि औषधें देऊन काम झाल्यावर त्यांच्या शमनार्थ दुसरीं औषधें देणें, इत्यादि ग्राम्य विद्यांच्या योगानें व खोटया मार्गांनीं आपली उपजीविका करितात; अशा तऱ्हेच्या ग्राम्य विद्यांपासून श्रमण गौतम अलिप्त आहे.’

“असें तथागताची स्तुती करणारा एखादा सामान्य मनुष्य म्हणेल. परंतु, भिक्षूहो, तें क्षुल्लक बाबींसंबंधानें असेल, अल्प असेल, केवळ शीलांसंबंधींच असेल.”

## महासील समाप्त.

२८ “भिक्षूहो, यांशिवाय दुसरे अनेक गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे

१. महाब्रह्मदेवाची उपासना. ऱ्हिस् डेव्हिड्स् महर्तीची म्हणजे पृथ्वीची उपासना असा अर्थ घ्यावा असें म्हणतात. २. मंत्रांच्या योगानें तोंडांतून अग्निज्वाला काढणें. ३. ‘हे श्री, माझ्या घरांत वास कर’ अशा तऱ्हेची प्रार्थना. ४. शांत करणें. ५. नवस करणें. ६. तळघरांत बसून मंत्र म्हणणें. मागें भूरिविद्या पहा. ७. वस्स = पुरुष. वोस्स = नपुंसक. पुरुषास नपुंसक करणें व नपुंसकास पुरुष करणें. अथर्ववेद ४.४; ६.१०१, १३८; ७.११३. ८. घर बांधण्यासाठीं योग्य जागा शोधून काढणें. ९. गृहदेवतेप्रीत्यर्थ बलिकर्म करणें. १०. उदकानें मुखशुद्धी करणें. ११. अग्नीस आहुती अर्पण करणें. १२. ओकण्यासाठीं औषधयोजना. महावग्ग, भाग ६ पहा. १३. रेचक देणें. १४. पोटांतील घाण तोंडावाटें काढून टाकणें. १५. पोटांतील घाण अधोभागानें काढून टाकणें. १६. डोळे साफ होण्याकरितां आंत औषध घालणें. १७. नाकांमध्यें तेल घालून त्यांतील विकार काढून टाकणें. १८. क्षारयुक्त अंजन. १९. शीतल अंजन. २०. नेत्रवैद्यक. २१. शस्त्रविद्या. २२. बालरोगचिकित्सा.

धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यांस शिकवितो. या धर्मामुळेंच तथागताची योग्य स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करतील. ते धर्म कोणते ?

२९ "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण पूर्वान्तकल्पिक[1] पूर्वान्तानुदृष्टिक[2] असतात. ते पूर्वकालीन गोष्टींविषयीं अठरा प्रकारांनीं आपलीं मतें प्रतिपादन करितात. ते श्रमण व ब्राह्मण कशासंबंधानें व कशाप्रकारें आपलीं मतें प्रतिपादन करितात ?

३० "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण शाश्वतवादी[3] असतात. ते आत्मा व जग हीं शाश्वत आहेत, असें चार प्रकारांनीं प्रतिपादन करितात. ते श्रमण व ब्राह्मण कशासंबंधानें असें प्रतिपादन करितात ?

३१ "भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण वीर्य, सतत श्रम, तत्परता, काळजी व योग्य विचार यांच्या योगानें अशा प्रकारची समाधी प्राप्त करून घेतो कीं त्यायोगें एकाग्र चित्त झालें असतांना पुढीलप्रमाणें एक, दोन, तीन, चार, पांच, दहा, वीस, तीस, चाळीस, पन्नास, शंभर, हजार, लाख, अनेक शेंकडे, अनेक हजार, अनेक लाख इतक्या पूर्व जन्मांची त्यास स्मृती होते. 'अमुक जन्मांत मी अमुक ठिकाणीं जन्मलों. त्या ठिकाणीं माझें नांव, गोत्र, जात, आहार, सुख, दुःख, आयुर्मर्यादा हीं अमुक अमुक होतीं. तेथून मरणानंतर[4] दुसऱ्या जन्मांत मी अमुक ठिकाणीं जन्मलों. तेथें माझें नांव, गोत्र वगैरे हीं अमुक अमुक होतीं. अशा रितीनेंच मी या ठिकाणीं जन्मास आलों आहे.' अशा रितीनें अनेक हेतूंनीं व प्रकारांनीं युक्त अशा पूर्वजन्मांची स्मृती त्यास होते. त्यायोगानें तो पुढीलप्रमाणें विचार करूं लागतो. 'आत्मा व जग हीं

---

१. अत्यंत पूर्वींच्या गोष्टींविषयीं कल्पना करणारे. २. अत्यंत पूर्वींच्या गोष्टींविषयीं अनुमानें काढणारे. ३. सूयगडंग १·१·१·१५,१६.
संति पंच महब्भूया इहमेगेसि आहिया । आयछट्ठो पुणो आहु आया लोगे य सासए ॥
दुहओ ण विणस्संति नो य उप्पज्जए असं । सव्वे वि सव्वहा भावा नियतीभावमागया ॥
४. 'ततो चुतो.' तेथून च्युत होऊन. एका लोकांतून दुसऱ्या लोकांत जातांना पहिल्या लोकांतून जाणें यास च्युति व दुसऱ्या लोकांत प्रवेश करणें यास उपपत्ति असें म्हणतात.

शाश्वत, वंध्य[1], पर्वत शिखराप्रमाणें स्थिर व स्तंभाप्रमाणें अचल[2] आहेत. जगांतील सर्व प्राणी एकसारखे इकडून तिकडे व तिकडून इकडे असे धांवत असतात, मरण पावतात, जन्मास येतात, तरी पण ते शाश्वत कालपर्यंत टिकणारे आहेत. असें कां ? तर मला पूर्वजन्मांची [ वर सांगितल्याप्रमाणें ] स्मृती आहे. त्यायोगें मी हें जाणतों.' भिक्षूहो, ज्यायोगें कित्येक श्रमण व ब्राह्मण शाश्वतवादी असतात आणि आत्मा व जग हीं शाश्वत आहेत असें प्रतिपादन करितात, त्यांतील हा पहिला प्रकार होय.

३२ "भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण वरीलप्रमाणें समाधी प्राप्त करून घेतो. त्यायोगानें पुढीलप्रमाणें एक, दोन, तीन, चार, पांच, दहा संवर्तविवर्त[3] इतक्या पूर्व जन्मांची त्यास स्मृती होते. ' मी अमुक ठिकाणीं जन्मलों. त्या ठिकाणीं माझें नांव, गोत्र वगैरे अमुक अमुक होतीं. तेथून निरनिराळे जन्म घेत घेत मी या ठिकाणीं आलों आहें. ' अशा रितीनें अनेक हेतूंनीं व प्रकारांनीं युक्त अशा पूर्व जन्मांची स्मृती त्यास होते. त्यायोगानें आत्मा व जग हीं शाश्वत आहेत असें त्यास वाटूं लागतें. भिक्षूहो, ज्यायोगें कित्येक श्रमण व ब्राह्मण शाश्वतवादी असतात आणि आत्मा व जग हीं शाश्वत आहेत असें प्रतिपादन करितात, त्यांतील हा दुसरा प्रकार होय.

३३ "भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण आधिक स्मृतिमान् असतो. त्यामुळें त्यास पूर्वीच्या चाळीस संवर्तविवर्तांपर्यंत स्मृती राहते. त्यायोगानें त्यास आत्मा व जग हीं शाश्वत आहेत असें वाटूं लागतें. भिक्षूहो, ज्यायोगें कित्येक श्रमण व ब्राह्मण शाश्वतवादी असतात आणि आत्मा व जग हीं शाश्वत आहेतें असें प्रतिप्रादन करितात, त्यांतील हा तिसरा प्रकार होय.

१. कूटट्ठो ( सं. कूटस्थ ) गीता. ६·८;१२·३;१५·१६. २ एसिकट्ठायिठितो. एसिका म्हणजे नगरद्वाराच्या पुढें खुणेकरितां रोविलेला खांब. त्याप्रमाणें अचल. ३. संवर्त म्हणजे जगताचा नाश व विवर्त म्हणजे जगताची पुनरुत्पत्ती. ठरलेल्या कालांतरानें हीं होत असतात. जगताचा नाश वायु, अग्नि व उदक या तिहींच्या योगानें होतो. त्यामुळें पूर्वींचे सर्व प्राणी व विचार नष्ट होऊन नवीन सृष्टिरचना होते. हें सविस्तरपणें पुढें अग्गञ्ञसुत्त ( दीघ २७ ) व विसुद्धिमग्ग, परिच्छेद ६ यांत दिलें आहे.

३४ "भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण तर्क व विचक्षणा करणारा असतो. तो तर्क व विचक्षणा यांच्या योगानें स्वयंस्फूर्तीनें असें म्हणूं लागतो कीं, 'आत्मा व जग हीं शाश्वत आहेत. जगांतील सर्व प्राणी जरी जन्ममरणांत गुरफटून जाऊन जन्मोजन्मीं धांवत असतात, तरी ते शाश्वतकालपर्यंत टिकणारे आहेत.' भिक्षूहो, ज्यायोगें कित्येक श्रमण व ब्राह्मण शाश्वतवादी असतात आणि आत्मा व जग हीं शाश्वत आहेत असें प्रतिपादन करितात, त्यांतील हा चवथा प्रकार होय.

३५ "भिक्षूहो, या चार प्रकारांनीं कांहीं श्रमण व ब्राह्मण आत्मा व जग शाश्वत आहेत असें प्रतिपादन करितात. जे श्रमण व ब्राह्मण असें प्रतिपादन करितात ते केवळ या चार प्रकारांनींच अथवा यांतीलच एखाद्या प्रकारानें प्रतिपादन करितात. यांहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

३६ "भिक्षूहो, हे सर्व खोटे विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हें सर्व तथागतानें जाणिलें आहे व याहून अधिकही जाणिलें आहे. परंतु त्यामुळें तो गुरफटला जांत नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें[1] त्यास आध्यात्मिक[2] शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा[3] नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

३७ "भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मांमुळेंच[4] तथागताची योग्य स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करतील."

पहिला भाग समाप्त.

१. त्यास तृष्णा, मिथ्यादृष्टि व मान यांचा संसर्ग होत नाहीं. २. पच्चत्तं (सं. प्रत्यात्मन्) निब्बुति. ३. बंधनें. हीं तीन प्रकारचीं आहेत. काम, दृष्टि व शीलव्रतपरामर्ष. कोठें आत्मवाद असें चवथेंही सांपडतें. ४. भाणवार.

१ "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण एकत्यशाश्वतिक एकत्यअशाश्वतिक[1] असतात. ते आत्मा व जग हीं कांहीं अंशीं शाश्वत व कांहीं अंशीं अशाश्वत आहेत असें चार तऱ्हांनीं प्रतिपादन करितात. तें कोणत्या तऱ्हांनीं ?

२ " भिक्षूहो, असा एक काल येतो कीं केव्हां तरी पुष्कळ काळानंतर जगताचा विनाश होतो. त्यामुळें या जगतावरील बहुतेक सर्व प्राणी आभस्सर[2] देवलोकांत जाऊन राहतात. तेथें ते मनोमय असतात व प्रीती हें त्यांचें भक्ष्य असतें. ते तेजानें परिपूर्ण असतात, अंतरिक्षांत विहार करितात व पुष्कळ काळपर्यंत तेथें सुखानें राहतात.

३ " भिक्षूहो, त्यानंतर असा एक काळ येतो कीं केव्हां तरी पुष्कळ काळानंतर जगताची पुनरुत्पत्ती होते. तेव्हां एक रिकामें ब्रह्मविमान दिसूं लागतें. आभस्सर देवलोकावर रहावयास गेलेल्या प्राण्यांपैकीं एखादा आयुष्याच्या किंवा पुण्याच्या क्षयामुळें आभस्सर देवलोकांतून ब्रह्मविमानांत येऊन पडतो. तेथेंही तो मनोमय, प्रीतिभक्ष व तेजानें परिपूर्ण असून अंतरिक्षांत पुष्कळ काळपर्यंत सुखानें विहार करितो.

४ " कांहीं कालानें फार काळ तेथें राहिल्यामुळें त्यास तेथें एकटें राहण्याचा कंटाळा व त्रास येतो व दुसरेही कोणी प्राणी येथें येतील तर बरें असें त्यास वाटूं लागतें. त्याप्रमाणें कांहीं कालान्तरानें त्या इच्छेप्रमाणें दुसरेही प्राणी आयुक्षयामुळें अथवा पुण्यक्षयामुळें आभस्सर देवलोकांतून तेथें येऊन त्याजबरोबर राहतात. तेही तेथें मनोमय, प्रीतिभक्ष व तेजानें परिपूर्ण असून अंतरिक्षांत पुष्कळ काळपर्यंत सुखानें विहार करितात.

५ "तेव्हां, भिक्षूहो, त्या ठिकाणीं पहिल्याप्रथम आलेल्या प्राण्याला असें वाटूं लागतें कीं '[3]मीच ब्रह्मा, महाब्रह्मा, जेता व अपराजित आहें. मी सर्व पाहतों. माझ्या वशांत सर्व जग आहे. मीच ईश्वर, कर्ता, निर्माण करणारा,

---

१. कांहीं गोष्टी शाश्वत आहेत व दुसऱ्या कांहीं अशाश्वत आहेत असें प्रतिपादन करणारे. २. देवांचे निरनिराळे स्वर्गलोक आहेत त्यांपैकीं एक. ३. दीघ ११.८१; २८.२.१६, मज्झिम ४९; जातक ४०५ पहा.

श्रेष्ठ व सर्व सत्वांचें नियमन करणारा[१] आहें. मीच वशी व हल्लीं असणाऱ्या व पुढें होणाऱ्या प्राण्यांचा पिता आहें. हे सर्व प्राणी मींच निर्माण केलेले आहेत. कांकीं मला पूर्वी असें वाटलें कीं दुसऱ्याही प्राण्यांनीं येथें रहावयास यावें. त्या माझ्या इच्छेप्रमाणें हे सर्व प्राणी येथें आले आहेत.' जे प्राणी मागाहून आले त्यांनाही असेच वाटतें कीं ' हाच ब्रह्मा, महाब्रह्मा, जेता व अपराजित आहे. हा सर्व पाहतो, याच्या वशांत सर्व जग आहे. हाच ईश्वर, कर्ता, निर्माण करणारा, श्रेष्ठ व सर्व सत्वांचें नियमन करणारा आहे. हाच वशी व हल्लीं असणाऱ्या व पुढें होणाऱ्या प्राण्यांचा पिता आहे व आम्हां सर्वांस याच ब्रह्म्यानें निर्माण केलें आहे. कांकीं हा येथें प्रथम उत्पन्न झाला व आम्ही मागून उत्पन्न झालों हें आम्हांस माहीत आहे. '

६ " आतां, भिक्षूहो, तो प्रथम आलेला प्राणी दीर्घायुषी, अधिक कांतिमान् व अधिक बलवान् असतो, परंतु मागाहून आलेले प्राणी अल्पायुषी, कमी कांतिमान् व कमी बलवान् असतात. पुढें असें घडतें कीं त्या विमानांतील एक प्राणी तेथून निघून या पृथ्वीतलावर येऊन पडतो व गृहावास सोडून देऊन प्रव्रज्या घेतो, आणि वीर्य, सतत श्रम, तत्परता, काळजी व योग्य विचार यांच्या योगानें अशा प्रकारची समाधी प्राप्त करून घेतो कीं, एकाग्र चित्त झालें असतांना त्यास आपल्या पूर्वीच्या एका जन्माची स्मृती होते. त्यापाठीमागील जन्मांचें त्यास स्मरण रहात नाहीं. त्यामुळें त्यास असें वाटूं लागतें कीं, ' तो जो ब्रह्मा, महाब्रह्मा, जेता, अपराजित, ईश्वर, कर्ता, निर्माण करणारा, श्रेष्ठ, सर्व सत्त्वांचें नियमन करणारा, वशी व हल्लीं असणाऱ्या व पुढें होणाऱ्या प्राण्यांचा पिता आहे व ज्या ब्रह्म्यानें आम्हांस निर्माण केलें. तो नित्य, अचल, शाश्वत व न बदलणारा आहे. तो शाश्वतकालपर्यंत तसाच राहणार. परंतु आम्ही जे त्या ब्रह्म्यानें निर्माण केलेले सर्व लोक आहों, ते अनित्य, चल, अल्पायुषी व च्युत होणारे असल्यामुळें येथें आलों आहों.'

" भिक्षूहो, ज्या तऱ्हांनीं कांहीं श्रमण व ब्राह्मण आत्मा व जग हीं

---

१. ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे जाती व पशुपक्ष्यादि भेद करणारा.

कांहीं अंशीं शाश्वत व कांहीं अंशीं अशाश्वत आहेत असें प्रतिपादन करितात, त्यांतील ही पहिली तऱ्हा होय.

७. "दुसरी तऱ्हा कोणती? भिक्षूहो, खिड्डापदोसिक[1] नांवाचे कांहीं देव आहेत. ते पुष्कळ काळपर्यंत हास्य व क्रीडा यांच्या सुखांमध्यें गढून गेलेले असतात. त्यामुळें त्यांची स्मृती[2] नष्ट होते. स्मृती नष्ट झाल्यामुळें ते त्या लोकांतून खालीं पडतात.

८. "आतां, भिक्षूहो, असें होतें कीं त्यांतील एखादा प्राणी त्या लोकांतून च्युत होऊन येथें येतो. येथें येऊन गृहावास सोडून देऊन तो प्रव्रज्या घेतो आणि वीर्य, सतत श्रम, तत्परता व योग्य विचार यांच्या योगानें अशा प्रकारची समाधी प्राप्त करून घेतो कीं एकाग्र चित्त झालें असतांना त्यास मागील एका जन्माची स्मृती होते. त्यापलीकडील कांहींएक त्यास आठवत नाहीं.

९. "त्यास असें वाटूं लागतें कीं, जे देव खिड्डापदोसिक नाहींत ते पुष्कळ काळपर्यंत हास्य व क्रीडा यांच्या सुखांमध्यें गढून गेलेले नसल्याकारणानें त्यांची स्मृती नष्ट होत नाहीं. त्यामुळें ते त्या लोकांतून खालीं पडत नाहींत. म्हणून ते नित्य, अचल, शाश्वत व न बदलणारे असून शाश्वतकालपर्यंत तसेच रहाणार. परंतु आम्ही जे खिड्डापदोसिक देव ते पुष्कळ काळपर्यंत हास्य व क्रीडा यांच्या सुखामध्यें गढून गेलेले होतों. त्यामुळें आमची स्मृती नष्ट झाली व स्मृतिनाशामुळें आम्ही त्या लोकांतून खालीं पडलों. म्हणून आम्ही अनित्य, चल, अल्पायुषी, व च्युत होणारे असल्यामुळें येथें आलों आहों.'

---

१. क्रीडेनें दूषित झालेले. बौद्धांच्या स्वर्गमालिकेंत या नांवाचे कोणी देव नाहींत. बुद्धघोषाचार्यांच्या मतें जे कोणी देव क्रीडेनें दूषित झालेले असतील—मग ते कोणत्याही स्वर्गलोकांतले असोत—ते येथें घ्यावे. कोणी हे निम्मानरती व परनिम्मितवसत्ती हे देव असावेत असें म्हणतात. दीघ २०.१६;२४·२·१५–१९ पहा. सूयगडंग १·१·१·११. ( किड्डापदोस=रागद्वेष ). २. खाण्यापिण्याची स्मृती. मनुष्य अन्नाशिवाय एक आठवडाभर राहूं शकतो. परंतु देवांचीं शरीरें अत्यंत सुकुमार असल्याकारणानें त्यांस थोडा वेळ सुद्धां अन्नाशिवाय राहतां येत नाहीं. त्यामुळें खेळण्यांमध्यें खाणें विसरल्यामुळें ते त्या देवलोकांतून खालीं पडतात. मागाहून कितीही खाल्लें तरी तें त्यांच्या उपयोगास येत नाहीं ( बुद्धघोष ).

"भिक्षूहो, हा दुसरा प्रकार होय.

१० " तिसरा प्रकार कोणता ?

"भिक्षूहो, मनोपदोसिक[1] नांवाचे कांहीं देव आहेत. ते पुष्कळ काळपर्यंत एकमेकांचा द्वेष करतात. त्यामुळें त्यांचीं एकमेकांविषयीं मनें कलुषित होतात. त्यामुळें ते शरीरानें व मनानें दुबळे होऊन त्या लोकांतून खालीं पडतात.

११ "आतां भिक्षूहो, असें होतें कीं त्यांतील एखादा प्राणी त्या लोकांतून च्युत होऊन येथें येतो. येथें येऊन गृहावास सोडून देऊन तो प्रव्रज्या घेतो, आणि वीर्य, सतत श्रम, तत्परता, व योग्य विचार यांच्या योगानें अशा प्रकारची समाधी प्राप्त करून घेतो कीं एकाग्र चित्त झालें असतांना त्यास मागील एका जन्माची स्मृती होते. त्यापलीकडील कांहींएक आठवत नाहीं.

१२ "त्यास असें वाटूं लागतें कीं, 'जे देव मनोपदोसिक नाहींत ते पुष्कळ काळपर्यंत एकमेकांचा मत्सर करीत नाहींत. त्यामुळें त्यांचीं एकमेकांविषयीं मनें कलुषित होत नाहींत. त्यामुळें ते शरीरानें व मनानें दुबळे होऊन त्या लोकांतून खालीं पडत नाहींत. म्हणून ते नित्य, अचल, शाश्वत व न बदलणारे असून शाश्वत कालपर्यंत तसेच राहणार. परंतु आम्ही पुष्कळ काळपर्यंत एकमेकांचा मत्सर करीत होतों. त्यामुळें आमचीं एकमेकांविषयीं मनें कलुषित झालीं. त्यामुळें आम्ही शरीरानें व मनानें दुबळे होऊन त्या लोकांतून खालीं पडलों, म्हणून आम्ही अनित्य, चल, अल्पायुषी व च्युत होणारे असल्यामुळें येथें आलों आहों.'

"भिक्षूहो, हा तिसरा प्रकार होय.

१३ "चवथा प्रकार कोणता ?

"भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण तर्क व विचक्षणा करणारा असतो. तो तर्क व विचक्षणा यांच्या योगानें स्वयंस्फूर्तीनें असें

१. मनानें दूषित झालेले. चातुम्महाराजिक (बुद्धघोष). दीघ २०.१६; २४.२.१५-१९ पहा.

म्हणूं लागतो कीं, 'ज्याला डोळा, कान, नाक, जिव्हा किंवा शरीर म्हणतात, तो आत्मा अनित्य, चल, अशाश्वत व बदलणारा आहे. परंतु ज्यास चित्त, मन किंवा विज्ञान म्हणतात तो आत्मा नित्य, अचल, शाश्वत व न बदलणारा असाच राहणार.'

"भिक्षूहो, हा चवथा प्रकार होय.

१४ "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण आत्मा व जग हीं कांहीं अंशीं शाश्वत व कांहीं अंशीं अशाश्वत आहेत असें जें प्रतिपादन करितात, ते या चार प्रकारांनीं प्रतिपादन करितात. जे श्रमण व ब्राह्मण असें प्रतिपादन करतात, ते केवळ या चार तऱ्हांनींच अथवा यांतीलच एखाद्या प्रकारानें प्रतिपादन करितात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

१५ "हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हें सर्व तथागतानें जाणिलें आहे, व याहून अधिकही जाणिलें आहे. परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

"भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मांमुळेंच तथागताची योग्य स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करतील."

---

१. येथें ईश्वर नित्य आहे, दुसरे प्राणी अनित्य आहेत, असें म्हणणारे ईश्वरवादी व परमाणू नित्य, ध्रुव आहेत, अणुकादि अनित्य आहेत असें म्हणणारे काणादही घ्यावे. ( टीका ). सूयगडंग १.१.४.६.
अणंते णिइए लोए सासए ण विणस्सती । अंतवं णिइए लोए इति धीरोति पासइ ॥

१६ " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण अन्तानान्तिक असतात. ते चार प्रकारांनीं जगताला अंत आहे अथवा तें अनंत आहे असें प्रतिपादन करितात. तें कसें ?

१७ " भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण वीर्य, सतत श्रम, तत्परता, काळजी व योग्य विचार यांच्या योगानें अशा प्रकारची समाधी प्राप्त करून घेतो कीं त्यायोगें एकाग्र चित्त झालें असतां त्याला जगताला अंत आहे असें वाटूं लागतें. तो असें म्हणतो कीं, ' या जगाला अंत असून तें परिवटुम[1] आहे. तें कां तर मी वीर्य, सतत श्रम, तत्परता, काळजी व योग्य विचार यांच्या योगानें अशा प्रकारची समाधी प्राप्त करून घेतलीं कीं त्यायोगें एकाग्र चित्त झालें असतां मला या जगाला अंत आहे असें वाटतें.'

" हा पहिला प्रकार होय.

१८ " दुसरा प्रकार कोणता ?

" भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण वीर्य, सतत श्रम, तत्परता, काळजी, व योग्य विचार यांच्या योगानें अशा प्रकारची समाधी प्राप्त करून घेतो कीं त्यायोगें एकाग्र चित्त झालें असतां त्याला जग अनंत आहे असें वाटूं लागतें. तो असें म्हणतो कीं, ' हें जग अनंत व अमर्यादित आहे. जे श्रमण व ब्राह्मण या जगाला अंत आहे असें म्हणतात त्यांचें तें म्हणणें खोटें. हें जग अनंत व अमर्यादित आहे. तें कां तर मी वीर्य, सतत श्रम, तत्परता, काळजी व योग्य विचार यांच्या योगानें अशा प्रकारची समाधी प्राप्त करून घेतली कीं त्यायोगें एकाग्र चित्त झालें असतां मला हें जग अनंत आहे असें वाटतें.'

" हा दुसरा प्रकार होय.

१९ " तिसरा प्रकार कोणता ?

" भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण वीर्य, सतत श्रम, तत्परता, काळजी व योग्य विचार यांच्या योगानें अशा प्रकारची समाधी प्राप्त

१. वर्तुलाकार, ज्याभोंवतीं फिरतां येईल असें.

करून घेतो कीं त्यायोगें एकाग्र चित्त झालें असतां त्याला जगाला वर व खालीं अंत आहे पण सभोवार तें अनंत आहे असें वाटूं लागतें. तो असें म्हणूं लागतो कीं, ' हें जग अंतवान व अनंत दोन्हीही आहे. जे श्रमण व ब्राह्मण या जगाला अंत आहे असें म्हणतात त्यांचें तें म्हणणें खोटें व जे श्रमण व ब्राह्मण तें अनंत आणि अमर्यादित आहे असें म्हणतात त्यांचेंही तें म्हणणें खोटें. हें जग अंतवान व अनंत दोन्हीही आहे. तें कां तर मी वीर्य, सतत श्रम, तत्परता, काळजी व योग्य विचार यांच्या योगानें अशा प्रकारची समाधी प्राप्त करून घेतली कीं त्यायोगें एकाग्र चित्त झालें असतां मला हें जग अनंत आहे असें वाटतें.'

" हा तिसरा प्रकार होय.

२० " चवथा प्रकार कोणता ?

" भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण तर्क व विचक्षणा करणारा असतो. तो त्या तर्क व विचक्षणा यांच्या योगानें स्वयंस्फूर्तीनें असें म्हणूं लागतो कीं, ' हें जग अंतवानही नाहीं व अनंतही नाहीं. जे श्रमण व ब्राह्मण या जगाला अंत आहे असें म्हणतात त्यांचें तें म्हणणें खोटें, जे जग अनंत व अमर्यादित आहे असें म्हणतात त्यांचेंही तें म्हणणें खोटें व जे जग अंतवान व अनंत दोन्हीही आहे असें म्हणतात त्यांचेंही तें म्हणणें खोटें. हें जग अंतवानही नाहीं व अनंतही नाहीं. '

" हा चवथा प्रकार होय.

२१ " भिक्षूहो, जे श्रमण व ब्राह्मण अन्तानन्तिक असून जगताला अंत आहे अथवा तें अनंत आहे असें प्रतिपादन करितात ते असें या चार प्रकारांनींच अथवा यांतील एखाद्या प्रकारानें प्रतिपादन करितात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

२२ " हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हें सर्व तथागतानें जाणिलें आहे, व याहून अधिकही जाणिलें आहे. परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील

भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

"भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मांमुळेंच तथागताची योग्य स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील.

२३ "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण अमराविक्खेपिक[1] असतात. त्यांना कांहीं प्रश्न विचारला असतां त्यांचा घोटाळा होऊन चार प्रकारांनीं ते अनिश्चित उत्तरें देतात. तें कसें?

२४ "भिक्षूहो, एखाद्या श्रमणाला अथवा ब्राह्मणाला कुशल किंवा अकुशल बरोबर रितीनें कळत नाहीं. त्याला असें वाटतें कीं, "हें कुशल कीं अकुशल हें मला चांगलें कळत नाहीं. जर मला अमुक कुशल कीं अकुशल हें न कळतां तें कुशल आहे अथवा अकुशल आहे असें मी सांगेन, तर तेथें माझ्या मनांत इच्छा, प्रीती[2], द्वेष किंवा संताप[3] उत्पन्न होईल व त्यामुळें माझें म्हणणें खोटें होईल, आणि त्यामुळें मला पश्चात्ताप होऊन त्यायोगें [ मुक्तीच्या मार्गांत मला ] अडथळा येईल.' अशा रितीनें खोटें बोलण्याच्या भयानें व तिरस्कारानें तो अमुक कुशल आहे किंवा अकुशल आहे हें सांगत नाहीं व प्रश्न विचारला असतां त्याचा घोटाळा होऊन तो आनिश्चित उत्तरें देतो व असें म्हणतो कीं, 'मला असेंही वाटत नाहीं, तसेंही वाटत नाहीं, या दोहोंहून निराळें असेंही कांहीं वाटत नाहीं, नाहीं असेंही वाटत नाहीं व नाहीं असें नाहीं असेंही मला वाटत नाहीं.'

"हा पहिला प्रकार होय.

२५ "दुसरा प्रकार कोणता?

---

१. अनंत मतांमुळें ज्यांचा घोटाळा उडतो ते. अथवा अमरा नांवाचा एक मत्स्य आहे. त्यास हातांत धरलें असतां तो चटकन हातांतून निसटून जातो. त्याप्रमाणें वारंवार मतें बदलल्यामुळें कोणाच्याही कह्यांत न सांपडणारे (बुद्धघोष). अमर म्हणजे कधींही नाहींसा न होणारा असा विक्षेप करणारे. २. आपलीं मतें खरीं ठरावीं याबद्दल इच्छा, व आपल्या मतांवरील प्रीति. ३. दुसऱ्याच्या मतांबद्दल द्वेष व संताप.

"भिक्षूहो, एखाद्या श्रमणाला अथवा ब्राह्मणाला कुशल अथवा अकुशल बरोबर रितीनें कळत नाहीं. त्याला असें वाटतें कीं, 'हें कुशल कीं अकुशल हें मला चांगलें कळत नाहीं. जर मला अमुक कुशल कीं अकुशल हें न कळतां तें कुशल आहे अथवा अकुशल आहे असें मी सांगेन, तर तेथें माझ्या मनांत इच्छा, प्रीती, द्वेष किंवा संताप उत्पन्न होईल. त्यामुळें मला उपादान[1] होईल व त्यामुळें मला पश्चात्ताप होईल. त्यायोगें [ मुक्तीच्या मार्गांत मला ] अडथळा येईल. अशा रितीनें उपादानाच्या भीतीनें व तिरस्कारानें तो अमुक कुशल आहे किंवा अकुशल आहे हें सांगत नाहीं व प्रश्न विचारला असतां त्याचा घोटाळा होऊन तो अनिश्चित उत्तरें देतो व असें म्हणतो कीं, 'मला असेंही वाटत नाहीं, तसेंही वाटत नाहीं, या दोहोंहून निराळें असेंही कांहीं वाटत नाहीं, नाहीं असेंही वाटत नाहीं, व नाहीं असें नाहीं असेंही वाटत नाहीं.'

" हा दुसरा प्रकार होय.

२६ "तिसरा प्रकार कोणता ?

"भिक्षूहो, एखाद्या श्रमणाला अथवा ब्राह्मणाला कुशल किंवा अकुशल बरोबर रितीनें कळत नाहीं. त्याला असें वाटतें कीं, 'हें कुशल कीं अकुशल हें मला चांगलें कळत नाहीं. जर मला अमुक कुशल कीं अकुशल हें न कळतां तें कुशल आहे अथवा अकुशल आहे असें मी सांगेन, तर जे श्रमण व ब्राह्मण शहाणे, निपुण, वादामध्यें हुशार, सूक्ष्म भेद जाणणारे व दुसऱ्यांचीं चुकीचीं मतें आपल्या प्रज्ञेनें खोडून काढणारे आहेत, ते माझ्याशीं वाद करतील, माझ्या मतांचीं कारणें विचारतील व माझीं मतें चुकीचीं ठरवितील. तसें झालें असतां मला नीट समजावून सांगतां येणार नाहीं. त्यायोगें मला पश्चात्ताप होईल व त्यामुळें [ मुक्तीच्या मार्गांत मला ] अडथळा येईल.' अशा रितीनें वादाच्या भयानें व तिर-

१. बंधन. घट्ट धरणें. मला आपलीं मतें घट्ट धरून ठेवावींशीं वाटतील व दुसऱ्यांच्या मतांचें मुळींच ग्रहण करूं नये असें वाटेल. हा दुसरा प्रकारही उपादानच आहे, कारण दुसऱ्याच्या मताविषयीं द्वेष ही मनोभावना तो घट्ट धरून ठेवितो.

स्कारानें तो अमुक कुशल आहे कीं अकुशल आहे हें सांगत नाहीं व प्रश्न विचारला असतां त्याचा घोटाळा होऊन तो अनिश्चित उत्तरें देतो व असें म्हणतो कीं, 'मला असेंही वाटत नाहीं, तसेंही वाटत नाहीं, या दोहोंहून निराळें असेंही कांहीं वाटत नाहीं, नाहीं असेंही वाटत नाहीं व नाहीं असें नाहीं असेंही वाटत नाहीं.'

"हा तिसरा प्रकार होय.

२७ "चवथा प्रकार कोणता ?

"भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण मंदबुद्धीचा व मूढ असतो. त्यामुळें त्याला एखादा प्रश्न विचारला असतां मंदबुद्धी व मूढत्व यामुळें त्याचा घोटाळा होऊन तो अनिश्चित उत्तरें देतो. तीं अशीं, 'जर परलोक आहे काय असें तुम्हीं मला विचारलेंत आणि जर परलोक आहे असें मला वाटत असलें, तर परलोक आहे असें मी सांगेन. परंतु मला असें वाटत नाहीं, तसेंही वाटत नाहीं, या दोहोंहून निराळें असेंही कांहीं वाटत नाहीं, नाहीं असेंही वाटत नाहीं, व नाहीं असें नाहीं असेंही मला वाटत नाहीं—परलोक नाहीं—परलोक आहे व नाहीं—परलोक आहे असेंही नाहीं व नाहीं असेंही नाहीं—ओपपातिक प्राणी आहेत—ओपपातिक प्राणी नाहीत—ओपपातिक प्राणी आहेतही व नाहीतही—ओपपातिक प्राणी आहेत असेंही नाहीं व नाहींत असेंही नाहीं—चांगल्या व वाईट कर्माचें फल असतें—नसतें—असतेंही व नसतेंही—असतें असेंही नाहीं व नसतें असेंही नाहीं—तथागत मरणानंतर रहातो—रहात नाहीं—

१. हेंच उत्तर पुढें सामञ्ञफलसुत्तांत (दीघ २.३२) संजय बेलट्ठिपुत्तानें दिलें आहे. तेथेंही त्यास विक्षेप (विक्खेपं व्याकासि) असेंच म्हटलें आहे.
२. जगांतील एकंदर प्राण्यांचे चार वर्ग करण्यांत येतात. अण्डज, जलाबुज (सं. जरायुज), संसेदज (सं. स्वेदज) व ओपपातिक (सं. उपपादुक). त्यांतील पहिल्या तीन प्रकारांनीं उत्पत्ती न होतां एकदम एका लोकांतून दुसऱ्या लोकांत जन्म घेणारे प्राणी—कांहीं देव व कांहीं नेरयिक—यांस ओपपातिक असें म्हणतात. 'मातापित्रादिदृष्टकारणनिरपेक्षा अदृष्टसहकृतेभ्यो गुणेभ्यो जाता ये देवास्ते दिव्योपपादुका उच्यते' (अमरकोश. महेश्वरकृत टीका).

रहातोही व रहातही नाहीं–रहातो असेंही नाहीं व रहात नाहीं असेंही नाहीं–असे प्रश्न त्यास विचारले असतां तो वरीलप्रमाणेंच उत्तर देतो.

" हा चवथा प्रकार होय.

२८ " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण अमराविक्खेपिक असतात. त्यांना कांहीं प्रश्न विचारला असतां त्यांचा घोटाळा होऊन ते या चार प्रकारांनीं अथवा यांतील एखाद्या प्रकारानें अनिश्चित उत्तरें देतात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

२९ "हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार हें सर्व तथागतानें जाणिलें आहे, व याहून अधिकही जाणिलें आहे. परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

" भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मांमुळेंच तथागताची योग्य स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील.

३० " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण अधिच्चसमुप्पन्निक[1] असतात. ते आत्मा व जग हीं कारणाशिवाय उत्पन्न झालेलीं आहेत असें दोन प्रकारांनीं प्रतिपादन करतात. ते प्रकार कोणते ?

३१ "भिक्षूहो, असञ्ञीसत्त[2] नांवाचे देव आहेत. त्यांना संज्ञा उत्पन्न

---

१. अधिच्च म्हणजे अकारण. कारणाशिवाय उत्पत्ती होते असें प्रतिपादन करणारे

२. संज्ञाविहीन. एखादा मनुष्य श्रमानें चवथें ध्यान संपादन करून घेतो. त्यामुळें त्यास सर्व दुःख चित्तामुळें उत्पन्न होतें असें वाटूं लागतें, व चित्त नसावें अशी इच्छा त्यास उत्पन्न होते. त्यामुळें मरणानंतर तो असञ्ञीसत्त देवलोकांत उत्पन्न होतो, व ध्यानाची शक्ती जोंपर्यंत असेल तोंपर्यंत तेथें राहतो. त्यानंतर त्यास संज्ञा उत्पन्न होऊन तो त्या लोकांतून खालीं पडतो ( बुद्धघोष ).

झाल्याबरोबर ते त्या लोकांतून खालीं पडतात. आतां एखादे वेळीं असें घडतें कीं एखादा प्राणी तेथून खालीं पडून येथें येतो व समाधी प्राप्त करून घेतो. त्यामुळें त्यास ती संज्ञा उत्पन्न झाल्याची स्मृती होते. त्या पलीकडील कशाचीही स्मृती त्यास होत नाहीं. तो असें म्हणूं लागतो कीं, ' आत्मा व जग हीं कारणाशिवाय उत्पन्न झालेलीं आहेत. तें कां तर मीं पूर्वीं नव्हतों. तो मी पूर्वीं नसतां आतां प्राण्याच्या जन्मास आलों आहें.'

" हा पहिला प्रकार होय.

३२ " दुसरा प्रकार कोणता ?

" भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण तर्क व विचक्षणा करणारा असतो. तो त्या तर्क व विचक्षणा यांच्या योगानें स्वयंस्फूर्तीनें असें म्हणूं लागतो कीं, 'आत्मा व जग हीं कारणाशिवाय उत्पन्न झालेलीं आहेत.'

" हा दुसरा प्रकार होय.

३३ " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण अधिच्चसमुप्पन्निक असतात. ते आत्मा व जग हीं कारणाशिवाय उत्पन्न झालेलीं आहेत असें या दोन प्रकारांनींच अथवा यांतील एखाद्या प्रकारानें प्रतिपादन करितात, याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

३४ " हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, याचें दृढ ग्रहण कसें झालें, त्यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार हें सर्व तथागतानें जाणिलें आहे व याहून अधिकही जाणिलें आहे, परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

" भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मांमुळेंच तथागताची योग्य स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील.

३५ "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण पूर्वान्तकल्पिक पूर्वान्तानुदृष्टिक असतात. ते पूर्वकालीन गोष्टींविषयीं या अठरा प्रकारांनींच अथवा यांतील एकाद्या प्रकारानें प्रतिपादन करतात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

३६ "हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हें सर्व तथागतानें जाणिलें आहे, व याहून अधिकही जाणिलें आहे, परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

"भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मांमुळेंच तथागताची स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील.

३७ "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण अपरान्तकल्पिक[1], अपरान्तानुदृष्टिक[2] असतात. ते भविष्य काळाविषयीं चव्वेचाळीस प्रकारांनीं आपलीं मतें प्रतिपादन करतात. ते प्रकार कोणते ?

३८ "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण मरणानंतर आत्म्याला संज्ञा असते असें सोळा प्रकारांनीं प्रतिपादन करतात. ते कसें? मरणानंतर आत्मा अरोगी[3] व संज्ञायुक्त असून (१) रूपी असतो (२) अरूपी असतो (३) रूपीही असतो व अरूपीही असतो (४) रूपीही नसतो व अरूपीही नसतो (५) अन्तवान् असतो (६) अनन्त असतो (७) अन्तवानही असतो व अनन्तही असतो (८) अन्तवानही नसतो व अनन्तही नसतो (९) एकाच प्रकारें संज्ञावान् असतो

१. भविष्यकाळच्या गोष्टींविषयीं कल्पना करणारे. २. भविष्यकाळच्या गोष्टींविषयीं अनुमानें काढणारे. ३. नित्य ( बुद्धघोष. ) निर्विकार (टीका). ४. हें मत आजीविकांचें आहे ( बुद्धघोष ). ५. हें मत निगण्ठांचें आहे ( बुद्धघोष ).

(१०) अनेक प्रकारांनीं संज्ञावान् असतो (११) थोडी संज्ञा असणारा असतो ( १२ ) अप्रमाण संज्ञा असणारा असतो ( १३ ) पूर्णपणें सुखी असतो ( १४ ) पूर्णपणें दुःखी असतो ( १५ ) सुखीही असतो व दुःखीही असतो ( १६ ) सुखीही नसतो व दुःखीही नसतो. असें ते प्रतिपादन करितात.

३९ " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण मरणानंतर आत्म्याला संज्ञा असते असें जें प्रतिपादन करतात, तें या सोळा प्रकारांनीं अथवा यांतील एखाद्या प्रकारानें प्रतिपादन करतात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

४० " हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांच दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हें सर्व तथागतानें जाणिलें आहे व याहून अधिकही जाणिलें आहे, परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

" भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रीतीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मामुळेंच तथागताची स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील. "

दुसरा भाग समाप्त.

१ " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण मरणानंतर आत्म्याला संज्ञा नसते असें आठ प्रकारांनीं प्रतिपादन करितात. तें कसें ?

---

१. अथवा अंगुष्ठप्रमाण आत्मा, यवप्रमाण आत्मा, अणुमात्र आत्मा वगैरे प्रकारांनीं लहान व संज्ञावान् आत्मा असतो असें म्हणणारे, कपिल, कणाद वगैरे ( टीका ).
२. ज्याअर्थी हे लोक आत्मा संज्ञारहित आहे असें प्रतिपादन करितात, त्याअर्थी वरील सोळा प्रकारांपैकीं शेवटचे आठ प्रकार या मतांत येऊंच शकत नाहींत.

२ "मरणानंतर आत्मा अरोगी व संज्ञाविहीन असून (१) रूपी असतो ( २ ) अरूपी असतो ( ३ ) रूपीही असतो व अरूपीही असतो ( ४ ) रूपीही नसतो व अरूपीही नसतो ( ५ ) अन्तवान् असतो ( ६ ) अनन्त असतो ( ७ ) अन्तवानूही असतो व अनन्तही असतो ( ८ ) अन्तवानूही नसतो व अनन्तही नसतो, असें ते प्रतिपादन करितात.

३ " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण मरणानंतर आत्म्याला संज्ञा नसते असें जें प्रतिपादन करतात तें या आठ प्रकारांनींच अथवा यांतील एखाद्या प्रकारानें प्रतिपादन करतात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

४ "हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हें सर्व तथागतानें जाणिलें आहे व याहून अधिकही जाणिलें आहे. परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानाचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

" भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मामुळेंच तथागताची स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील.

५ " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण मरणानंतर आत्मा संज्ञावानूही नसतो व संज्ञाविहीनही नसतो असें आठ प्रकारांनीं प्रतिपादन करितात. तें कसें ?

६ "मरणानंतर आत्मा अरोगी असून संज्ञायुक्तही नसून व संज्ञाविहीनही नसून (१) रूपी असतो (२) अरूपी असतो (३) रूपीही असतो व अरूपीही असतो (४) रूपीही नसतो व अरूपीही नसतो (५) अन्तवान् असतो (६) अनन्त असतो (७) अन्तवानूही असतो व अनन्तही असतो (८) अन्तवानूही नसतो व अनन्तही नसतो, असें ते प्रतिपादन करितात.

७ "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण मरणानंतर आत्मा संज्ञायुक्तही नसतो व संज्ञाविहीनही नसतो असें जें प्रतिपादन करतात तें या आठ प्रकारांनींच अथवा यांतील एखाद्या प्रकारानें प्रतिपादन करितात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

८ "हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हें सर्व तथागतानें जाणिलें आहे व याहून अधिकही जाणिलें आहे. परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

"भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रीतीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मामुळेंच तथागताची स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील.

९ "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण उच्छेदवादी असतात. ते जिवंत प्राण्याचा उच्छेद, विनाश व विध्वंस होणार असें सात प्रकारांनीं प्रतिपादन करितात. तें कसें ?

१० "भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण[1] असें प्रतिपादन करितो कीं, 'ज्याअर्थीं हा आत्मारूपी, चार महाभूतांचा बनलेला व

---

१. सूयगडंग १·१·१·७,८

संति पंच महब्भूया इहमेगेसि माहिया । पुढवी आउ तेओ वा वाउ आगासपंचमा । एए पंच महब्भूया तेब्भो एगोत्ति आहिया । अह तेसिं विणासेणं विणासो होइ देहिणो ॥

टीकाकारांनीं हें मत नास्तिकांचें अथवा चार्वाकांचें म्हणून दिलें आहे.

२·१·१५ 'सें जहा उड्ढं पादतला अहे केसग्गमच्छया तिरियं तेयपरियंते जीवे एस आयापज्जवे कसिणे एस जीवे जीवति एसमय णो जीवइ सरीरे धरमाणे धरइ विणट्ठंमिय णो धरइ '। अजित केसकंबलीच्या मतासही उच्छेदवाद असेंच नांव आहे. सामञ्ञफलसुत्त ( दीघ २·२३ ) पहा.

२·१·२० अहावरे दोच्चे पुरिसजाए पंचमहब्भूतिए त्ति आहिज्जइ ।

येथें हें मत लोकायतिक अथवा सांख्य यांचें आहे असें टीकाकारांनीं म्हटलें आहे.

मातापित्यांमुळें उत्पन्न झालेला असून शरीरभेदानंतर त्याचा उच्छेद व विनाश होतो व मरणानंतर कांहीं उरत नाहीं, त्याअर्थीं या आत्म्याचा पूर्णपणें विनाश होतो असेंच समजलें पाहिजे.' याप्रमाणें कांहीं लोक जिवंत प्राण्याचा विनाश होतो असें प्रतिपादितात.

११ "त्यास दुसरा एखादा म्हणतो कीं, 'तूं आत्मा जसा आहे असें म्हणतोस तसा तो आहे, नाहीं असें मी म्हणत नाहीं, परंतु तो आत्मा याप्रमाणें पूर्णपणें नष्ट होत नाहीं. दिव्य, रूपी, कामावचर[1] व अन्नें[2] खाऊन राहणारा असा एक निराळा आत्मा आहे. तो तुला ठाऊक नाहीं. त्यास तूं पाहिलें नाहींस, परंतु मी तो जाणतों, मीं त्यास पाहिलें आहे. या निराळ्या आत्म्याचा ज्याअर्थीं शरीरभेदानंतर उच्छेद व विनाश होतो व मरणानंतर कांहीं उरत नाहीं, त्याअर्थीं या आत्म्याचा पूर्णपणें विनाश होतो असेंच समजलें पाहिजे.' याप्रमाणें कांहीं लोक जिवंत प्राण्याचा विनाश होतो असें प्रतिपादितात.

१२ "त्यास दुसरा एखादा म्हणतो कीं, 'तूं आत्मा जसा आहे असें म्हणतोस तसा तो आहे, नाहीं असें मी म्हणत नाहीं. परंतु तो आत्मा याप्रमाणें पूर्णपणें नष्ट होत नाहीं. दिव्य रूपी, मनोमय, सर्वांगपरिपूर्ण व सर्व इंद्रियांनीं पूर्णपणें युक्त असा एक निराळा आत्मा आहे. तो तुला ठाऊक नाहीं. त्यास तूं पाहिलें नाहींस. परंतु मी तो जाणतों. मीं त्यास पाहिलें आहे. या निराळ्या आत्म्याचा ज्याअर्थीं शरीरभेदानंतर उच्छेद व विनाश होतो व मरणानंतर कांहींही उरत नाहीं त्याअर्थीं या आत्म्याचा पूर्णपणें विनाश होतो असेंच समजलें पाहिजे.' याप्रमाणें कांहीं लोक जिवंत प्राण्याचा विनाश होतो असें प्रतिपादितात.

१३ "त्यास दुसरा एखादा म्हणतो कीं, 'तूं आत्मा जसा आहे असें म्हणतोस तसा तो आहे, नाहीं असें मी म्हणत नाहीं. परंतु तो आत्मा याप्रमाणें पूर्णपणें नष्ट होत नाहीं. रूपांविषयींच्या कल्पनांचें अतिक्रमण

---

१. कामलोकांत राहणारा. पहिल्या सहा स्वर्गलोकांस कामावचर अशी संज्ञा आहे.

२. कबळिंकाराहारभक्खो, आपण नेहमीं खातों तें अन्न खाऊन राहणारा.

करून, प्रतिघातकल्पनेचा नाश होऊन, भेदाविषयींच्या कल्पनांचा लोप होऊन, आकाश अनंत आहे या कल्पनेनें प्रेरित होऊन, त्या अनंत आकाशांत संचार करणारा असा एक निराळा आत्मा आहे. तो तुला ठाऊक नाहीं, त्यास तूं पाहिलें नाहींस. परंतु मी तो जाणतों. मीं त्यास पाहिलें आहे. या निराळ्या आत्म्याचा ज्याअर्थीं शरीरभेदानंतर उच्छेद व विनाश होतो व मरणानंतर कांहींही उरत नाहीं, त्याअर्थीं या आत्म्याचा पूर्णपणें विनाश होतो असेंच समजलें पाहिजे.[1] याप्रमाणें कांहीं लोक जिवंत प्राण्याचा विनाश होतो असें प्रतिपादितात.

१४ "त्यास दुसरा एखादा म्हणतो कीं, 'तूं आत्मा जसा आहे असें म्हणतोस तसा तो आहे, नाहीं असें मी म्हणत नाहीं. परंतु तो आत्मा याप्रमाणें पूर्णपणें नष्ट होत नाहीं. अनंत आकाशाविषयींच्या कल्पनांचें अतिक्रमण करून, विज्ञान अनंत आहे या कल्पनेनें प्रेरित होऊन, त्या अनंत विज्ञानांत संचार करणारा असा एक निराळा आत्मा आहे[2]. तो तुला ठाऊक नाहीं, त्यास तूं पाहिलें नाहींस. परंतु मी तो जाणतों. मीं त्यास पाहिलें आहे. या निराळ्या आत्म्याचा ज्याअर्थीं शरीरभेदानंतर उच्छेद व विनाश होतो व मरणानंतर कांहींही उरत नाहीं, त्याअर्थीं या आत्म्याचा पूर्णपणें विनाश होतो असेंच समजलें पाहिजे.' याप्रमाणें कांहीं लोक जिवंत प्राण्याचा विनाश होतो असें प्रतिपादितात.

१५ "त्यास दुसरा एखादा असें म्हणतो कीं, 'तूं आत्मा जसा आहे असें म्हणतोस तसा तो आहे, नाहीं असें मी म्हणत नाहीं. परंतु तो आत्मा याप्रमाणें पूर्णपणें नष्ट होत नाहीं. अनंत विज्ञानाविषयींच्या कल्पनांचें अतिक्रमण करून, कांहींच नाहीं या कल्पनेनें प्रेरित होऊन, त्या शून्य लोकांत संचार करणारा असा एक निराळा आत्मा आहे. तो तुला ठाऊक नाहीं. त्यास तूं पाहिलें नाहींस. परंतु मी तो जाणतों. मीं त्यास पाहिलें आहे. या निराळ्या आत्म्याचा ज्याअर्थीं शरीरभेदा-

---

१. हें मत भगवान् बुद्धांचा पहिला गुरु आळार कालाम याचें होतें ( मज्झिम २६. )
२. हें मत भगवान् बुद्धांचा दुसरा गुरु उद्दक रामपुत्त याचें होतें ( मज्झिम २६. )

नंतर उच्छेद व विनाश होतो व मरणानंतर कांहींही उरत नाहीं, त्याअर्थी या आत्म्याचा पूर्णपणें विनाश होतो असेंच समजलें पाहिजे.' याप्रमाणें कांहीं लोक जिवंत प्राण्याचा विनाश होतो असें प्रतिपादितात.

१६ "त्यास दुसरा एखादा असें म्हणतो कीं, 'तूं आत्मा जसा आहे असें म्हणतोस तसा तो आहे, नाहीं असें मी म्हणत नाहीं. परंतु तो आत्मा याप्रमाणें पूर्णपणें नष्ट होत नाहीं. कांहीं नाहीं या कल्पनेचें अतिक्रमण करून, जेथें संज्ञाही नाहीं व तिचा अभावही नाहीं अशा लोकांत संचार करणारा असा एक निराळा आत्मा आहे. तो तुला ठाऊक नाहीं. त्यास तूं पाहिलें नाहींस. परंतु मी तो जाणतों. मीं त्यास पाहिलें आहे. या निराळ्या आत्म्याचा ज्याअर्थी शरीरभेदानंतर उच्छेद व विनाश होतो व मरणानंतर कांहींही उरत नाहीं, त्याअर्थी या आत्म्याचा पूर्णपणें विनाश होतो असेंच समजलें पाहिजे.' याप्रमाणें कांहीं लोक जिवंत प्राण्याचा विनाश होतो असें प्रतिपादितात.[१]

१७ "भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण उच्छेदवादी असतात. ते जिवंत प्राण्याचा उच्छेद, विनाश व विध्वंस होणार असें जें प्रतिपादितात, तें या सात प्रकारांनींच अथवा यांतील एखाद्या प्रकारानें प्रतिपादितात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

१८ "हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हे सर्व तथागतानें जाणिलें आहे व याहून अधिकही जाणिलें आहे. परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

"भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत,

---

१. आकासानञ्चायतन, विञ्ञाणानञ्चायतन, आकिञ्चञ्ञायतन व नेवसञ्ञानासञ्ञायतन अशीं चार अरूपध्यानें आहेत, व त्यांच्या योगानें या नांवाच्या चार स्वर्गलोकांत ( यांस अरूपलोक म्हणतात ) प्राणी जातो.

प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मांमुळेंच तथागताची स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील.

१९ " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण याच जन्मांत श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होतें अशा मताचे असून तें मत ते पांच प्रकारांनीं प्रतिपादन करितात. तें कसें ?

२० " भिक्षूहो, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण अशा मताचा असतो कीं, 'जेव्हां हा आत्मा पांच[1] प्रकारच्या विषयसुखांनीं पूर्ण असून त्यांत रममाण होतो तेव्हां त्यास याच जन्मांत श्रेष्ठ निर्वाणप्राप्ती होते.' याप्रमाणें कांहीं श्रमण व ब्राह्मण याच जन्मांत श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होतें असें प्रतिपादन करितात.

२१ "त्यास दुसरा एखादा म्हणतो कीं, 'तूं म्हणतोस तशा प्रकारचा आत्मा आहे, नाहीं असें मी म्हणत नाहीं. परंतु अशा रितीनें त्या आत्म्याला श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होत नाहीं. कां तर विषय हे अनित्य, दुःखकारक व बदलणारे असतात. ते बदलून रूपांतर पावल्यामुळें शोक, विलाप, दुःख, खेद व त्रास हीं उत्पन्न होतात. परंतु जेव्हां आत्मा विषय व अकुशल धर्म यांजपासून वेगळा होऊन वितर्क व विचार यांनीं युक्त, एकांतामुळें उत्पन्न झालेल्या प्रीतीनें व सुखानें परिपूर्ण असें प्रथम ध्यान संपादन करून घेऊन त्यांत विहार करितो, तेव्हांच त्या आत्म्यास या जन्मांत श्रेष्ठ निर्वाणप्राप्ती होते.' याप्रमाणें कांहीं श्रमण व ब्राह्मण याच जन्मांत श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होतें असें प्रतिपादन करितात.

२२ "त्यास दुसरा एखादा म्हणतो कीं, 'तूं म्हणतोस तशा प्रकारचा आत्मा आहे, नाहीं असें मी म्हणत नाहीं. परंतु अशा रितीनें त्या आत्म्याला श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होत नाहीं. कां तर ज्याअर्थी त्या ध्यानांत वितर्क व

१. 'पंच कामगुणा.' रूप, शब्द, गंध, रस व स्पर्श.

विचार हे असतात, त्याअर्थीं तें स्थूल आहे. परंतु जेव्हां हा आत्मा वितर्कविचारांचा लोप झाल्यावर जी चित्ताची प्रसन्नता, जी चित्ताची एकाग्रता तिनें युक्त, वितर्कविचारविरहित व समाधीपासून उत्पन्न झालेल्या प्रीतीनें आणि सुखानें युक्त असें द्वितीय ध्यान संपादन करून घेऊन त्यांत विहार करितो, तेव्हांच त्या आत्म्यास या जन्मांत श्रेष्ठ निर्वाणप्राप्ती होते.' याप्रमाणें कांहीं श्रमण व ब्राह्मण याच जन्मांत श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होतें असें प्रतिपादन करितात.

२३ "त्यास दुसरा एखादा म्हणतो कीं 'तूं म्हणतोस तशा प्रकारचा आत्मा आहे, नाहीं असें मी म्हणत नाहीं. परंतु अशा रितीनें त्या आत्म्याला श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होत नाहीं. कां तर ज्याअर्थीं त्या ध्यानांत प्रीति व उत्साह हीं असतात त्याअर्थीं तें स्थूल आहे. परंतु जेव्हां आत्मा प्रीतीच्या त्यागानें उपेक्षायुक्त होतो व स्मृतिमान् होत्साता समाधिसुखाचा अनुभव घेतो, व ज्यायोगें त्याला आर्यजन उपेक्षायुक्त, स्मृतिमान् आणि सुखी असें म्हणतात, अशा प्रकारचें तृतीय ध्यान संपादन करून घेऊन त्यांत विहार करितो, तेव्हांच त्या आत्म्यास या जन्मांत श्रेष्ठ निर्वाणप्राप्ती होते.' याप्रमाणें कांहीं श्रमण व ब्राह्मण याच जन्मांत श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होतें असें प्रतिपादन करितात.

२४ "त्यास दुसरा एखादा म्हणतो कीं, 'तूं म्हणतोस तशा प्रकारचा आत्मा आहे, नाहीं असें मी म्हणत नाहीं. परंतु अशा रितीनें त्या आत्म्याला श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होत नाहीं. कां तर ज्याअर्थीं त्या ध्यानांतील सुख पाहिलें तर सतत विचारांत असतें त्याअर्थीं तें स्थूल आहे परंतु जेव्हां आत्मा सौमनस्य आणि दौर्मनस्य यांचा पूर्वींच नाश झाल्यावर सुख आणि दुःख यांचा निरोध करून, सुखदुःखविरहित व उपेक्षा आणि स्मृती यांनीं परिशुद्ध असें चतुर्थ ध्यान संपादन करून घेऊन त्यांत विहार करितो, तेव्हांच त्या आत्म्यास या जन्मांत श्रेष्ठ निर्वाणप्राप्ती होते.' याप्रमाणें कांहीं श्रमण व ब्राह्मण याच जन्मांत श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होतें असें प्रतिपादन करितात.

२५ " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण याच जन्मांत श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होतें असें जें प्रतिपादन करितात, तें याच पांच प्रकारांनीं अथवा यांतील एखाद्या प्रकारानें प्रतिपादन करितात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

२६ " हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हें सर्व तथागतानें जाणिलें आहे व याहून अधिकही जाणिलें आहे. परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

" भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मांमुळेंच तथागताची स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील.

२७ " भिक्षूहो, कांहीं श्रमण व ब्राह्मण अपरान्तकल्पिक अपरान्तानुष्टिक असतात. ते भविष्यकाळाविषयीं चव्वेचाळीस प्रकारांनीं आपलीं मतें प्रतिपादन करितात, तीं याच चव्वेचाळीस प्रकारांनीं अथवा यांतील एखाद्या प्रकारानें प्रतिपादन करितात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

२८ " हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हें सर्व तथागतानें जाणिलें आहे व याहून अधिकही जाणिलें आहे. परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

“भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मांमुळेंच तथागताची योग्य स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील.

२९ “भिक्षूहो, जे श्रमण व ब्राह्मण पूर्वान्तकल्पिक, अपरान्तकल्पिक, अथवा दोन्ही प्रकारचे असून बासष्ट प्रकारांनीं आपलीं मतें प्रतिपादन करितात, तीं याच बासष्ट प्रकारांनीं अथवा यांतील एखाद्या प्रकारानें प्रतिपादन करितात. याहून निराळा असा एकही प्रकार नाहीं.

३० “हे सर्व विचार कसे उत्पन्न झाले, यांचें दृढ ग्रहण कसें झालें, यांच्यामुळें पुढें कोणती गती व परलोक प्राप्त होणार, हें सर्व तथागतानें

---

१. टीकाकारानें या मतांमध्यें सर्व वाद कसे अंतर्भूत होतात हें दाखविण्याचा पुढीलप्रमाणें प्रयत्न केला आहे. ‘सामञ्ञफलादिसूत्रांत सांगितलेले अक्रियावाद, अहेतुवाद, नास्तिकवाद, ईश्वरवाद, प्रकृतिवाद, प्रजापतिवाद, पुरुषवाद, कालवाद, स्वभाववाद, यदृच्छावाद वगैरे वादांचाही यांमध्येंच संग्रह होतो. वंध्य, कूटस्थ वगैरे शब्दांनीं **अक्रियावाद** सांगितल्यामुळें तो शाश्वतवादांत येतो. त्याचप्रमाणें ‘ सात काय आहेत ’ वगैरे पकुधवादही यांतच येतो. ‘ प्राण्यांच्या संक्लेशास हेतु नाहीं, कारण नाहीं ’ वगैरे **अहेतुकवाद** अधिच्चसमुप्पन्निकवादांत येतो. ‘ परलोक नाहीं’ वगैरे **नास्तिकवाद** उच्छेदवादांत येतो, कारण तेथें शरीराचा भेद झाल्यावर ( प्राणी ) उच्छेद पावतात असें म्हटलें आहे. जरी सामञ्ञफलसुत्तांत चातुयामसंवर हा निगण्ठ नातपुत्ताचा वाद सांगितला आहे, तरी सात व्रतांच्या ( ! ) अतिक्रमणानें तेथें विक्षेपच सांगितल्यामुळें निगण्ठवादही संजयवादाप्रमाणें अमराविक्खेपवादांमध्येंच अंतर्भूत होतो. ‘ जीव व शरीर एकच, जीव व शरीर हीं निराळीं ’ हा वाद ‘ मरणानंतर आत्मा अरूपी अरोगी असतो ’ वगैरे वादांत येतो. ‘ मरणानंतर तथागत असतो, ओपपातिक प्राणी आहेत ’ वगैरे शाश्वतवादांत येतात. ‘ मरणानंतर तथागत नसतो, ओपपातिक प्राणी नाहींत ’ वगैरे उच्छेदवादांत येतात. ‘मरणानंतर तथागत असतोही व नसतोही, ओपपातिक प्राणी आहेतही व नाहींतही ’ वगैरे एकत्यशाश्वतिकवादांत येतात. ‘मरणानंतर तथागत असतो असेंही नाहीं व नसतो असेंही नाहीं, ओपपातिक प्राणी आहेत असेंही नाहीं व नाहींत असेंही नाहीं ’ हे अमराविक्खेपवादांत येतात. **ईश्वरवाद, प्रजापतिवाद, पुरुषवाद** हे एकत्यशाश्वतिकवादांत येतात. त्याचप्रमाणें कणादवादही. **स्वभाववाद, नियतिवाद, यदृच्छावाद** हे अधिच्चसमुप्पन्निकवादांत येतात. याप्रमाणें एकंदर वाद या बासष्टांतच अंतर्भूत होतात. ’

जाणिलें आहे व याहून अधिकही जाणिलें आहे. परंतु त्यामुळें तो गुरफटला जात नाहीं, व मोकळा राहिल्याकारणानें त्यास आध्यात्मिक शांती प्राप्त झाली आहे. वेदनांची उत्पत्ती, अंत, आस्वाद, त्यांमधील भय व त्यांचा समूळ नाश हीं यथायोग्य जाणून तथागत[१] उपादानांचा नाश झाल्यामुळें विमुक्त झाला आहे.

"भिक्षूहो, हेच ते गंभीर, दिसण्यास व कळण्यास कठीण, शांत, प्रणीत, अतर्क्य, गूढ व पंडितांनाच फक्त कळण्याजोगे धर्म आहेत. ते तथागत स्वतः नीट रितीनें जाणून दुसऱ्यास शिकवितो. या धर्मांमुळेंच तथागताची योग्य स्तुती करणारे लोक त्याची स्तुती करितील.

३१—४४ "भिक्षूहो, यांतील

"कांहीं श्रमण व ब्राह्मण शाश्वतवादी असतात. ते आत्मा व जग हीं शाश्वत आहेत असें चार प्रकारांनीं प्रतिपादन करितात.

"कांहीं श्रमण व ब्राह्मण एकत्यशाश्वतिक एकत्यअशाश्वतिक असतात. ते आत्मा व जग हीं कांहीं अंशीं शाश्वत व कांहीं अंशीं अशाश्वत आहेत असें चार प्रकारांनीं प्रतिपादन करितात.

"कांहीं श्रमण व ब्राह्मण अन्तानन्तिक असतात. ते चार प्रकारांनीं जगताला अन्त आहे अथवा तें अनन्त आहे असें प्रतिपादन करितात.

"कांहीं श्रमण व ब्राह्मण अमराविक्खेपिक असतात. त्याना कांहीं प्रश्न विचारला असतां त्यांचा घोटाळा होऊन चार प्रकारांनीं ते अनिश्चित उत्तरें देतात.

---

१ संयुत्तनिकाय २४ ( दिट्ठिसंयुत्त ) यामध्यें अशीं अनेक मतें दिलीं आहेत. उ० शाश्वत व अशाश्वत लोक ( ९,१० ), अन्तवान व अनंत लोक ( ११, १२ ),जीव व शरीर एकच अथवा निराळे ( १३–१८ ), रूपी व अरूपी आत्मा ( ३७–४० ). एकान्तसुखी वगैरे ( ४१-४४ ). आयारंगसुत्त १.७.१.३ 'अत्थि लोए नत्थि लोए धुवे लोए अधुवे लोए साइए लोए अणाइए लोए सपज्जवसिए लोए अपज्जवसिए लोए सुकडेत्ति वा दुक्कडेत्ति वा कल्लाणे ति वा पावए ति वा साधू ति वा असाधू ति वा सिद्धी ति वा आसिद्धी ति वा निरए ति वा अनिरए ति वा.'

" कांहीं श्रमण व ब्राह्मण अधिच्चसमुप्पन्निक असतात. ते आत्मा व जग हीं कारणाशिवाय झालेलीं आहेत असें दोन प्रकारांनीं प्रतिपादन करितात.

" कांहीं श्रमण व ब्राह्मण मरणानंतर आत्म्याला संज्ञा असते असें सोळा प्रकारांनीं प्रतिपादन करतात.

" कांहीं श्रमण व ब्राह्मण मरणानंतर आत्म्याला संज्ञा नसते असें आठ प्रकारांनीं प्रतिपादन करितात.

" कांहीं श्रमण व ब्राह्मण मरणानंतर आत्मा संज्ञावानही नसतो व संज्ञाविहीनही नसतो असें आठ प्रकारांनीं प्रतिपादन करितात.

" कांहीं श्रमण व ब्राह्मण उच्छेदवादी असतात. ते जिवंत प्राण्याचा उच्छेद, विनाश व विध्वंस होणार असें सात प्रकारांनीं प्रतिपादन करितात.

" कांहीं श्रमण व ब्राह्मण याच जन्मांत श्रेष्ठ निर्वाण प्राप्त होतें अशा मताचे असून तें मत ते पांच प्रकारांनीं प्रतिपादन करितात.

" भिक्षूहो, न पाहणाऱ्या व जाणणाऱ्या त्या श्रमण ब्राह्मणांचीं हीं मतें केवळ तृष्णामूलक वेदना आहेत, आणि ती सर्व त्यांच्या मनाची केवळ तळमळ व चलबिचल आहे.

४५–५७ " भिक्षूहो, त्यांचीं तीं मतें इंद्रियें व विषय यांच्या स्पर्शामुळें बनलेलीं असतात.

५८–७० " भिक्षूहो, त्यांचीं तीं मतें इंद्रियें व विषय यांच्या स्पर्शाशिवाय बनलीं असतील हें संभवतच नाहीं.

७१ " भिक्षूहो, त्यांचीं तीं मतें सहा स्पर्शायतनांचा [ विषयांशीं ]

---

१. चक्षु, श्रोत्र, घ्राण, जिव्हा, काय व मन. चक्षुआदिक आयतनांचा रूपादि विषयांशीं संयोग झाला म्हणजे चक्षुविज्ञानादिक उत्पन्न होतात. इंद्रिय, विषय आणि विज्ञान हीं तीनही एके ठिकाणीं असलीं म्हणजे त्यास स्पर्श म्हणतात ( तिण्णं संगति फस्सो ).

पुनः पुनः स्पर्श झाल्यामुळेंच बनलेलीं असतात. त्यांना वेदनेपासून तृष्णा, तृष्णेपासून उपादान, उपादानापासून भव, भवापासून जाति, जातीपासून जरा, मरण, शोक, विलाप, दुःख, खेद व त्रास हीं उत्पन्न होतात. पण भिक्षूहो, जेव्हां एखादा भिक्षू सहा स्पर्शायतनें कशीं उत्पन्न होतात, कशीं नाश पावतात, त्यांचा आस्वाद लोक कसा घेतात, त्यांमध्यें भय काय आहे व त्यांपासून सुटका कशी करून घेतां येईल, हें बरोबर जाणतो तेव्हां त्यास त्या सर्व लोकांपेक्षां अधिक ज्ञान झालें असें म्हटलें पाहिजे.

७२ " भिक्षूहो, ज्या श्रमणब्राह्मणांची वरीलप्रमाणें निरनिराळीं मतें असतात, ते सर्व या बासष्ट प्रकारच्या मतांच्या जाळ्यांत सांपडले आहेत, व तेथेंच चिकटून इकडे तिकडे बुड्या मारीत आहेत. जरी त्यांनीं कधीं कधीं डोकें वर काढण्याचा प्रयत्न केला, तरी ते याच जाळ्याला येऊन अडकतात व यांतच सांपडून येथेंच बद्ध होऊन राहतात.

" भिक्षूहो, ज्याप्रमाणें एखादा कोळी अथवा त्याचा चेला आपलें बारीक भोकांचें जाळें सर्व तळ्याभर पसरतो, तेव्हां तो जाणतो कीं, या तळ्यामध्यें वास करणारे सर्व मोठे प्राणी या जाळ्यामध्येंच सांपडले आहेत व येथेंच चिकटून इकडे तिकडे बुड्या मारीत आहेत. जरी त्यांनीं कधीं कधीं डोकें वर काढण्याचा प्रयत्न केला, तरी ते याच जाळ्याला येऊन अडकतात व यांतच सांपडून येथेंच बद्ध होऊन राहतात.

" त्याप्रमाणें भिक्षूहो, ज्या श्रमणब्राह्मणांची वरीलप्रमाणें निरनिराळीं मतें असतात, ते सर्व या बासष्ट प्रकारच्या मतांच्या जाळ्यांत सांपडले आहेत व तेथेंच चिकटून इकडे तिकडे बुड्या मारीत आहेत. जरी त्यांनीं कधीं कधीं डोकें वर काढण्याचा प्रयत्न केला, तरी ते याच जाळ्याला येऊन अडकतात व यांतच सांपडून येथेंच बद्ध होऊन राहतात.

---

१ हा बौद्धांच्या प्रतीत्यसमुत्पाद ( पटिच्चसमुप्पाद ) नांवाच्या कारणमालिकेचा पुढील भाग आहे. त्याविषयीं विवेचन महानिदानसुत्तांत ( दीघ १४ ) व इतरत्र केलेलें आहे.

७३ " भिक्षूहो, तथागताच्या शरीरांतील तृष्णा नष्ट झाली आहे. जोंपर्यंत त्याचें शरीर [ या जगांत ] आहे, तोंपर्यंत देव व मनुष्य यांना तें दिसतें, परंतु शरीराचा भेद होऊन जीविताची परिसमाप्ती झाली म्हणजे देव व मनुष्य यांना तें दिसणें शक्य नाहीं.

" भिक्षूहो, ज्याप्रमाणें आंब्याचा घड देंठापासून तोडला असतां त्या देंठावर जे जे आंबे असतात त्या सर्वांची तीच गत होते, त्याप्रमाणें[2] तथागताचे शरीरांतील तृष्णा नष्ट झाली आहे. जोंपर्यंत त्याचें शरीर [ या जगांत ] आहे, तोंपर्यंत देव व मनुष्य यांना तें दिसतें, परंतु शरीराचा भेद होऊन जीविताची परिसमाप्ती झाली म्हणजे देव व मनुष्य यांना तें दिसणें शक्य नाहीं. "

७४ [ भगवंतांचें ] हें भाषण संपल्यावर आयुष्मान् आनंद भगवंतांस म्हणाला, ' भगवन्, हें खरोखरच आश्चर्यकारक व अद्भुत आहे ! पण भगवन्, या धार्मिक उपदेशाचें नांव काय ? '

' आनंदा, हा धार्मिक उपदेश तूं अर्थजाल, धर्मजाल, ब्रह्मजाल[3] किंवा दृष्टिजाल यांपैकीं कोणत्याही नांवानें लक्ष्यांत ठेव. तसेंच हा युद्धांत मिळालेला अपूर्व विजयच आहे असें तूं समज. '

१ ' उच्छिन्नभवनेत्तिको भिक्खवे तथागतस्स कायो तिट्ठति. ' नेत्ती म्हणजे रज्जु. तिजप्रमाणें फास घालून ओढते म्हणून भवनेत्ती म्हणजे भवतृष्णा. अर्हन्मार्गरूपी शस्त्रानें ज्यानें भवतृष्णारूपी बंधन तोडून टाकिलें आहे असें तथागताचें शरीर आहे.

२. आम्रवृक्षाप्रमाणें तथागताचें शरीर आहे. देंठाप्रमाणें तृष्णा आहे. त्यावरील आंब्यांच्या घडाप्रमाणें तृष्णेवर अवलंबून असणारे पंचस्कंध, द्वादशायतनें व अष्टादशधातू आहेत. ज्याप्रमाणें देंठ कापला कीं त्यावरील आंब्याचा घडही तुटून पडतो, त्याप्रमाणें तृष्णेचा समूळ नाश झाला म्हणजे तिजवर अवलंबून असणारे पंचस्कंधादिक हेही नाश पावतात ( बुद्धघोष ).

३. श्रेष्ठ या अर्थानें ब्रह्म म्हणजे सर्वज्ञताज्ञान येथें सांगितलें आहे, म्हणून याचें नांव ब्रम्हजाल (बुद्धघोष). The Perfect Net, the Master Net, The Boss Net.

असें भगवान् म्हणाले. प्रमुदित अंत:करणानें भिक्षूंनीं या प्रवचनाचा स्वीकार केला. हा उपदेश चालू असतां सहस्र लोकांचा[१] समुदाय हालूं लागला.

ब्रह्मजालसुत्त समाप्त.

---

A Sanskrit redaction of this Sutta is known by a quotation in the Abhidharmakośa. See Minayeff. Melanges Asiatiques de St. Petersbourg vi. 577 ff. The Sûtra seems to get its name from the fact that it explains, how Brahma, believing himself to be the creator, is caught in the net of Error. On the same principle, a series of errors is explained. Possibly the Sanskrit Sûtra did not contain the first part of the Pali edition, as it is quoted as Śîlaskandhikâ ( J. R. A. S. 1906 pp 444--446 ), and occurs in several Suttas of the Dîgha.

Encyclopædia of Religion and Ethics i. 221 note.

१ 'दससहस्सी लोकधातु.' पृथ्वीकंप आठ कारणांनीं होतो. धातुक्षोभानें, ऋद्धिमंतांच्या बलानें, बोधिसत्त्व मातेच्या कुक्षींत गर्भरूपानें शिरतांना, मातेच्या कुक्षींतून बाहेर निघतांना, त्यास संबोधी प्राप्त होते तेव्हां, धर्मचक्रप्रवर्तनसमयीं ( म्हणजे पहिल्या उपदेशाच्या वेळीं ), आयु:संस्कार उत्सर्जन करितांना व परिनिर्वाणसमयीं ( दीघ १६.३.१३-२० ). या तत्त्वाप्रमाणें येथें पृथ्वीकंप होण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. म्हणून बुद्धघोषाचार्य म्हणतात, ' आणखीही आठ वेळीं पृथ्वीकंप झालेला आहे. महाभिनिष्क्रमणकाळीं, बोधिमंडाजवळ जातांना, पंसुकूल घेतांना, पंसुकूल धुतांना, काळकारामसूत्रसमयीं, गोतमकसूत्रसमयीं, वेस्सन्तरजातकसमयीं, व येथें ब्रह्मजालसूत्रसमयीं याशिवाय आणखीही अनेक वेळां पृथ्वीकंप झालेला आहे. उदाहरणार्थ तीन संगीतींच्या वेळीं, महामहेंद्रस्थविर सिंहलद्वीपांत जाऊन धर्मोपदेश करूं लागला तेव्हां, कल्याणियविहारांत पिण्डपातियस्थविरानें हें सूत्र सांगितलें तेव्हां, लोहप्रासादांत अंबलट्ठिका उद्यानांत दीघभाणकस्थविरांनीं हें सूत्र सांगितलें तेव्हां इत्यादि.'

# परिशिष्ट

भगवान् बुद्धांनीं आपल्या हयातींत अनेक प्रसंगीं अनेक उपदेश केले. ते त्या त्या प्रसंगास अनुसरून निरनिराळ्या प्रकारचे होते. त्यांचें अगदीं जुनें वर्गीकरण म्हणजे सुत्त, गेय्य, वेय्याकरण, गाथा, उदान, इतिवुत्तक, जातक, अब्भुतधम्म व वेदल्ल हे नऊ विभाग होत. यावरूनच भगवंतांच्या उपदेशांस नवंगसत्थुसासन असें म्हणत असत. प्रस्तुत सुत्त वेय्याकरण होतें हें या सुत्ताच्या शेवटीं सांगितलेंच आहे.

परंतु पुढें ज्या संगीती भरल्या त्यांतच बहुतकरून या सुत्तांचे त्यांच्या प्रमाणानुरूप विभाग करण्यांत आले असावे. त्यांतील मोठाल्या सुत्तांच्या समूहास दीघनिकाय असें नांव आहे. या दीघनिकायांत एकंदर चौतीस सुत्तें असून त्यांचे तीन भाग केले आहेत. त्यांपैकीं पहिल्या भागास सीलक्खंध असें नांव आहे. सीलक्खंध म्हणजे ज्या सुत्तांत शीलें या नांवाचा भाग आहे अशा सुत्तांचा संग्रह. हीं शीलें या सुत्ताच्या १.८-२७ या भागांत आलीं आहेत व ती सीलक्खंधाच्या प्रत्येक सुत्तांत जशींच्या तशीं आढळून येतात. यावरून या शीलांस पूर्वीं स्वतंत्र अस्तित्व असावें असें दिसतें. त्यांमध्यें भिक्षूनें कोणकोणत्या गोष्टी करूं नयेत व एकंदरीनें आपलें चरित्र शुद्ध कसें राखावें हेंच सांगितलें आहे. तेव्हां अगदीं जुना विनय म्हणजे हीं शीलेंच असावींत. महापदानसुत्तांत ( दीघ १४·३·२८ ) पहिला पातिमोक्ख म्हणजे 'खन्ती परमं तपो तितिक्खा', 'सब्बपापस्स अकरणं', व 'अनूपवादो अनूपघातो' या धम्मपदांतील ( १८४,१८३,१८५ ) तीन गाथा होत असें म्हटलें आहे. या गाथांच्या पुढील पायरी म्हणजे हीं शीलें असावींत व त्यानंतर तो वाढत वाढत जाऊन हल्लींच्या सुत्तविभंगांत आढळणाऱ्या स्थितीस जाऊन पोहोंचला असावा.

या सुत्ताच्या पुढील भागांत बासष्ट दिट्ठी म्हणजे मतें दिलीं आहेत. त्यांचें वर्गीकरण असें:—

पूर्वान्तानुदृष्टिकः—

१—४ शाश्वतवादी. अनेक जन्मांची स्मृती अथवा केवळ तर्क आणि विचक्षणा यांच्या योगानें कांहीं लोकांना जग व आत्मा हे शाश्वत आहेत असें वाटतें. ( १·३०-३४ )

५—८ एकत्यशाश्वतिक. देवलोकांतून खालीं पडल्यामुळें अथवा केवळ तर्क

आणि विचक्षणा यांच्या योगानें यांना जग व आत्मा हे कांहीं अंशानें शाश्वत आहेत असें वाटतें. ( २.१-१३ )

९–१२ अन्तानन्तिक.

( अ ) काणाला जगताला अन्त आहे असें वाटतें.

( आ ) कोणी जग अनन्त व अमर्यादित आहे असं म्हणतात.

( इ ) कोणी जगाला वर व खालीं अन्त आहे, पण तें सभोंवार अनन्त आहे असें समजतात.

( ई ) कोणाला तर्क व विचक्षणा यांच्या योगानें जग अन्तवानही नाहीं व अनन्तही नाहीं असें वाटतें. ( २·१६-२० )

१३–१६ अमराविक्षेपिक. कुशल व अकुशल याविषयीं ज्यांच्या मनांत घोटाळा आहे ते.

( अ ) कोणास वाटतें कीं जर कळल्याशिवाय आपण एखादें मत दिलें तर आपणास इच्छा अथवा द्वेष उत्पन्न होईल.

( आ ) कांहींना वाटतें कीं त्यामुळें आपण त्याच मतास चिकटून राहूं.

( इ ) कांहींस लोकांत फजिती होईल म्हणून वादविवाद करण्याचें भय वाटतें.

( ई ) कोणी मंदबुद्धी व मूढ असतात. ( २-२३-२७ )

१७–१८ अधीत्यसमुत्पन्निक. देवलोकांतून खालीं पडल्यानें अथवा तर्क आणि विचक्षणा यांच्या योगानें यांना आत्मा व जग हीं आपोआप कारणाशिवाय उत्पन्न झालीं आहेत असें वाटतें. ( २·३०-३३ )

अपरान्तानुदृष्टिकः—

१९–५० ऊर्ध्वमाघातनिक.

( अ ) मरणानंतर आत्म्याला संज्ञा असते असें सोळा तऱ्हांनीं प्रतिपादन करितात.

( आ ) नसते असें आठ तऱ्हांनीं प्रतिपादन करितात.

( इ ) मरणानंतर आत्मा संज्ञावानही नसतो व संज्ञाविहीनही नसतो असें आठ तऱ्हांनीं प्रतिपादन करितात. ( २·३८ व ३-१-१६ )

५१–५७ उच्छेदवादी. सात तऱ्हांपैकीं कोणत्याही तऱ्हेचा आत्मा असला तरी त्याचा मरणानंतर समूळ नाश होतो असें प्रतिपादन करणारे.(३·१०-१६)

५८–६२ दृष्टधर्मनिर्वाणवादी. कामांचा भोग घेऊन अथवा चार ध्यानांच्या

योगानें आत्म्याला याच जन्मांत निर्वाणप्राप्ति होते असें प्रतिपादन करणारे. ( ३-२०-२४ )

या मतांचें इतर ठिकाणीं दिलेलें वर्गीकरण जरा निराळें आहे. पासादिकसुत्तांत ( दीघ २९ ) एकंदर मतांचे पुब्बन्तसहगता दिट्ठिनिस्सया व अपरन्तसहगता दिट्ठिनिस्सया असे दोन विभाग केले असून त्यांतील पुब्बन्तसहगतांचे आत्मा व लोक ( १ ) शाश्वत आहेत ( २ ) अशाश्वत आहेत ( ३ ) शाश्वत व अशाश्वत आहेत ( ४ ) शाश्वतही नाहींत व अशश्वातही नाहींत ( ५ ) स्वयंकृत आहेत ( ६ ) परकृत आहेत ( ७ ) स्वयंकृत व परकृत आहेत ( ८ ) स्वयंकृतही नाहींत व परकृतही नाहींत अथवा अधिच्चसमुप्पन्न आहेत असें मानणारे, आणि सुख व दुःख हींही वरीलप्रमाणेंच आठ प्रकारचीं आहेत असें मानणारे, असे सोळा भाग केले आहेत. अपरन्तसहगतांचे आत्मा मरणानंतर अरोगी असून ( १ ) रूपी असतो ( २ ) अरूपी असतो ( ३ ) रूपीही असतो व अरूपीही असतो ( ४ ) रूपीही नसतो व अरूपीही नसतो ( ५ ) संज्ञी असतो ( ६ ) असंज्ञी असतो ( ७ ) नैवसंज्ञीनासंज्ञी असतो ( ८ ) उच्छेद व विनाश पावतो असे मानणारे, असे आठ भाग केले आहेत. अशा रितीनें तेथें फक्त चोवीसच मतें दिलीं आहेत.

पंचत्तयसुत्तांत ( मज्झिम १०२ ) अपरन्तकप्पिक व पुब्बन्तकप्पिक असे दोन विभाग केले असून अपरन्तकप्पिकांचा आत्मा मरणानंतर अरोगी असून ( १ ) संज्ञी असतो ( २ ) असंज्ञी असतो ( ३ ) नैवसंज्ञीनासंज्ञी असतो ( ४ ) उच्छेद व विनाश पावतो, असें मानणारे व ( ५ ) दृष्टधर्मनिर्वाणवादी असे पांच प्रकार सांगितले आहेत. पुब्बन्तकप्पिकांचे सोळा प्रकार सांगितले आहेत, ते वरच्याहून भिन्न आहेत. ते असे—आत्मा व लोक ( १ ) शाश्वत आहेत ( २ ) अशाश्वत आहेत ( ३ ) शाश्वत व अशाश्वत आहेत ( ४ ) शाश्वतही नाहींत व अशाश्वतही नाहींत ( ५ ) अन्तवान आहेत ( ६ ) अनन्त आहेत ( ७ ) अन्तवानही आहेत व अनन्तही आहेत ( ८ ) अन्तवानही नाहींत व अनन्तही नाहींत. ( ९ ) एकत्वसंज्ञी आहेत ( १० ) नानात्वसंज्ञी आहेत ( ११ ) परित्तसंज्ञी आहेत ( १२ ) अप्रमाणसंज्ञी आहेत ( १३ ) एकान्तसुखी आहेत ( १४ ) एकान्तदुःखी आहेत ( १५ ) सुखदुःखी आहेत ( १६ ) अदुःखमसुखी आहेत असें मानणारे. अशा रितीनें येथें फक्त एकवीसच मतें दिलीं आहेत.

यावरून असें दिसून येईल कीं, या मतांची संगती लाविण्याच्या प्रकारांत बराच फरक आहे, व त्यांची संख्याही निरनिराळी आहे. परंतु बासष्ट या संख्येचा उल्लेख अनेक ठिकाणीं आला आहे. त्यावरून असें वाटतें कीं, भगवान् बुद्धांनीं निरनिराळ्या मतांचा अनेकवार उल्लेख केल्यामुळें त्यांची बासष्ट ही एक ठराविक संख्या बनली असावी[1]. परंतु त्यांची संगती ज्या तऱ्हेनें येथें लाविण्याचा प्रयत्न केला आहे ती तऱ्हा मात्र विचित्र आहे. कारण शाश्वतादिक मतांत तीं अनेक जन्मांच्या स्मृतीनें सुचलीं काय किंवा देवलोकांतून पडल्यामुळें बनविलीं असलीं काय अथवा केवळ तर्कानें शोधून काढिलीं असलीं काय, त्यानें मूळ मतांत कांहींच फरक होत नाहीं. तेव्हां खरोखरीं हीं निरनिराळीं मतें नसून एकच मत आहे. या दृष्टीनें पाहिलें तर यांतील जे मूळ आठ भेद आहेत ते व अपरान्तानुदृष्टिकांचीं कांहीं मतें येवढींच खरीं असावींत, व त्यांबद्दल शंका घेण्यास कांहीं जागा दिसत नाहीं. शाश्वतवाद व अशाश्वतवाद हे तर निरंतरचेच प्रश्न आहेत. एकत्यशाश्वतिकवाद हा जैनांच्या प्रसिद्ध स्याद्वादासारखाच आहे. त्याचप्रमाणें अन्तानन्तिकवादाचाही उल्लेख जैनग्रंथांतून आहे. अमराविक्षेपिकवाद तर सामञ्ञफलसुत्तांत संजय बेलट्ठिपुत्त नांवाच्या आचार्याचा आहे असें म्हटलें आहे. मरणानंतर आत्मा संज्ञावान् व अरोगी असून रूपी व अरूपी असतो अशीं अनुक्रमें आजीविक व निगण्ठ यांचीं मतें आहेत असें बुद्धघोषाचार्यांनीं आपल्या अट्ठकथेंत म्हटलें आहे. आत्मा परित्तसंज्ञी आहे असें सांख्यांचें मत आहे व तो अप्रमाणसंज्ञी आहे असें वेदांत्यांचें म्हणणें आहे. उच्छेदवादापैकीं पहिलें मत जैनग्रंथांतून आढळतें. आकिञ्चञ्ञायतनूपग व नेवसञ्ञानासञ्ञायतनूपग आत्मा असतो अशीं मतें अनुक्रमें आळार कालाम व उद्दक रामपुत्त, बुद्धाचे संबोधीपूर्वीचे गुरु, हे प्रतिपादन करीत असत.

शिवाय येथील बासष्ट मतेंच कायतीं अस्तित्वांत होतीं असें धरल्यास गोव्रतिकें,[3]

---

१. सुत्तनिपातांत ( सभियसुत्त २९ ) एकंदर त्रेसष्ट मतें सांगितलीं आहेत.

यानि च तीणि यानि च सट्ठि समणप्पवादितानि भूरिपञ्ञ
सञ्ञक्खरसञ्ञनिस्सितानि ओसरणानि विनेय्य ओघमाग ।

यांत बुद्धाचेंही एक मत धरलें आहे कीं काय ?

२. जैनग्रंथांतून अजीव अरूपी व रूपी असा दोन प्रकारचा आहे असें म्हटलें आहे.

३. 'आजीवकांचे देव आजीवक, निगठांचे निगंठ, जटिलांचे जटिल, परिव्राजकांचे परिव्राजक, अवरुद्धकांचे अवरुद्धक, हत्ती, घोडे, गाई, कुत्रे, कावळे, वासुदेव, बलदेव, पूर्णभद्र, मणिभद्र, अग्नि, नाग, सुपर्ण, यक्ष, असुर, गंधर्व, महाराज, चंद्र, सूर्य, इंद्र, ब्रह्मा, देव, दिशा इत्यादिव्रतिकांचे तेच तेच देव होत.' निद्देस. पृ. ८९( P. T. S. )

कुक्कुरव्रतिक, जटिल, परिव्राजक, आजीवक, निगंठ; आहार, संसार, उत्पत्ति, आवास, यज्ञ, अग्निपूजा यांनीं शुद्धी होते असें प्रतिपादन करणारे, ईश्वरवादी[1], नियतिवादी इत्यादिकांचीं जीं मतें बौद्धग्रंथांतून आढळतात, त्यांचा त्यांत मुळींच समावेश होत नाहीं. तेव्हां असें दिसतें कीं ज्यानें हें सूत्र रचिलें त्यास बुद्धानें बासष्ट मतांचा उल्लेख अनेकवार केला होता एवढी स्मृती होती. परंतु तीं कोणतीं हें बरोबर माहित नसल्याकारणानें त्यानें कोणत्या तरी रितीनें मतांची भरती करण्याचा प्रयत्न केला असावा व त्यामुळेंच अशा विचित्र तऱ्हेनें त्य मतांची येथें पूर्तता करण्यांत आली असावी.

---

१ जातक ५२८ येथं अहेतुकवादी, इस्सरकारणवादी, पुब्बेकतवादी. उच्छेदवादी व खत्तविज्जावादी अशा पांच अमात्यांचा उल्लेख आहे.

# २ सामञ्ञफलसुत्तं.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके वेळीं भगवान् [ बुद्ध ] राजगृहामध्यें जीवक कोमारभच्चाच्या अंबवनामध्यें साडेबाराशे भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित रहात होते. त्यावेळीं मगध देशाचा राजा वेदेहिपुत्त अजातसत्तु कार्तिकी पौर्णिमेस उपोसथाच्या दिवशीं कमलें उमललीं असतांना, रात्रीं स्वच्छ चांदणें पडलें असतांना, मांडलिक व अमात्य यांसहित राजवाड्याच्या गच्चीवर बसला होता. तेथें आनंदानें तो पुढीलप्रमाणें बोलला, " ही चांदण्याची रात्र किती रमणीय, किती सुंदर, किती रम्य, किती मनोहर, व सुलक्षण आहे ! कोणत्या श्रमणाची अथवा ब्राह्मणाची आज सेवा करावी कीं त्यामुळें आमच्या चित्तास शांति मिळेल ? "

२ त्यानें असें म्हटल्यावर एक अमात्य त्यास म्हणाला " महाराज, पूरण कस्सप नांवाचा संघाचा व गणाचा नायक व गुरु, नामांकित, कीर्तिमान्, तीर्थकर, बहुजनसंमत, अनुभविक, पुष्कळ काळपर्यंत प्रव्रज्याधर्मानें वागणारा, असा एक पोक्त व म्हातारा मनुष्य आहे. त्याची महाराजांनीं आज सेवा करावी. त्यामुळें कदाचित् महाराजांच्या मनास शांती मिळेल. " असें तो बोलल्यावर अजातसत्तु राजा स्तब्ध राहिला.

३-७ [ याप्रमाणें निरनिराळ्या अमात्यांनीं अनुक्रमें मक्खलि गोसाल, अजित केसकंबली, पकुध कच्चायन, संजय बेलट्ठिपुत्त, व निगंठ नातपुत्त यांचीं नांवें सुचविलीं. पण अजातसत्तु राजा स्तब्धच राहिला. ]

८ त्यावेळीं जीवक कोमारभच्च अजातसत्तुराजाच्या जवळ बसला होता. त्याला राजा म्हणाला, " मित्रा जीवका, तूं कां असा स्तब्ध बसला आहेस ? "

---

१. या सुत्ताचा उल्लेख जातक १५० व ५३० येथें आला आहे. त्यांतील पहिल्या ठिकाणीं या सुत्ताचे दोन भाणवार आहेत असें म्हटलें आहे. Rockhill P. 95 ही पहा.

२. या सुत्ताच्या शेवटीं दिलेल्या टीपा पहा.

३. चातुमासिनी. चातुर्मास्यांतील शेवटची.

४. दोन्ही अष्टमी, पौर्णिमा व कृष्ण चतुर्दशी या चार दिवसांना उपोसथ म्हणतात. या दिवशीं गृहस्थ व गृहिणी यांनीं धर्मचिंतनांत काल घालवावयाचा असतो. प्रो. कोसंबी. बुद्ध, धर्म आणि संघ. पृ. ३१. Kern P. P. 99-100.

" महाराज, अर्हत् सम्यक्संबुद्ध भगवान् [ बुद्ध ] हल्लीं साडेबाराशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित माझ्या अंबवनांत रहात आहे. त्या भगवान् गौतमाची अशी कीर्ति पसरली आहे कीं अर्हत्, सम्यक्संबुद्ध, विद्या व आचरण यांनीं संपन्न, सुगत, सर्व लोक जाणणारा, सर्वश्रेष्ठ, दमन करण्यास योग्य अशा जनांचा मार्गदर्शक व देव आणि मनुष्य यांचा शास्ता असा भगवान् बुद्ध आहे. त्याची महाराजांनीं आज सेवा करावी. त्यामुळें कदाचित् महाराजांच्या मनास शांती मिळेल. "

" तर मग, मित्रा जीवका, बसावयाचे हत्ती तयार ठेविण्यास सांग. "

९ " होय महाराज, " असें अजातसत्तुराजास उत्तर देऊन पांचशें हत्तिणी व राजास बसण्यास योग्य असा एक हत्ती तयार ठेवून जीवकानें राजास वर्दी दिली कीं, " महाराज, हत्ती तयार आहेत. पुढें जशी महाराजांची मर्जी. " नंतर अजातसत्तुराजा त्या पांचशें हत्तिणींवर प्रत्येकीं एक अशा स्त्रिया बसवून, आपण स्वतः एका हत्तीवर आरोहण करून, मशालींच्या उजेडांत मोठ्या थाटानें राजगृहांतून जीवकाच्या अंबवनाकडे जाण्यास निघाला.

१० अंबवनाच्या नजीक आल्यावर अजातसत्तुराजा एकदम घाबरून जाऊन त्याच्या अंगावर भयानें कांटा उभा राहिला. धडकी भरून त्यानें जीवकास विचारिलें, " मित्रा जीवका, तूं माझा घात तर करीत नाहींस ना ? मला शत्रूच्या हातांत देण्याचा तर तुझा बेत नाहींना ? नाहीं तर साडेबाराशें भिक्षूंच्या या मोठ्या समुदायामध्यें थोडें देखील शिंकणें किंवा खोकणें किंवा दुसरा कसलाही आवाज ऐकूं कसा येत नाहीं ? "

---

१. ' राजा कां घाबरला ? कांहीं म्हणतात अंधारामुळें. परंतु मशालींच्या उजेडांत अंधार कसा राहणार ? तेथें सर्वत्र शांतता असल्याकारणानें जीवकाविषयीं त्याच्या मनांत विकल्प येऊन तो घाबरला हें पुढील वाक्यावरून स्पष्टच आहे. त्यानें आपल्या बापास मारिलें असल्याकारणानें आपल्या जिवासही कोणी अपाय करणार नाहींना अशी भीति त्यास नेहमीं वाटत असे. ( बुद्धघोष ).

" महाराज, घाबरूं नका, घाबरूं नका. आपणाला फसवून मी आपला घातही करीत नाहीं किंवा आपणास शत्रूच्या हातांत देण्याचाही माझा बेत नाहीं. महाराजांनीं [ बिनधोक ] पुढें चलावें. हे पहा मंडपामध्यें दिवे जळत आहेत. "

११ नंतर राजा जेथपर्यंत हत्ती नेण्याची जागा होती तेथपर्यंत हत्ती नेऊन तेथें हत्तीवरून खालीं उतरून पायींच मंडपाच्या दाराकडे गेला. तेथें गेल्यावर त्यानें जीवकाला भगवान् कोठें आहेत म्हणून विचारिलें.

" ते पहा, महाराज, मधल्या खांबाला टेंकून पूर्वेकडे तोंड करून भिक्षुसंघाच्या समोर भगवान् बसले आहेत. "

१२ नंतर राजा भगवान् बसले होते तेथें जवळ जाऊन एके बाजूस उभा राहिला व शांत तळ्याप्रमाणें पूर्णपणें स्तब्ध बसलेल्या भिक्षुसंघाकडे नजर टाकून आनंदित होऊन पुढीलप्रमाणें बोलला, " सध्या भिक्षुसंघ जितका शांत आहे, तितका शांत माझा पुत्र उदायिभद्द[1] असावा. "

" महाराज, आपल्या प्रेमास अनुसरूनच आपण बोललां[2]. "

" भगवन्, उदायिभद्दावर माझें प्रेम आहे. सध्या भिक्षुसंघ जितका शांत आहे तितका शांत माझा पुत्र असावा. "

१३ नंतर राजा भगवंतांस प्रणाम करून व भिक्षुसंघास हात जोडून एका बाजूस बसला व भगवंतांस म्हणाला, " प्रश्न विचारण्यास हरकत नसल तर भगवंतांना मला थोडें विचारावयाचें आहे. "

" महाराज, आपल्या इच्छेस येईल तें विचारावें. "

१४ " भगवन्, महात, घोडेस्वार, सारथी, धनुर्धर, युद्धांमध्यें निशाण

---

१. बौद्ध व जैन ग्रंथांत यानें पाटलिपुत्र नगराची स्थापना केली असें म्हटलें आहे.

२. मूळ-' अगमा खो त्वं महाराज यथापेमं. ' अट्ठकथा-' महाराज, यथा उण्णमे वुट्ठं उदकं येन निन्नं तेन गच्छति, एवमेव त्वं भिक्खुसंघं अनुविलोकेत्वा येन पेमं तेन अनुगतोऽसि. ' ऱ्हिस् डेव्हिड्स् यांनीं ' Do your thoughts go where love guides them ? ' असें चुकीचें प्रश्नार्थक भाषांतर केलें आहे. Rockhill p. 99 पहा. ' Great is the love thou hast shown him. '

धरणारे, सैन्यांतील व्यवस्थापक, साहसी सैनिक, मोठमोठे राजपुत्र, हल्ला करणारे, हत्तीसारखे बलवान् पुरुष, शूर सैनिक, कातडी आरमार घालून लढणारे, दासीपुत्र, आचारी, न्हावी, स्नान घालणारे, मिठाईवाले, मालाकार, धोबी, कोष्टी, बुरूड, कुंभार, गणिती, हिशेबनीस व असेच आणखी अनेक तऱ्हेचे धंदे करणारे लोक, हे याच आयुष्यांत आपल्या डोळ्यादेखत आपल्या धंद्याचें फल उपभोगितात, स्वतःस, मातापितरांस, बायकामुलांस व मित्रांस सुख व आनंद देतात, व श्रेष्ठ फल मिळावें, स्वर्गप्राप्ति व्हावी, सुख प्राप्त व्हावें, व उत्तम स्थानाची प्राप्ति व्हावी म्हणून श्रमण व ब्राह्मण यांस दक्षिणा देतात. याप्रमाणें याच जन्मांत डोळ्यांनीं दिसण्यासारखें श्रामण्याचें फल मिळणें शक्य आहे काय ? ”

१५ “ महाराज, हाच प्रश्न पूर्वी दुसऱ्या कोणास विचारल्याचें स्मरतें काय ? ”

“ होय, भगवन्. ”

“ मग त्यांनीं त्याचें काय उत्तर दिलें ? जर कांहीं हरकत नसेल तर महाराजांनीं सांगावें. ”

“ जेथें भगवान् किंवा त्यांच्यासारखे दुसरे बसले असतील तेथें मुळींच हरकत नाहीं. ”

“ तर मग बोलावें, महाराज. ”

१६ “ एके समयीं मी पूरण कस्सपाकडे गेलों व नमस्कार करून कुशल प्रश्न विचारून एकीकडे बसलों, आणि एका बाजूस बसून हाच प्रश्न मीं त्यास विचारिला.

१७ “ तेव्हां पूरण कस्सप मला म्हणाला, ‘ एखाद्यानें कांहीं केलें अथवा करविलें, कापिलें अथवा कापविलें, त्रास दिला अथवा देवविला, शोक

१. पिण्डदायिका ते शत्रूच्या सैन्यांत जाऊन पिण्डाप्रमाणें त्यांचे तुकडे करीत करीत हल्ला करितात. किंवा पिण्डदायिका. सैन्यास अन्नपाणी पुरविणारे. ( बुद्धघोष ).

२. सूयगडंग १·१·१·१३.

कुव्वं च कारयं चेव सव्वं कुव्वं न विज्जइ

एवं अकारओ अप्पा एवं तेउ पगब्भिआ ।

अंगुत्तर १·६२ पहा.

केला, त्रास झाला अथवा दिला, एकाद्यास भय वाटलें किंवा त्यानें दुसऱ्यास भय दाखविलें, प्राण्यास ठार मारिलें, चोरी केली, घरफोडी केली, दरोडा घातला, एखाद्या घरांतील कांहीं चोरलें किंवा वाटमारी केली, परदारागमन केलें, असत्य भाषण केलें, तरी त्यास पाप लागत नाहीं. तीक्ष्ण धारेच्या चक्रानें जरी एखाद्यानें या पृथ्वीवरील प्राण्यांच्या मांसाची एक रास केली अथवा एक ढीग केला, तरी त्यांत मुळींच पाप नाहीं, त्यापासून कांहींही पाप लागत नाहीं. गंगानदीच्या दक्षिण[1] तीरावर जाऊन जरी एखाद्यानें हाणमार केली, कापलें अथवा कापविलें, त्रास दिला अथवा देवविला, तरी त्यांत मुळींच पाप लागत नाहीं; गंगानदीच्या उत्तर[2] तीरावर जाऊन जरी एखाद्यानें दानें दिलीं व देवविलीं, यज्ञ केले अथवा करविले, तरी त्यापासून मुळींच पुण्य[3] लागत नाहीं. दान, धर्म, संयम, सत्य भाषण, यांच्या योगानें पुण्य लागत नाहीं, त्यांत मुळींच पुण्य नाहीं.'

१८ "याप्रमाणें पूरण कस्सपाला मीं श्रामण्याचें फल विचारिलें असतां त्यानें मला आक्रियावाद[4] सांगितला. ज्याप्रमाणें एखाद्यास आंब्याविषयीं विचारिलें असतां त्यानें लबुजाचें[5] वर्णन करावें, व लबुजाविषयीं विचारिलें असतां आंब्याचें वर्णन करावें, त्याप्रमाणें पूरण कस्सपाला मीं श्रामण्याचें फल विचारिलें असतांना त्यानें मला अक्रियावाद सांगितला. तेव्हां मला असें वाटलें कीं, 'माझ्या राज्यामध्यें रहाणाऱ्या श्रमणाला अथवा ब्राह्मणाला त्रास कसा द्यावा?' म्हणून मी पूरण कस्सपाच्या भाषणाचा

---

१. गंगेच्या दक्षिण तीरावरील माणसें क्रूर व साहसी असतात ( बुद्धघोष ).

२. गंगेच्या उत्तर तीरावरील माणसें श्रद्धावान् आणि बुद्ध, धर्म व संघ यांवर प्रेम करणारीं असतात ( बुद्धघोष ).

३. सूयगडंग २·१·२४ 'से किणं किणावेमाणे हणं घायमाणे पयं पयावेमाणे अवि अंतसो पुरिसमविक्किणित्ता घायइत्ता एच्छंऽपि जाणाहि णच्छिच्छ दोसो ।'

४. महावग्ग ६·३१·५ पहा. अकिरियावाद is the doctrine that the actions of sentient beings receive not their reward according to the law of moral retribution. अंगुत्तर ३·१३५ येथें मक्खलिगोसाल अक्रियावादी आहे असें म्हटलें आहे.

५. सं. लकुच ( ! ). Bread-fruit ओट अथवा क्षुद्रकपनस ( अमरकोश. )

स्वीकार किंवा प्रतिकार कांहींच न करितां, व जरी मला त्याचें भाषण आवडलें नाहीं, तरीं तसें बोलून न दाखवितां, त्याचा स्वीकार न करितां पण तें खरें आहे असें न मानितां, तेथून उठून आलों.

१९ "अशाच रितीनें एकदां मक्खलि गोसालास हा प्रश्न मीं विचारिला असतां त्यानें पुढीलप्रमाणें उत्तर दिलें:—

२० " 'प्राण्यांच्या अपवित्रतेस कांहींही हेतु नाहीं, कांहींही कारण[1] नाहीं. हेतूशिवाय, कारणाशिवायच प्राणी अपवित्र होतात. प्राण्यांच्या शुद्धतेस कांहींही हेतु नाहीं, कांहींही कारण नाहीं. हेतूशिवाय, कारणाशिवायच प्राणी शुद्ध होतात. स्वतःच्या सामर्थ्यानें कांहीं होत नाहीं, दुसऱ्याच्या सामर्थ्यानें कांहीं होत नाहीं, पुरुषाच्या सामर्थ्यानें कांहीं होत नाहीं, बल नाहीं, वीर्य नाहीं, पुरुषाची शक्ती किंवा पराक्रम हीं कांहींही नाहींत, सर्व सत्त्वें[3], सर्व प्राणी[4], सर्व भूतें[5], सर्व जीवें[6], अवश,

---

१. या मतांस अहेतुवाद असें नांव देण्यास हरकत नाहीं. संयुत्त २२.६० येथें महालीनें हें मत पूरणाचें म्हणून दिलें आहे, व तें बुद्धानें पुढीलप्रमाणें खोडून काढिलें आहे. 'जर रूपादि पंचस्कंध पूर्णपणें दुःखकारक असते, तर कोणीही त्यांमध्यें रत झाला नसता. ते सुखकारक आहेत म्हणून प्राणी त्यांमध्यें रत होतात व संयोगामुळें क्लेश पावतात. हें सत्वांच्या संक्लेशास कारण आहे. जर रूपादि पंचस्कंध पूर्णपणें सुखकारक असते, तर कोणासही त्यांचा वीट आला नसता. परंतु ते दुःखकारक आहेत म्हणून प्राण्यांस त्यांचा वीट येतो व संगविनाशामुळें ते शुद्ध होतात. हें सत्वांच्या विशुद्धीस कारण आहे.'

संयुत्त ४६.५६ येथें अभयकुमारानें असेंच मत पूरणाचें म्हणून दिलें आहे. तेव्हां बुद्ध म्हणतात, 'ज्ञानास व अज्ञानास हेतु आहे, कारण आहे. जेव्हां चित्त कामरागानें परिपूर्ण होतें, तेव्हां मनुष्यास कामराग कसा घालवावा हें कळत नाहीं. जेव्हां मनुष्य सतिसंबोज्झंगाची भावना करितो, तेव्हां त्यास हें यथायोग्य कळतें.'

संयुत्त २४.७ येथें बुद्ध म्हणतात, 'जर स्कंध अनित्य आहेत हें कळून येईल, तर हें मत नाहींसें होईल.' जातक ५२८ येथेंही अहेतुवादी अमात्याचें मत 'इमे सत्ता संसारसुद्धिका' असें असल्याचें दिलें आहे.

२. उवासगदसाओ १६६

नत्थि उट्ठाणे इ वा कम्मे इ वा बले इ वा वीरिए इ वा पुरिसक्कारपरक्कमे इ वा नियया सव्वभावा।

३. उंट, बैल, गाढव वगैरे प्राणी. ४. एक अथवा अधिक इंद्रियें असणारे. ५. अण्डज, गर्भांतून उत्पन्न झालेले वगैरे. ६ साळी, यव, गहूं वगैरे. उत्तरज्झयण २९.१७ व दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं हे चारही याच अनुक्रमानें आढळतात. जैनांच्या दृष्टीनें त्यांचे अर्थ पुढीलप्रमाणें आहेत. प्राण म्हणजे दोन ते चार इंद्रियें असणारे. जीव म्हणजे पांच इंद्रियें असणारे. भूत म्हणजे वनस्पती. सत्व म्हणजे बाकीचे राहिलेले.

Prof. Jacobi यांनीं 'Every sentient being, every insect, every living thing, whether animal or vegetable' असें भाषांतर केलें आहे.

दुर्बल व निर्वीर्य आहेत. ते नशीब, जातिवैशिष्ट्य व स्वभाव यांच्या योगानें बदलत असतात, व सहांपैकीं कोणत्या तरी जातींत राहून सुख-दुःखाचा उपभोग घेत असतात.

"' मुख्य योनी चवदा लक्ष आहेत, व आणखी सहा हजार व सहाशें

---

१. या सहा जाती रंगावर ( वर्ण ) बसविलेल्या आहेत. त्या अशा–
१ कृष्ण–ओरब्भिक, सूकरिक, साकुणिक, मार्गविक, लुद्द, मच्छघातक, चोर, चोरघातक, बंधनागारिक व दुसरेही क्रूर कर्म करणारे.
२ नील–भिक्षू, कंटकवृत्तिक व दुसरेही कर्मवादी क्रियावादी.
३ लोहित—निगण्ठ, एकसाटक.
४ हरिद्र—गिही ओदातवसन व अचेलकसावक.
५ शुक्ल—आजीवक व आजीविकी.
६ परमशुक्ल—नंद वच्छ, किस संकिच, व मक्खलि गोसाल.

त्या वेळच्या बहुतेक आचार्यांनीं या मताचा अंगीकार केलेला दिसतो, कारण बौद्धग्रंथांतून हें मत निरनिराळ्या आचार्यांचें म्हणून दिलें आहे ( मज्झिम ७६. संयुत्त २४.८ पकुध कच्चायन, तिबेटी दुल्वा अजित केतकंबली, अंगुत्तर ६.६७ पूरण कस्सप ). जैनांच्या प्रसिद्ध लेश्या याही अशाच प्रकारच्या आहेत. (उत्तरज्झयण ३४). महाभारत १२.२८६ येथेही अशा तऱ्हेचे षड्जीववर्ण दिले आहेत. तसेंच पातंजल योगसूत्रें ४. ७ पहा. 'The belief in colors of the soul seems to be very old and to go back to the time when expressions like 'a black soul', 'a bright soul', were understood in a literal sense' ERE vii 469 note.

२. तिबेटी दुल्वामध्यें १४०००, ६०००० व ६०० असें म्हटलें आहे (Rockhill p.103.) तेथें हें मत अजित केसकंबलीचें म्हणून दिलें आहे. मज्झिम ७१ येथें तें जें मत पकुध कच्चायनाचें आहे त्यांत मतांत दिलें आहे.

भगवती १२३७ येथें 'पूज्य काश्यप, माझ्या मताप्रमाणें पूर्वी पूर्णत्वास पोहोंचलेले, आतां पोहोंचत असलेले व पुढें पोहोंचणारे या सर्वांना चौऱ्यांयशी लक्ष महाकल्पांच्या फेऱ्यांतून गेलेंच पाहिजे. त्यांमध्यें ते सातदां देव, सातदां संजूह, सातदां संज्ञीगर्भ होऊन व सातदां पुन्हां जन्म घेऊन पांच लक्ष ( किंवा पांच, एक लक्ष ) सहा हजार व सहाशें कर्मांतून व तीन कर्मांतून मुक्त होऊन पूर्णत्वास पोहोंचतात,' असें आपलें मत असल्याचें गोसालानें महावीरास सांगितलें आहे. चवदा लक्ष योनी म्हणजे सात देव व सात मनुष्यजन्म अथवा सात पिशाच्च व सात संज्ञीगर्भ या जोड्या घ्याव्यात.

Hoernle. उवासगदसाओ App. II. p. 19-21.

भगवती १२३९–४१; Rockhill p. 254. 'अनंत संजूहांनंतर देवसंजूह व संज्ञीगर्भ असे आळीपाळीनें चवदा जन्म घेऊन नंतर सात पुनर्जन्म घ्यावे लागतात.' हे चवदा आळीपाळीनें जन्म येणेंप्रमाणें:—१ वरिष्ठ माणस संजूहामध्यें देव. २ पहिल्या प्रतीचा संज्ञीगर्भ. ३ मध्यम माणससंजूहामध्यें देव. ४ दुसऱ्या प्रतीचा संज्ञीगर्भ. ५ कनिष्ठ माणससंजूहामध्यें देव ६ तिसऱ्या प्रतीचा संज्ञीगर्भ. ७ वरिष्ठ माणसुत्तरसंजूहामध्यें देव. ८ चवथ्या प्रतीचा संज्ञीगर्भ. ९ मध्यम माणसुत्तरसंजूहामध्यें देव. १० पांचव्या प्रतीचा संज्ञीगर्भ. ११ कनिष्ठ माणसुत्तरसंजूहामध्यें देव. १२ सहाव्या प्रतीचा संज्ञीगर्भ. १३ ब्रह्मलोकांत देव. १४ सातव्या प्रतीचा संज्ञीगर्भ. Hoernle. App. II. p. 20.

आहेत. कर्में पांचशें आहेत, व आणखी पांच आहेत आणि शिवाय तीन आहेत. त्याचप्रमाणें पूर्णकर्म व अर्धकर्म अशीं निराळीं आहेतच. बासष्ट मार्ग आहेत, बासष्ट अन्तरकल्प आहेत, सहा जाति, आठ पुरुषभूमी, एकूणपन्नासशें उपजीविकेचे मार्ग, एकूणपन्नासशें परिव्राजक, पन्नासशें नागभुवनें, दोन हजार इंद्रियें, तीन हजार निरय, छत्तीस धुळीनें भरलेलीं स्थानें, सात संज्ञावान् गर्भ, सात विसंज्ञी गर्भ, सात निर्ग्रंथि[12] गर्भ, सात देव, सात मनुष्यें, सात पिशाचें, सात सरोवरें, सात मोठे पतुवा व आणखी सातशें पतुवा, सात मोठमोठे धबधबे व आणखी सातशें लहान लहान धबधबे, सात मुख्य स्वप्नें व सातशें लहानसहान स्वप्नें आहेत.

" 'शहाणे व मूर्ख दोघेही चौऱ्यांशीं लक्ष महाकल्पांच्या फेऱ्यांतून गेल्या-

१. पंच इंद्रियांकडून होणारीं कर्में. २. कायकर्म, वाक्कर्म व मनोकर्म. ३. कायकर्म व वाक्कर्म. ४. मनोकर्म. ५. एका कल्पांत खरोखरी चौसष्ट अन्तरकल्प असतात. परंतु गोसालास बासष्टच माहिती असल्याकारणानें त्यानें असें म्हटलें आहे ( बुद्धघोष ). ६. वर दिल्याप्रमाणें. ७. मंदभूमि (जन्मानंतर सात दिवस), खिड्डाभूमि (हसणें, रडणें), पदवीमंसभूमि ( उभें राहण्याचा प्रयत्न करणें ), उजुगतभूमि (उभें राहून चालूं लागणें), सेखभूमि ( शिल्प शिकणें ), समणभूमि ( श्रमण बनणें ), जिनभूमि ( सर्वज्ञ होणें ), व पन्नभूमि ( दुर्बल होऊन पडून राहणें ) अशा आठ स्थिती पुरुषास जन्मांमध्यें प्राप्त होतात ( बुद्धघोष ). ८. आजीवका ( सयामी प्रत ). ९. हत्थपिट्ठिपादपिट्ठादीनि. हातापायांचे तळवे इत्यादि ( बुद्धघोष ). Hoernle ( उवा० App. II) tables ( हाथपीठ ), foot-stools ( पादपीठ ), असें म्हणतात. कल्पसूत्र, सामाचारी ४३ येथील सिणेहाययना ( places which retain moisture) पहा. १०. उंट, बैल, गाढव, बोकड, पशु [ एडके (टीका) Sheep (Hoernle) ], हरिणें, रेडे (बुद्धघोष). ११. साळी, यव, गहूं, मुग, कंगु, वरक, कुद्रूसक ( बुद्धघोष ). १२. झाडांच्या डोळ्यांमध्यें असलेले गर्भ, उंस, बांबू वगैरे ( बुद्धघोष ). १३. कण्णमुण्ड, रथकार, अनोतत्त, सीहप्पपात, छद्दन्त ( अथवा तियग्गल ), मन्दाकिनी ( अथवा मुचलिंद ) व कुणाल ( बुद्धघोष ). १४. पचुटा, पवुधा, सपुटा असेही पाठ आहेत. गण्ठिका ( बुद्धघोष ), सब्बगण्ठिका ( टीका ). Rockhill, p. 103 गण्ठिका=गंडिका hill declivity ( ? ); writings (?) proofs (?) १५. ' मोठ्या तळ्यांतील पाणी दर शंभर वर्षांनीं कुश गवताच्या काडीनें एक थेंब असें बाहेर काढून अशा रितीनें सातदां तें निरुदक केलें. म्हणजे एक महाकल्प होतो (बुद्धघोष). गोलासाची कल्पना पुढीलप्रमाणें आहे. 'गंगानदी पांचशें योजनें लांब, अर्धे योजन रुंद व पांचशें धनु खोल आहे. अशा नद्या सात असून प्रत्येक मागलीच्या सातपट असते. शेवटलीमधील दर शंभर वर्षांनीं वाळूचा एक कण अशा रितीनें सर्व वाळू खलास करण्यास जो वेळ लागेल त्यास सर म्हणतात. तीन लाख सर म्हणजे एक महाकल्प व चौऱ्यांयशी लक्ष महाकल्पें म्हणजे एक महामाणस होतो.' भगवती १५.५३८-३९.

वर मग त्यांचा नाश होतो. 'या शीलानें, व्रतानें, तपानें अथवा ब्रह्मचर्यानें मी अपरिपक्व कर्म पक्व करीन, किंवा परिपक्व झालेल्या कर्माचीं फळें भोगून तें नाहिंसें करून टाकीन,' असें जरी एखाद्यानें म्हटलें, तरी तें व्हावयाचें नाहीं. या संसारांत सुखदुःखें परिमित, द्रोणांनीं मोजण्यासारखीं ठरावीक आहेत, व ती कमीजास्ती किंवा अधिकउणीं करितां येणार नाहींत. ज्याप्रमाणें सुताची गुंडी फेंकली असतां पूर्ण उलगडेपर्यंतच ती जाईल, त्याप्रमाणें शहाणे व मूर्ख [संसाराच्या] फेऱ्यांतून गेल्यावरच त्यांच्या दुःखाचा नाश होतो.'

२१ "याप्रमाणें मीं मक्खलि गोसालाला श्रामण्याचें फल विचारिलें असतां त्यानें मला संसारशुद्धीवर व्याख्यान दिलें.

२२ "अशाच रितीनें एकदां आजित केसकंबलीला हा प्रश्न मीं विचारिला असतां त्यानें पुढीलप्रमाणें उत्तर दिलें:—

२३ "'महाराज, दान, यज्ञ, होम हीं कांहींही नाहींत, चांगल्या वाईट कर्माचें फल अथवा परिणामही नाहींत. इहलोक, परलोक, माता पिता अथवा ओपपातिक सत्वेंही नाहींत. इहलोक व परलोक जाणून व नीट ओळखून दुसऱ्यास शिकविणारे, सर्व जाणणारे व योग्य मार्गानें जाणारे श्रमण व ब्राह्मणही या जगांत नाहींत.

"'मनुष्य चार महाभूताचा बनलेला आहे. जेव्हां तो मरतो, तेव्हां त्याच्यामधील पृथ्वीधातू पृथ्वीस, आपोधातू पाण्यास, तेजोधातू तेजास, व वायोधातू वायूस जाऊन मिळते, आणि इंद्रियें आकाशाप्रत जातात. मेलेल्या माणसास चार पुरुष तिरडीवर घालून वाटेंत त्याचे गुण गात गात स्मशानांत

---

१. एक प्रकारचें माप= ४ आढक. २. मज्झिम १२. 'सन्ति एके समणब्राह्मणा एवंवादिनो–संसारेन सुद्धीति'। ३. सूयगडंग १. १. १. ११-१२

नच्छि पुण्णे च पावे वा नच्छि लोए इतो परे
सरीरस्स विणासेणं विणासो होइ देहिणो।
पत्तेअं कसिणे आया जे बाला जे अ पंडिआ
संति पिच्चा न ते संति नच्छि सत्तोववाइया।

४. पृ. २९ टीप पहा. याविषयीं सविस्तर विवेचन Windisch. Buddha's Geburt Kap. XI यांत केलें आहे तें पहावें. ५. पंचेन्द्रियें व मन.

घेऊन जातात. तेथें त्याच्या अस्थी पांढऱ्या[1] होतात व आहुती भस्मरूप होऊन जातात[2]. दानाचें हें खूळ मूर्ख माणसांनीं काढिलें आहे. जे कोणी आस्तिकवाद सांगतात, त्यांचें तें बोलणें निवळ खोटें आणि व्यर्थ बडबड आहे. शहाणे व मूर्ख दोघांचाही शरीरभेदानंतर उच्छेद व विनाश होतो. मरणानंतर त्यांचें कांहींही उरत नाहीं.'

२४ "याप्रमाणें मीं आजित केसकंबलीला श्रामण्याचें फल विचारिलें असतां त्यानें मला उच्छेदवाद[3] सांगितला.

२५ "अशाच रितीनें एकदां पकुध कच्चायनाला हा प्रश्न मीं विचारिला असतां त्यानें पुढीलप्रमाणें उत्तर दिलें[4]:—

२६ "'महाराज, पुढील सात गोष्टी केलेल्या किंवा करविलेल्या, निर्मिलेल्या किंवा निर्माण करविलेल्या नसून, वंध्य, पर्वतशिखराप्रमाणें स्थिर व स्तंभाप्रमाणें अचल आहेत. त्या हलत नाहींत, बदलत नाहींत, एकमेकांस त्रासदायक होत नाहींत, व एकमेकांचें सुख, दुःख अथवा दोन्हींही घडवून आणण्यास समर्थ नाहींत. कोणत्या सात ? तर पृथ्वी, आप, तेज, वायु, सुख, दुःख, व जीव या होत. यांना मारणारा, मारविणारा, त्या ऐकणारा, सांगणारा, जाणणारा अथवा वर्णन करणारा, कोणीही नाहीं. जो तीक्ष्ण शस्त्रानें एखाद्याचें डोकें कापितो, तो कोणाचेंही जीवित

---

१. 'कापोतकानि.' कपोतवर्ण. २. सूयगडंग २. १. १५. 'आदाहणाए परेहि निज्जइ, अगणिज्झामिते सरीरे कपोतवण्णाइं अट्ठीनि आसंदीपंचमा पुरिसा गामं पच्चागच्छंति.'

३. जातक ५२८ येथें उच्छेदवादी अमात्याचें मत 'इतो परलोकगता नाम नत्थि, अयं लोको उच्छिज्जति' असें दिलें आहे. महावग्ग ६·३१·७ ही पहा. जातक ५४४ येथेंही अंगतिराजास गुण आजीविकानें असेंच उत्तर दिलें आहे ( ३४-३९ ).

४. सूयगडंग २. १. २२.

'नं च पिहुद्देसेणं पुढोभूतसमवातं जाणेज्जा तं जहा पुढवी एगे महब्भूते आउ दुच्चे महब्भूते तेउ तच्चे महब्भूते वाउ चउच्छे महब्भूते आगासे पंचमे महब्भूते इच्चेते पंच-महब्भूया अणिम्मिया अणिम्माविता अकडा णोकित्तिमा णोकडगा अणाइया अणिहणा अवंझा अपुरोहिता सतंता सासता आयछट्ठा पुण एगे एवमाहु सतो णच्छि विणासो असतो णच्छि संभवो.' जातक ५४४ ४०-४५ पहा.

हरण करीत नाहीं. [ कारण ] या सात गोष्टींच्या मधल्या जागेंत शस्त्रानें प्रवेश केला इतकेंच कायतें.'

२७ "याप्रमाणें मीं पकुध कच्चायनाला श्रामण्याचें फल विचारिलें असतां त्यानें भलतेंच कांहीं तरी सांगितलें.

२८ "अशाच रितीनें एकदां निगण्ठ नातपुत्ताला हा प्रश्न विचारिला असतां त्यानें पुढीलप्रमाणें उत्तर दिलें[1]:—

२९ "'महाराज, निगण्ठ चार तऱ्हेच्या संवरानें संवृत[2] असतो. सर्व पाण्यापासून[3] तो अलिप्त असतो, सर्व पापापासून तो अलिप्त असतो, त्यानें सर्व पाप धुवून टाकिलें आहे, व तो सर्व पापनाशानें भरलेला असतो. अशा चार तऱ्हेच्या संवरानें तो संवृत असतो, व त्यामुळेंच त्यास निगण्ठ[4], गतत्त[5], यतत्त[6], ठितत्त[7] म्हणतात.'

३० "याप्रमाणें मीं निगण्ठ नातपुत्ताला श्रामण्याचें फल विचारिलें असतां त्यानें चार तऱ्हेचा संवर सांगितला.

---

१. मूळांत हा प्रश्न पूर्वीप्रमाणें विस्तारानें दिला आहे व तेथें निगण्ठ नातपुत्ताला आग्गिवेस्सन असें संबोधिलें आहे. जैनांच्या ग्रंथांतून त्याचें गोत्र काश्यप होतें असें म्हटलें आहे. Prof. Jacobi यांच्या मतें बौद्धांनीं हा घोटाळा केला आहे. महावीराचा शिष्य सुधर्मन् याचें गोत्र अग्गिवेस्सन होतें.

२. चतुयामसंवरसंवुतो. Prof. Jacobi यांच्या मतें ( Jain Sutras II. 23 ) हे चार नियम महावीराच्या पूर्वीचा जैनांचा गुरु पार्श्व याचे असावेत. ( जैन प्राकृत. चातुज्जाम ). ते चार म्हणजे प्राणातिपात, मृषावाद, अदत्तादान व परिग्रह यांपासून विरति हे होत. महावीरानें पुढें मैथुनविरति अधिक जोडिली. येथें दिलेले चार नियम निगंठांची थट्टा करण्याकरितांच रचिले असावेत असें दिसतें. उदुंबरिकसिंहनादसुत्तांत ( दीघ २५. १६ ) सांगितलेला चातुयामसंवर अगदीं वेगळा आहे. तो असा. 'इध निग्रोध तपस्सी न पाणमतिपातेति न पाणमतिपातयति न पाणमतिपातयतो समनुञ्ञो होति, न अदिन्नं आदियति न अदिन्नं आदियापेति न अदिन्नं आदियतो समनुञ्ञो होति, न मुसा भणति न मुसा भणापेति न मुसा भणतो समनुञ्ञो होति, न भावितं आसिंसति न भावितं आसिंसापेति न भावितं आसिंसतो समनुञ्ञो होति.' यांतील शेवटचा खेरीज करून बाकीचे नियम पार्श्वाचेच आहेत, व त्यांची पद्धतीही जैनांच्या प्रमाणेंच आहे.

३. थंड पाण्यापासून, कारण त्यांत जिवंत प्राणी असतात. ४. सर्व बंधनांपासून मुक्त. ५. ज्याचें चित्त उच्च स्थानाप्रत पोहोचलें आहे. ६. ज्याचें चित्त संयत आहे. ७. ज्याचें चित्त स्थिर आहे.

३१ "अशाच रितीनें एकदां संजय बेलट्ठिपुत्ताला हा प्रश्न मीं विचारिला असतां त्यानें पुढीलप्रमाणें उत्तर दिलें:[1]—

३२ " 'जर परलोक आहे काय असें तुम्हीं मला विचारिलेंत आणि जर परलोक आहे असें मला वाटत असलें, तर परलोक आहे असें मी सांगेन. परंतु मला असें वाटत नाहीं, तसेंही वाटत नाहीं, या दोहोंहून निराळें असेंही कांहीं वाटत नाहीं, नाहीं असेंही वाटत नाहीं व नाहीं असें नाहीं असेंही मला वाटत नाहीं—परलोक नाहीं—परलोक आहे व नाहीं—परलोक आहे असेंही नाहीं व नाहीं असेंही नाहीं—ओपपातिक प्राणी आहेत—ओपपातिक प्राणी नाहींत—ओपपातिक प्राणी आहेतही आणि नाहींतही—ओपपातिक प्राणी आहेत असेंही नाहीं व नाहींत असेंही नाहीं—चांगल्या व वाईट कर्माचें फल असतें—नसतें—असतेंही व नसतेंही—असतें असेंही नाहीं व नसतें असेहीं नाहीं—तथागत मरणानंतर रहातो—रहात नाहीं—रहातोही व रहातही नाहीं—रहातो असेंही नाहीं व रहात नाहीं असेंही नाहीं—असे प्रश्न मला विचारिलें असतां मी वरीलप्रमाणेंच उत्तर देईन.'

३३ "याप्रमाणें मीं संजय बेलट्ठिपुत्ताला श्रामण्याचें फल विचारिलें असतां त्यानें धरसोडपणाचें भाषण केलें.

३४ "तेव्हां आतां भगवंतांस मी हाच प्रश्न विचारितों कीं, इतर धंद्यांप्रमाणें याच जन्मांत डोळ्यांनीं दिसण्यासारखें श्रामण्याचें फल मिळणें शक्य आहे काय ?"

" होय, महाराज, तर मग मीच आपल्याला एक प्रश्न विचारितों. त्याचें योग्य दिसेल तसें महाराजांनीं उत्तर द्यावें.

३५ " तर मग आपल्याला काय वाटतें, महाराज ? समजा कीं आपल्या येथील एक दास आहे. तो आपलें काम करितो, आपल्या आधीं उठतो व मागाहून निजतो, आपल्या हाकेस ओ देतो, आपल्या आवडीप्रमाणें काम करितो, मनाजोगें बोलतो व आपल्याला नेहेमीं आनंद देतो.

---

१. ब्रह्मजालसुत्त. ( दीघ १·२·२७ ) पहा .

आणखी असें समजा कीं, त्याला एखादे वेळीं असें वाटलें कीं, 'पुण्याची गती, पुण्याचें फल किती आश्चर्यकारक व अद्भुत आहे! हा मगध देशाचा राजा वेदेहिपुत्त अजातसत्तुही मनुष्य आहे, मींही पण मनुष्यच आहें. परंतु हा राजा पंचेंद्रियांच्या सुखांनीं युक्त व परिपूर्ण आहे—जसा कांहीं एकादा देवच-आणि मी त्याच्या येथला, त्याचें काम करणारा, त्याच्या आधीं उठणारा व मागाहून निजणारा, हांकेस ओ देणारा, त्याच्या मर्जीप्रमाणें काम करणारा, मनाजोगें बोलणारा व त्यास नेहमीं आनंद देणारा असा एक दास आहें! तर मग मी आतां पुण्यकर्म करीन. केंस व दाढी काढून टाकून काषाय वस्त्रें परिधान करून घरांतून बाहेर निघून प्रव्रज्या घेईन.' आतां असें समजा कीं, कांहीं कालानें त्यानें त्याप्रमाणें केलें व प्रव्रज्या घेऊन काया, वाचा, व मन यांमध्यें संवृत राहून, अन्नवस्त्रांत संतुष्ट राहून, तो एकांतांत सुखानें वास करूं लागला. आतां जर आपले नोकर आपणांस असें म्हणाले कीं, 'आपला एक पूर्वींचा दास प्रव्रज्या घेऊन एकांतांत सुखानें वास करीत आहे,' तर त्यांनां आपण असें म्हणाल काय कीं, 'त्या माणसानें माझ्या तेथें येऊन परत दास्य करावें?'"

३६ "नाहीं, भगवन्, उलट आम्ही त्याला वंदन करूं, उठून सामोरे जाऊं, त्याला आसन देऊं, वस्त्र, अन्न, रहावयाची जागा व आजाऱ्यासाठीं औषधोपचार हीं तयार करून देऊं व त्याचें धार्मिक रक्षण, आवरण व गोपन करूं."

"तर मग आपणांस काय वाटतें, महाराज? असें झालें असतां श्रामण्याचें डोळ्यांनीं दिसण्यासारखें फल आहे किंवा नाहीं?"

"आहे, भगवन्."

"हेंच, महाराज, मीं सांगितलेलें याच जन्मांत डोळ्यांनीं दिसण्यासारखें श्रामण्याचें पहिलें फल होय."

"भगवन्, याचप्रमाणें दुसरें एखादें याच जन्मांत डोळ्यांनीं दिसण्यासारखें श्रामण्याचें फल सांगणें शक्य आहे काय?"

३७ " होय, महाराज, तर मग आपणालांच मी उलट विचारितों. जसें योग्य दिसेल तसें आपण उत्तर द्यावें. तर मग आपणाला काय वाटतें, महाराज ? समजा, एखादा शेतकरी, स्वतःच्या घराचा मालक, कर देणारा, संपत्ती वाढविणारा, आपल्या खजिन्यांत भर घालणारा, असा आहे. त्याच्याही मनांत [ दासांप्रमाणेंच[1] ] प्रव्रज्या घेण्याचा विचार येऊन त्यानें लहानमोठी मालमत्ता व नातलग सोडून देऊन प्रव्रज्या घेतली. तर त्यानें गृहस्थाश्रमांत परत यावें असें आपण म्हणाल काय ? "

३८ " नाहीं, भगवन्, त्याचा आम्ही सत्कारच करूं. "

" हेंच, महाराज, मीं सांगितलेलें याच जन्मांत डोळ्यांनीं दिसण्यासारखें श्रामण्याचें दुसरें फल होय. "

३९ " भगवन्, यांहून चांगलें व अधिक संतोषदायक असें आणखी एखादें याच जन्मांत डोळ्यांनीं दिसण्यासारखें श्रामण्याचें फल सांगणें शक्य आहे काय ? "

" होय, महाराज. तर मग महाराजांनीं ऐकून नीट लक्षांत ठेवावें, मी आतां सांगतों. "

" ठीक आहे, भगवन्, " असें त्यानें भगवंतास उत्तर दिलें.

४० भगवान् म्हणाले, " समजा कीं, या जगांत तथागत[2], अर्हत्, सम्यक्संबुद्ध, विद्या व आचरण यांनीं संपन्न, सुगत, सर्व लोक जाणणारा, सर्वश्रेष्ठ, दमन करण्यास योग्य अशा जनांचा मार्गदर्शक व देव आणि मनुष्य यांचा शास्ता, असा भगवान् बुद्ध उत्पन्न झाला. त्यानें देवलोक[3], मारलोक[4] व ब्रह्मलोक[5] यांसहित हें जग व श्रमण आणि ब्राह्मण, देव आणि मनुष्य यांसहित ही प्रजा स्वतः जाणून व पूर्णपणें ओळखून तें ज्ञान इतरांस दिलें व आरंभीं, मध्यें व शेवटींही कल्याण-

---

१. मुळांत मागील सर्व पुनरुक्ती आहे २. यांवर सविस्तर टीका विसुद्धिमग्ग, परिच्छेद. ७ यांमध्यें आहे. Hoernle उवासगदसाओ १२४-१२५ पहा. ३. पांच कामावचर देवलोक अथवा अरूपावचर देवलोक ( बुद्धघोष ). ४. सहावा कामावचर देवलोक अथवा सहाही कामावचर देवलोक ( बुद्धघोष ). ५. ब्रह्मकायिकादि देवलोक अथवा रूपी ब्रह्मलोक ( बुद्धघोष ).

पद, सार्थ व सव्यंजन[1] असा धर्म व अगदीं पूर्ण व शुद्ध असें श्रेष्ठ आचरण हीं स्पष्टपणें दाखविलीं.

४१ "[आतां असें समजा कीं] एखादा गृहस्थ किंवा त्याचा मुलगा अथवा दुसऱ्या एखाद्या कुलांतील मनुष्य यांपैकीं एखाद्यानें तो धर्म ऐकिला. त्यामुळें त्याची तथागतावर श्रद्धा बसली व त्या श्रद्धेचा लाभ झाल्यामुळें तो असा विचार करूं लागला कीं, 'घरांत वास करणें हें त्रासदायक असून रागादि[2] मनोविकारांचा मार्ग आहे, परंतु प्रव्रज्या ही उघड्या हवेंत रहाण्याप्रमाणें [स्वातंत्र्यदायक] आहे. घरांत राहणाऱ्या मनुष्याला अगदीं पूर्ण, अगदीं शुद्ध, धुतलेल्या शंखाप्रमाणें स्वच्छ, असें ब्रह्मचर्य पाळणें सोपें नाहीं. म्हणून आतां मी केंस व दाढी काढून टाकून काषायवस्त्रें परिधान करून घरांतून बाहेर निघून प्रव्रज्या घेईन.' असा विचार करून त्यानें लहानमोठी मालमत्ता व नातलग सोडून देऊन केंस व दाढी काढून टाकून काषायवस्त्रें परिधान करून घरांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतली.

४२ "याप्रमाणें प्रव्रज्या घेऊन, पातिमोक्खांत[3] सांगितलेल्या संवरानें संवृत राहून, योग्य आचार व गोचर[4] यांनीं युक्त होऊन, अत्यल्प वाईट गोष्टीसुद्धां भयावह असतात असें पाहून, शिक्षापदांचा स्वीकार करून, तो तीं शिकला आणि कुशल शारीरिक व मानसिक कर्मे व शुद्ध आचरण यांनीं युक्त होत्साता, शीलसंपन्न, इंद्रियद्वारांचें रक्षण करणारा, भोजनामध्यें नेमस्त, स्मृतिमान् व जागृत, ताबा ठेवणारा, व संतुष्ट असा राहूं लागला.

४३-६२ "आतां, महाराज, भिक्षू शीलसंपन्न कसा होतो? महाराज, एखादा भिक्षू प्राणघातापासून आलिप्त रहातो. तो दंड व शस्त्रें टाकून देतो. त्याला कोणत्याही प्राण्याला दुखावण्याची लज्जा वाटते. तो दया-

१. मूळ शब्दांसहित. २. 'रजोपथो' a path for the dust of passion (Rhys Davids). ३. बौद्धभिक्षूंनीं पाळावयाचे नियम. विसुद्धिमग्गाच्या पहिल्या परिच्छेदांत या भागाचें पूर्ण विवेचन केलें आहे. ४. गोचर म्हणजे आपणास योग्य असा प्रदेश. उदाहरणार्थ वेश्या, पानागार, राजे, महामात्य, अश्रद्ध कुलें वगैरे जेथें असतील अशा ठिकाणीं न जाणें.

युक्त असतो, व सर्व प्राणिमात्रांच्या हिताचाच विचार करीत असतो. हें एक प्रकारचें शील झालें.

[ याप्रमाणें दुसरींही शीलें ब्रह्मजालसुत्त ८–२७ यामध्यें सांगितल्याप्रमाणें जाणावीं, फक्त ' श्रमण गौतम ' याबद्दल ' एखादा भिक्षू ' हे शब्द घालावे. ]

६३ " याप्रमाणें त्या शीलसंपन्न भिक्षूला या शीलसंवरामुळें कोठूनही भय दिसत नाहीं. महाराज, ज्याप्रमाणें ज्यानें सर्व शत्रूंचा संहार केला आहे अशा मूर्धाभिषिक्त राजाला शत्रूंपासून मुळींच भय रहात नाहीं, त्याप्रमाणें या भिक्षूला शीलसंवरामुळें कोठूनही भय उरत नाहीं आणि या श्रेष्ठ शीलांनीं युक्त असल्यामुळें तो स्वतः निष्कलंक सुखाचा उपभोग घेतो. याप्रमाणें, महाराज, भिक्षू शीलसंपन्न होतो.

६४ " आणि, महाराज, भिक्षू इंद्रियद्वाराचें रक्षण कसें करितो? महाराज, भिक्षू डोळ्यांनीं पदार्थ पाहून निमित्त अथवा व्यंजन यांपैकीं कशाचेंच ग्रहण करीत नाहीं. ज्यामुळें लोभ व खिन्नता हे दुष्ट व अकुशल धर्म डोळ्यावर ताबा न ठेवितां विहार करणाऱ्याच्या पाठीमागें लागतील, त्याचें तो संयमन करूं लागतो. चक्षु या इंद्रियाचें रक्षण करितो. त्याचप्रमाणें कानानें शब्द ऐकून, नाकानें वास घेऊन, जिव्हेनें रस चाखून, शरीरानें स्पर्शाचा अनुभव घेऊन व मनानें धर्म जाणून तो निमित्त अथवा व्यंजन या-

---

१. ' सेय्यथापि महाराज खत्तियो मुद्धावासित्तो निहितपच्चामित्तो न कुतोचि भयं समनुपस्सति यदिदं पच्चत्थिकतो, एवमेव खो महाराज भिक्खु एवं सीलसंपन्नो न कुतोचि भयं समनुपस्सति यदिदं सीलसंवरतो.' येथील वाक्यरचनेवरून सीलसंवरास पच्चात्थिकाची उपमा दिली आहे हें उघड होत आहे. जसें राजास शत्रूंपासून भय रहात नाहीं, तसें भिक्षूस सीलसंवरापासून भय रहात नाहीं. परंतु हें उघड उघड चूक आहे. तेव्हां मूळ पाठ ' सीलासंवरतो ' हा असावा असें दिसतें. म्हणजे त्याचा अर्थ भिक्षूस शीलाच्या अतिक्रमणाचें भय रहात नाहीं असा होईल. २. विसुद्धिमग्ग, परिच्छेद १ पहा. ( इत्थिपुरिसनिमित्तं वा सुभनिमित्तादिकं वा ). वस्तू नजरेपुढें आली असतां तिचा साधारण आकार अथवा सामान्य स्वरूप डोळ्यांपुढें उभें राहतें त्यास निमित्त म्हणतात. ३. 'अनुअनुव्यंजनतो पाकटभावकरणतो अनुव्यंजनंऽति लद्धवोहारानि हत्थपादसितहसितकथितविलोकितानि.' सामान्य स्वरूपाचें दर्शन झाल्यावर हातपाय इत्यादि अवयवांचें सौंदर्य अथवा हसणें, चालणें, पाहणें इत्यादि बारिकसारिक वैशिष्ट्यें यांकडे लक्ष जातें, त्यास व्यंजन अशी संज्ञा आहे.

पैकीं कशाचेंच ग्रहण करीत नाहीं. ज्यामुळें लोभ व खिन्नता हे दुष्ट व अकुशल धर्म मनांवर ताबा न ठेवतां विहार करणाऱ्याच्या पाठीमागें लागतील त्याचें तो संयमन करूं लागतो. मन या इंद्रियाचें रक्षण करितो. मन या इंद्रियाचें संयमन करितो. या श्रेष्ठ इंद्रियसंवरानें युक्त असल्यामुळें तो स्वतः ज्यामध्यें अकुशल धर्माचा गंधही नाहीं अशा सुखाचा उपभोग घेतो. याप्रमाणें, महाराज, भिक्षू इंद्रियद्वाराचें रक्षण करितो.

६५ "आणि, महाराज, भिक्षू स्मृतिमान् व जागृत कसा राहतो? महाराज, एखादा भिक्षू पुढें जातांनां, मागें येतांनां, समोर व इकडे तिकडे पाहतांनां, [हातपाय] आंखडून घेतांनां व पसरतांनां, संघाटी, पात्र व चीवर धारण करितांनां, खातांनां, पितांनां, चावतांनां, चाखतांनां, उत्सर्ग करीत असतांनां, बोलतांनां, शांत असतांनां, जागृत राहून हें सर्व करितो. याप्रमाणें, महाराज, भिक्षू स्मृतिमान् व जागृत राहतो.

६६ "आणि, महाराज, भिक्षू संतुष्ट कसा रहातो? महाराज, एखादा भिक्षू शरीरापुरत्या कपड्यानें व पोटापुरत्या अन्नानें संतुष्ट राहतो. तो जिकडे जिकडे जातो तिकडे तिकडे हें सर्व बरोबर घेऊन जातो. ज्याप्रमाणें आपल्या पंखांनीं उडणारा पक्षी जिकडे जिकडे जातो तिकडे तिकडे आपल्या पंखांच्या भारासहित उडून जातो, त्याप्रमाणें तो जिकडे जिकडे जातो तिकडे तिकडे हें सर्व घेऊन जातो. याप्रमाणें, महाराज, भिक्षू संतुष्ट राहतो.

६७ "या श्रेष्ठ शीलांनीं, या श्रेष्ठ इंद्रियसंवरानें, या श्रेष्ठ स्मृतीनें व जागृतीनें व या श्रेष्ठ संतोषानें युक्त असा तो अरण्य, वृक्षमूल, पर्वत, कन्दर, गिरिगुहा, स्मशान, वनप्रस्थ, मोकळी जागा अथवा पानांची रास इत्यादि ठिकाणीं एकांतवासांत राहतो. तेथें भिक्षा मागून परत आल्यावर जेवण आटोपून तो आसनमांडी घालून शरीर तांठ ठेवून,[1] स्मृती जागरूक ठेवून बसतो.

६८ "नंतर जगाविषयीं लोभ सोडून देऊन तो निरिच्छ चित्तानें वावरतो व लोभ टाकून देऊन आपलें चित्त शुद्ध करितो. अपकार हा दोष

१. विविक्तदेशे च सुखासनस्थः शुचिः समग्रीवशिरःशरीरः (कैवल्योपनिषत्.)

सोडून देऊन अपकारविरहित चित्तानें राहतो व सर्व प्राणिमात्रांच्या हिताचाच विचार करितो. अपकार दोष टाकून देऊन आपलें चित्त शुद्ध करितो. आळस व सुस्ती सोडून देऊन याविरहित चित्तानें प्रकाश आहे अशी संज्ञा ठेऊन स्मृतिमान् व जागृत राहून, आळस व सुस्ती यांपासून आपलें चित्त शुद्ध राखितो. अस्वस्थता व तळमळ सोडून देऊन, स्वस्थ चित्तानें व अंतःकरण शांत ठेवून अस्वस्थता व तळमळ यांपासून आपलें चित्त शुद्ध राखितो. विचिकित्सा सोडून देऊन असंभ्रांत चित्तानें, कुशल धर्मांविषयीं मुळींच शंका न ठेवितां विचिकित्सेपासून आपलें चित्त शुद्ध ठेवितो.

६९ "ज्याप्रमाणें, महाराज, एखाद्या पुरुषानें ऋण काढून तें धन धंद्यांत घालावें. त्याचा तो धंदा नीट चालून त्यानें जुनें ऋण फेडावें, एवढेंच नव्हे तर त्याच्याजवळ कुटुंबपोषणाकरितां थोडेंसें धन शिल्लक रहावें. त्यावेळीं त्याच्या मनांत असा विचार येईल कीं, 'मी ऋण काढून तें धन धंद्यांत घातलें. माझा तो धंदा नीट चालून मीं जुनें ऋण फेडलें, इतकेंच नव्हे तर माझ्याजवळ कुटुंबपोषणाकरितां थोडेंसें धन शिल्लक राहिलें.' या विचारानें त्याला सुख व आनंद होईल.

७० "ज्याप्रमाणें, महाराज, एखाद्या पुरुषास रोग असून तो नेहमीं दुःखी व फार आजारी असावा, त्याला अन्न पचूं नये व सर्व शरीराची शक्ती नाहिशी व्हावी. पुढें कांहीं दिवसांनीं त्याचा तो रोग नाहिसा होऊन त्याला अन्न पचूं लागावें व त्याच्या शरीरांत पुन्हा शक्ति यावी. त्यावेळीं त्याच्या मनांत असा विचार येईल कीं, 'मजला पूर्वीं रोग असून मी नेहमीं दुःखी व फार आजारी होतों. मला अन्न पचत नव्हतें व सर्व शरीराची शक्ति नाहिशी झाली होती. पुढें कांहीं दिवसांनीं माझा तो रोग नाहिसा होऊन मला अन्न पचूं लागलें व मला पुन्हां शक्ती आली.' या विचारानें त्यास सुख व आनंद होईल.

---

१. 'आलोकसञ्ञी.' डोळ्यापुढें प्रकाश आहे अशी संज्ञा ठेविली म्हणजे अंगांत आळस अथवा सुस्ती रहात नाहीं.

७१ "ज्याप्रमाणें, महाराज, एखादा पुरुष कैदेंत पडलेला असावा व कांहीं दिवसांनीं तो कैदेंतून सुखरूप व धडपणें सुटावा आणि त्याची मालमत्ता यत्किंचितही कमी होऊं नये. त्यावेळीं त्याच्या मनांत असा विचार येईल कीं, 'मी पूर्वी कैदेंत पडलों होतों व कांहीं दिवसांनीं मी कैदेंतून सुखरूप व धडपणें सुटलों व माझी मालमत्ता यत्किंचितही कमी झाली नाहीं.' या विचारानें त्याला सुख व आनंद होईल.

७२ "ज्याप्रमाणें, महाराज, एखादा पुरुष दास असावा, त्याला स्वतः कांहीं करितां येऊं नये, तो पराधीन असावा व त्याची इच्छा असेल तिकडे त्यास जातां येऊं नये. पुढें कांहीं दिवसांनीं त्या दास्यांतून तो सुटावा, स्वतःसिद्ध व्हावा, पराधीन नसावा, स्वतंत्र असावा व त्याची इच्छा असेल तिकडे त्यास जातां यावें. त्यावेळीं त्याच्या मनांत असा विचार येईल कीं, 'मी पूर्वी दास होतों, मला स्वतः कांहीं करितां येत नव्हतें, मी पराधीन होतों व माझी इच्छा असेल तिकडे मला जातां येत नव्हतें; पुढें कांहीं दिवसांनीं त्या दास्यांतून मी सुटलों, स्वतःसिद्ध झालों, माझी पराधीनता नाहिशी झाली व माझी इच्छा असेल तिकडे मला जातां येऊं लागलें.' या विचारानें त्याला सुख व आनंद होईल.

७३ "ज्याप्रमाणें, महाराज, एखादा श्रीमान् व संपन्न पुरुष जेथें अन्न मिळणें कठीण व भय पुष्कळ अशा अरण्यांतील मार्गानें चालत असावा व कांहीं कालानें तो त्या अरण्यांतून बाहेर पडून क्षेम व निर्भय अशा गांवास सुरक्षित येऊन पोहोंचावा. त्यावेळीं त्याच्या मनांत असा विचार येईल कीं, 'मी पूर्वी श्रीमान् व संपन्न असून जेथें अन्न मिळणें कठीण व भय पुष्कळ अशा अरण्यांतील मार्गानें चालत होतों व कांहीं कालानें मी त्या अरण्यांतून बाहेर पडून क्षेम व निर्भय अशा गांवास सुरक्षित येऊन पोहोंचलों.' या विचारानें त्याला सुख व आनंद होईल.

७४ "त्याप्रमाणें, महाराज, भिक्षूला हीं पांच नीवरणें हृदयांतून गेलीं नसतांनां तीं ऋण, रोग, कैदखाना, दास्य, अरण्यांतील वाट यांप्रमाणें वाटतात. परंतु जेव्हां हीं पांच नीवरणें त्याच्या हृदयांतून निघून

जातात, तेव्हां तीं त्यास आनृण्य, आरोग्य, कैदेंतून सुटका, स्वातंत्र्य व क्षेमभूमि यांप्रमाणें वाटतात.

७५ " याप्रमाणें हीं पांच नीवरणें आपल्यामधून गेलेलीं पाहून त्यास आनंद प्राप्त होतो; आनंदित झाला म्हणजे प्रीति उत्पन्न होते; प्रीतीमुळें शरीर शांत होतें; शरीर शांत झालें म्हणजे सुखाचा आस्वाद घेतां येतो; व सुख झालें असतां चित्त समाधीकडे वळतें. नंतर विषयसुख व अकुशल धर्म यांजपासून वेगळा होऊन वितर्क व विचार यांनीं युक्त, एकांतामुळें उत्पन्न झालेल्या प्रीतीनें व सुखानें परिपूर्ण असें प्रथमध्यान संपादन करून घेऊन तो त्यांत विहार करितो. तो आपलें शरीर एकांतांत प्राप्त होणाऱ्या प्रीतिसुखानें भरितो, भिजवितो, व्यापितो, व सर्व बाजूंनीं भरून टाकितो. त्याच्या सर्व शरीरांत एकांतांत प्राप्त होणाऱ्या प्रीतिसुखानें भरला नाहीं असा एकही भाग उरत नाहीं.

७६ " ज्याप्रमाणें, महाराज, एखादा हुशार स्नान घालणारा अथवा त्याचा शिष्य काशाच्या थाळींत स्नानीयचूर्णें पसरून त्यांवर थोडें थोडें पाणी शिंपडून तीं भिजवितो. त्या स्नानीयचूर्णांचा बनलेला गोळा पाण्यामुळें आंतून बाहेरून ओला झाल्यामुळें त्यांतून पाणी मुळींच गळत नाहीं; त्याप्रमाणें, महाराज, तो आपलें शरीर एकांतांत प्राप्त होणाऱ्या प्रीतिसुखानें भरितो, भिजवितो, व्यापितो व सर्व बाजूंनीं भरून टाकितो. त्याच्या सर्व शरीरांत एकांतांत प्राप्त होणाऱ्या प्रीतिसुखानें भरला नाहीं असा एकही भाग उरत नाहीं. हें याच आयुष्यांत डोळ्यांनीं दिसण्यासारखें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वींच्या श्रामण्यफलापेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक आहे.

७७ " यापुढें, महाराज, वितर्क व विचार यांचा लोप झाल्यावर जी चित्ताची प्रसन्नता, जी चित्ताची एकाग्रता, तिनें युक्त, वितर्कविचार–विरहित व समाधीपासून उत्पन्न झालेल्या प्रीतीनें व सुखानें युक्त असें द्वितीयध्यान संपादन करून घेऊन तो त्यांत विहार करितो. तो आपलें शरीर समाधीपासून प्राप्त होणाऱ्या प्रीतिसुखानें भरितो, भिजवितो, व्यापितो व सर्व बाजूंनीं भरून टाकितो. त्याच्या सर्व शरीरांत समाधीपासून प्राप्त होणाऱ्या प्रीतिसुखानें भरला नाहीं असा एकही भाग उरत नाहीं.

७८ " ज्याप्रमाणें, महाराज, आंत झरा असलेलें एखादें तळें असावें. त्यास पूर्व, पश्चिम, दक्षिण किंवा उत्तर, यांपैकीं कोणत्याही दिशेस पाणी आंत येण्यास मार्ग नसावा व पावसाच्या सरीही वेळोवेळीं पडूं नयेत, तरी त्या तळ्यामधून थंड पाण्याची धार निघून तिनें तें सर्व तळें पूर्णपणें भरावें, भिजवावें, व्यापून टाकावें व सर्व बाजूंनीं भरून टाकावें व त्या तळ्यांतील एवढासाही भाग भिजल्याशिवाय राहूं नये; त्याप्रमाणें, महाराज, तो आपलें शरीर समाधीपासून प्राप्त होणाऱ्या प्रीतिसुखानें भरितो, भिजवितो, व्यापितो, व सर्व बाजूंनीं भरून टाकितो. त्याच्या सर्व शरीरांत समाधीपासून प्राप्त होणाऱ्या प्रीतिसुखानें भरला नाहीं असा एकही भाग उरत नाहीं. हें याच आयुष्यांत डोळ्यांनीं दिसण्यासारखें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वींच्या श्रामण्य-फलापेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक आहे.

७९ " यापुढें, महाराज, प्रीतीच्या त्यागानें तो उपेक्षायुक्त होतो व स्मृतिमान् होत्साता समाधिसुखाचा अनुभव घेतो, व ज्यायोगें त्याला आर्यजन उपेक्षायुक्त, स्मृतिमान् आणि सुखी असें म्हणतात, अशा प्रकारचें तृतीयध्यान संपादन करून घेऊन तो त्यांत विहार करितो. तो आपलें शरीर निष्प्रीतिक सुखानें भरितो, भिजवितो, व्यापितो व सर्व बाजूंनीं भरून टाकितो. त्याच्या सर्व शरीरांत निष्प्रीतिक सुखानें भरला नाहीं असा एकही भाग उरत नाहीं.

८० " ज्याप्रमाणें, महाराज, उत्पलांनीं, पद्मांनीं अथवा पुंडरीकांनीं भरलेल्या तळ्यामध्यें उत्पलें, पद्में अथवा पुण्डरीकें पाण्यांत उत्पन्न झालेलीं, पाण्यांत वाढलेलीं, पाण्यांतून वर न आलेलीं, पाण्याच्या आंत राहूनच वाढलेलीं, टोंकापासून मुळापर्यंत थंड पाण्यानें भरलेलीं, भिज-लेलीं, व्यापिलेलीं व सर्व बाजूंनीं वेष्टिलेलीं असतात व तीं सर्व उत्पलें, पद्में अथवा पुण्डरीकें यांमधील एक देखील पाण्यानें भरल्याखेरीज रहात नाहीं; त्याप्रमाणें, महाराज, तो आपलें शरीर निष्प्रीतिक प्रीतिसुखानें भरितो, भिजवितो, व्यापितो, व सर्व बाजूंनीं भरून टाकितो. त्याच्या सर्व शरीरांत निष्प्रीतिक प्रीतिसुखानें भरला नाहीं असा एकही भाग उरत

नाहीं. हें याच आयुष्यांत डोळ्यांनीं दिसण्यासारखें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वींच्या श्रामण्यफलापेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक आहे.

८१ "यापुढें, महाराज, सौमनस्य आणि दौर्मनस्य यांचा पूर्वींच नाश झाल्यावर सुख आणि दुःख यांचा निरोध करून तो सुखदुःखविरहित व उपेक्षा आणि स्मृति यांनीं परिशुद्ध असें चतुर्थध्यान संपादन करून घेऊन त्यांत विहार करितो. तो आपलें शरीर परिशुद्ध व तेजस्वी मनानें भरून टाकून बसतो. परिशुद्ध व तेजस्वी मनानें भरला नाहीं असा त्याच्या शरीराचा एकही भाग रहात नाहीं.

८२ "ज्याप्रमाणें, महाराज, एखादा पुरुष पांढऱ्या वस्त्रानें डोक्यासकट सर्व शरीर झांकून घेऊन बसतो, तेव्हां त्याच्या शरीराचा एवढासा सुद्धां भाग पांढऱ्या वस्त्रानें आच्छादिलेला नाहीं असा रहात नाहीं; त्याप्रमाणें, महाराज, तो आपलें शरीर परिशुद्ध व तेजस्वी मनानें भरितो, भिजवितो, व्यापितो, व सर्व बाजूंनीं भरून टाकितो. त्याच्या सर्व शरीरांत परिशुद्ध व तेजस्वी मनानें भरला नाहीं असा एकही भाग रहात नाहीं. हें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वींच्या श्रामण्यफलापेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक आहे.

८३ " याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालेलें असतां तो तें वळवून ज्ञानदर्शनाकडे लावितो तो जाणतो कीं, 'हें माझें शरीर रूपी, चार महाभूतांपासून बनलेलें, मातापित्यांपासून उत्पन्न झालेलें, भातभाजीवर वाढलेलें, अनित्य, उच्छादन, परिमर्दन यांची जरूर असणारें, भेदन व विध्वंसन या धर्मांनीं युक्त असें आहे, आणि हें माझें विज्ञान या ठिकाणीं जोडलेलें व बांधलेलें आहे.'

८४ "ज्याप्रमाणें, महाराज, वैडूर्य मणी सुंदर, जातिवंत, अष्टकोनी, घडविलेला, स्वच्छ, शुद्ध, निर्दोष व सर्व आकारांनीं परिपूर्ण असावा,

---

१. 'ओदनकुम्मासुपचयो.' कुम्मास. सं. कुल्माष gruel कांजी. २. ब्रह्मजाल १·१६ पहा. उच्छादन म्हणजे अंगास उटणीं चोळणें. परिमर्दन म्हणजे अंग चेपणें. अशा रितीनें शरीराची काळजी घेतली, तरीही त्याचा भेद व विध्वंस व्हावयाचाच (बुद्धघोष).

त्यांत निळा, पिवळा, तांबडा, पांढरा अथवा फिकट दोरा ओवलेला असावा, तो मणी हातांत घेऊन डोळस मनुष्यानें पहावें कीं त्या मण्याशीं दोरी किती संलग्न आहे; त्याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालेलें असतांना तो तें वळवून ज्ञानदर्शनाकडे लावितो. हें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वींच्या श्रामण्यफलापेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक आहे.

८५ " याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालेलें असतां तो तें वळवून मनोमय शरीर निर्माण करण्याकडे लावितो. तो या शरीराहून निराळें, रूपी, मनोमय, सर्वांगपरिपूर्ण, सर्व इंद्रियांनीं युक्त असें शरीर निर्माण करितो.

८६ " ज्याप्रमाणें, महाराज, एखाद्या पुरुषानें मुंज गवतांतील काडी बाहेर काढावी, तेव्हां त्यास पुढीलप्रमाणें जाणीव उत्पन्न होईल कीं, ' हें मुंज गवत, ही काडी, मुंज गवत निराळें व आंतील काडी निराळी, परंतु ही काडी मुंज गवतांतूनच बाहेर काढिलेली आहे. ' ज्याप्रमाणें, महाराज, एखाद्या पुरुषानें म्यानांतून तलवार बाहेर काढावी, तेव्हां त्यास अशी जाणीव उत्पन्न होईल कीं, ' ही तलवार, हें म्यान, तलवार निराळी, म्यान निराळें, परंतु त्या म्यानांतूनच तलवार बाहेर काढि-

---

१ या उपमा अनेक ठिकाणीं आल्या आहेत. सूयगडंग २· १· १६. 'से जहा णाम एकेइ पुरिसे कोसीओ आसिं अभिनिव्वटित्ता णं उवदंसेज्जा अयमाउसो असी अयं कोसी, एवमेव णाच्छि केइ पुरिसे अभिनिव्वटित्ता णं उवदंसेत्तारो अयमाउसो आया इयं सरीरं, से जहा णाम एकेइ पुरिसे मुंजाओ इसियं अभिनिव्वटित्ता णं उवदंसेज्जा अयमाउसो मुंजे इयं इसियं, एवमेव णाच्छि केइ पुरिसे अभिनिव्वटित्ता णं उवदंसेत्तारो अयमाउसो आया इयं सरीरं '

शतपथब्राह्मण. ४· ३· ३· १६ यथेषीकां मुञ्जाद्विवृहेत् ।

कठोपनिषत् २· ६· १७

अंगुष्ठमात्रः पुरुषोन्तरात्मा सदा जनानां हृदये संनिविष्टः
तं स्वाच्छरीरात्प्रवृहेन्मुञ्जादिवेषीकां धैर्येण ।

निरुक्त ९·८. महाभारत ५· ४३· ७; १२· ३१५ ·१२,

लेली आहे.' ज्याप्रमाणें, महाराज, एखाद्या पुरुषानें टोपलींतून सर्प बाहेर काढावा, तेव्हां त्यास अशी जाणीव उत्पन्न होईल कीं, 'हा सर्प, ही टोपली, सर्प निराळा व टोपली निराळी, परंतु हा सर्प टोपलींतूनच बाहेर काढिलेला आहे.' त्याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालेलें असतां तो तें वळवून मनोमय शरीर निर्माण करण्याकडे लावितो. तो या शरीराहून निराळें, रूपी, मनोमय, सर्वांगपरिपूर्ण, सर्व इंद्रियांनीं युक्त असें शरीर निर्माण करितो. हें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वींच्या श्रामण्यफलापेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक आहे.

८७ "याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून अनेक प्रकारच्या चमत्कारांकडे लावितो. तो पुढीलप्रमाणे अनेक तऱ्हेच्या चमत्कारांचा अनुभव घेतो. एक असतां अनेक होतो, अनेक असतां एक होतो, दृश्यमान होतो, अदृश्य होतो, भिंतीच्या, तटाच्या, पर्वताच्या पलीकडे आकाशांत उडण्याप्रमाणें न अटकतां जातो, पाण्यांतल्या प्रमाणें पृथ्वींतही वर खालीं बुड्या मारितो, पृथ्वीवरल्याप्रमाणें पाण्यांतही न खचतां विहार करितो, पंख असलेल्या पक्ष्याप्रमाणें आकाशांतही मांडी घालून रहातो, एवढे प्रतापी व पराक्रमी चंद्र व सूर्य, पण त्यांनां सुद्धां हातानें स्पर्श करून त्यांचें परिमर्दन करितो, आपल्या शरीराच्या प्रभावानें ब्रह्मलोकापर्यंत आपला ताबा बसवितो.

८८ "ज्याप्रमाणें, महाराज, हुशार कुंभार अथवा त्याचा शिष्य चांगल्या मळलेल्या मातीचीं ज्या ज्या तऱ्हेचीं भांडीं करूं इच्छितो, तीं तीं तयार करितो, घडवितो; ज्याप्रमाणें, महाराज, हुशार दन्तकार अथवा त्याचा शिष्य चांगल्या तयार केलेल्या दन्ताचे जे जे प्रकार

१. बुद्धघोषाच्या मतें करंड म्हणजे करंडी नव्हे, तर सर्पाची कात. ज्याप्रमाणें तलवारीच्या आकाराचें म्यान असतें, त्याप्रमाणें सर्पाच्या आकाराचीच त्याची कात असते. परंतु सर्प कातींतून बाहेर कसा काढावयाचा ? त्यास बुद्धघोषाचें असें उत्तर आहे कीं अशी नुसती कल्पना करावयाची आहे !

तयार करूं इच्छितो, ते ते तयार करितो, घडवितो; ज्याप्रमाणें, महाराज, हुशार सोनार अथवा त्याचा शिष्य तापविलेल्या सोन्यापासून जे जे प्रकार करूं इच्छितो, ते ते करितो, घडवितो; त्याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर, व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून ......... ब्रह्मलोकापर्यंत आपला ताबा बसवितो. हें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वीच्या श्रामण्यफलापेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक होय.

८९ "याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून दिव्यश्रोत्राकडे लावितो. तो त्या दिव्य, शुद्ध, अतिमानुष श्रोत्राच्या योगें दिव्य व मानुष, लांबचे व जवळचे, असे दोन्ही प्रकारचे शब्द ऐकतो.

९० "ज्याप्रमाणें, महाराज, एखादा पुरुष रस्यानें चाललेला असावा, व नगारा, मृदंग, शंख, पणव व ढोल यांचे शब्द त्याच्या कानावर यावे, तेव्हां त्यास कळतें कीं, 'हा शब्द नगाऱ्याचा आहे, हा मृदंगाचा आहे, हा शंखाचा आहे, हा पणवाचा आहे अथवा हा ढोलाचा आहे.' त्याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर, व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून............शब्द ऐकतो. हें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वीच्या श्रामण्यफलापेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक होय.

९१ "याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून दुसऱ्याच्या हृदयांतलि विचार ओळखण्याकडे लावितो. तो दुसरे पुरुष व प्राणी यांचीं हृदयें आपल्या हृदयानें जाणतो. रागयुक्त चित्त 'रागयुक्त चित्त आहे' असें जाणतो, रागरहित चित्त 'रागरहित चित्त आहे' असें जाणतो, द्वेषयुक्त चित्त 'द्वेषयुक्त चित्त आहे' असें जाणतो, द्वेषरहित चित्त 'द्वेषरहित चित्त आहे' असें जाणतो, मोहयुक्त, मोहरहित, स्वस्थ, क्षुब्ध, महद्गत, अमहद्गत, उच्च, नीच, समाहित, असमाहित, विमुक्त चित्तें हीं त्या त्या प्रकारचीं आहेत असें जाणतो.

९२ " ज्याप्रमाणें, महाराज, एखादी शृंगाराची इच्छा असलेली स्त्री अथवा पुरुष अथवा यौवनसंपन्न तरुण स्वच्छ व शुद्ध आरशांत अथवा स्वच्छ पाणी भरलेल्या भांड्यांत आपलें मुख पहात असतांनां जर मुखावर तीळ असला तर तो तेथें आहे असें व नसला तर नाहीं असें जाणतो; त्याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून दुसऱ्याच्या हृदयांतील विचार ओळखण्याकडे लावितो. तो दुसरे पुरुष व प्राणी............असें जाणतो. हें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वींच्या श्रामण्यफलापेक्षां चागलें व अधिक संतोषदायक होय.

९३ " याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून पूर्वजन्मांच्या स्मृतीकडे लावितो. एक, दोन, तीन, चार, पांच, दहा, वीस, तीस, चाळीस, पन्नास, शंभर, हजार, लाख, अनेक संवर्तकल्पें, अनेक विवर्तकल्पें, अनेक संवर्तविवर्तकल्पें, इतक्या पूर्वजन्मांची त्यास स्मृती होते. ' मी अमुक ठिकाणीं जन्मलों; त्या ठिकाणीं माझें नांव व जात, आहार, सुख, दुःख, आयुर्मर्यादा हीं अमुक अमुक होतीं; तेथून मरणानंतर दुसऱ्या जन्मांत मी अमुक ठिकाणीं जन्मलों; तेथें माझें नांव, गोत्र, वगैरे अमुक अमुक होतीं; अशा रितींनेंच मी या ठिकाणीं जन्मांस आलों आहें,' अशा रितीनें अनेक हेतूंनीं व प्रकारांनीं युक्त अशा पूर्वजन्मांची त्यास स्मृती होते.

९४ " ज्याप्रमाणें, महाराज, एखाद्या पुरुषानें आपल्या गांवाहून दुसऱ्या गांवास जावें, त्या गांवाहून तिसऱ्या गांवास जावें व तेथून पुन्हा परत आपल्या गांवास यावें; तेव्हां त्याच्या असें लक्षांत येईल कीं, ' मी आपल्या गांवाहून अमक्या गांवास गेलों. तेथें असा उभा राहिलों, असा बसलों, असा बोललों, असा शांत राहिलों. तेथून अमक्या गांवाला गेलों, तेथें असा उभा राहिलों, असा बसलों, असा बोललों, असा शांत राहिलों. त्या गांवाहून पुन्हां आपल्या गांवास परत आलों. ' याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून पूर्वजन्मांच्या स्मृतीकडे लावितो. एक,

दोन, तीन·········पूर्वजन्मांची त्यास स्मृती होते. हें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वीच्या श्रामण्यफलापेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक होय.

९५ " याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून प्राण्यांची च्युती व उत्पत्ती ओळखण्याकडे लावितो. तो शुद्ध, दिव्य व अतिमानुष चक्षूनें पडणारे, उत्पन्न होणारे, हीन, उच्च, उत्तम वर्णाचे, वाईट वर्णाचे, सुखी, दुःखी, याप्रमाणें आपआपल्या कर्माप्रमाणें स्थिती प्राप्त होणारे प्राणी पहातो. ' हे प्राणी काय, वाचा व मन या तीन प्रकारच्या दुष्कर्मांनीं युक्त, आर्यांचे निंदक, मिथ्यादृष्टिक व मिथ्यादृष्टीनें कर्म करणारे आहेत. ते मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर वाईट स्थितीला, दुर्गतीला, विनाशाला, निरयाला गेले आहेत. परंतु हे दुसरे प्राणी काय, वाचा व मन या तीन प्रकारच्या सुकर्मांनीं युक्त, आर्यांची निंदा न करणारे, सम्यग्दृष्टिक व सम्यग्दृष्टीनें कर्म करणारे आहेत. ते मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर उत्तम स्थितीप्रत, स्वर्गलोकाला गेले आहेत. ' याप्रमाणें शुद्ध, दिव्य व अमानुष चक्षूनें तो पडणारे, उत्पन्न होणारे, हीन, उच्च, उत्तम वर्णाचे, वाईट वर्णाचे, सुखी, दुःखी, याप्रमाणें आपआपल्या कर्माप्रमाणें स्थिती प्राप्त होणारे प्राणी पहातो.

९६ " ज्याप्रमाणें महाराज, मध्यें गच्ची असलेलें एखादें घर असावें, तेथें उभें रहाणाऱ्या एखाद्या पुरुषास घरांत जाणारीं, बाहेर येणारीं, रस्त्यांतून चालणारीं व गच्चीवर बसलेलीं सर्व माणसें दिसावीं. तेव्हां त्यास असें कळून येईल कीं, ' हे लोक घरांत जात आहेत, हे लोक घरांतून बाहेर येत आहेत, हे लोक रस्त्यांतून चालत आहेत व हे लोक गच्चीवर बसले आहेत. ' त्याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून प्राण्यांची च्युती व उत्पत्ती ओळखण्याकडे लावितो. तो शुद्ध, दिव्य, व अमानुष चक्षूनें पडणारे·········आपआपल्या कर्माप्रमाणें स्थिती प्राप्त होणारे प्राणी पहातो. हें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वीच्या श्रामण्यफलापेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक आहे.

९७ " याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालें असतां तो तें वळवून आसवांचा नाश करण्याकडे लावितो. तो 'हें दुःख, हें दुःखाचें कारण, हा दुःखाचा नाश, हा दुःखाच्या नाशाचा मार्ग, हे आसव, हें आसवांचें कारण, हा आसवांचा नाश, हा आसवांच्या नाशाचा मार्ग,' हें सर्व बरोबर जाणतो. असें जाणत असतांनां, पहात असतांनां त्याचें चित्त काम, भव, व अविद्या या तीन आसवांपासून विमुक्त होतें, व तसें झालें म्हणजे 'माझें चित्त विमुक्त झालें आहे' हें ज्ञान त्यास होतें. जन्म संपले. ब्रह्मचर्यपालन झालें, करावयाचें तें सर्व करून झालें व आतां यापुढें जन्मचें नाहींत असें त्यास कळून येतें.

९८ " ज्याप्रमाणें, महाराज, पर्वतशिखरावर एखादें स्वच्छ, शुद्ध, ज्यांत चिखल मुळींच नाहीं, असें तळें असावें. त्याच्या तीरावर असलेल्या डोळस मनुष्याला त्यांत रहाणारे व फिरणारे, शिंपा, शिंपले, वाळू, गारगोट्या व माशांचे जमाव दिसावे. तेव्हां त्यास असें कळेल कीं, 'हें तळें स्वच्छ, शुद्ध व ज्यांत मुळींच चिखल नाहीं असें आहे व यांत शिंपा, शिंपले, गारगोट्या व माशांचे जमाव आहेत.' त्याप्रमाणें चित्त शांत, शुद्ध, तेजस्वी, निष्पाप, निष्कलंक, मृदु, लवचीक, स्थिर व अक्षोभ्य झालें

---

१. क्लेश अथवा वासना. Human passion, Sin, Corruption, Depravity ( Childers ), Intoxicants, Deadly floods ( RhD ), Illusion (Neumann). बुद्धघोषाचार्यांनीं या शब्दाचे अनेक अर्थ केले आहेत. ते असे ( १ ) चक्षु, श्रोत्र इत्यादिकांपासून वाहणारे ( स्रवन्ति ), ( २ ) दारूप्रमाणें मादक ( आसवा विय ), ( ३ ) पुष्कळ काळपर्यंत टिकणारें ( आयत ) संसारदुःख उत्पन्न करणारे ( प्रसवन्ति ), ( ४ ) भ्रमक कर्म व यांचे सर्व अकुशल धर्म. [ मज्झिम २ सब्बासवसुत्त यावरील टीका पहा. ] हे कांहीं ठिकाणीं ( मज्झिम २ ) कामासव, भवासव व अविज्जासव असे तीनच दिले आहेत व कांहीं ठिकाणीं ( दीघ १६·१·१२ वगैरे ) दिट्ठासवासहित चार दिले आहेत.

Childers च्या मतें हा शब्द मूळ संस्कृतभाषेंतील आस्रव ( आश्रव नव्हे ) असा आहे. परंतु Rhys Davids यांनीं Intoxicants असें भाषांतर केलें आहे व त्यांच्या मतें दारूप्रमाणें मादक हाच अर्थ बरोबर आहे. ( जातक ४७७·४६. ) जैनग्रंथांत आस्रव म्हणजे कर्मोपदानहेतवः असें दिलें आहे. Causes of moral infection. Kern, Man. Ind. Bud. 53. २. अथवा 'कांहींही करावयाचें राहिलें नाहीं.'

असतां तो तें वळवून आसवाचा क्षय करण्याकडे लावितो. तो··· ···असें त्यास कळून येतें. हें श्रामण्याचें फल, महाराज, पूर्वींच्या श्रामण्यफला-पेक्षां चांगलें व अधिक संतोषदायक होय."

९९ असें भगवान बोलल्यावर अजातसत्तु राजा त्यांस म्हणाला, "वाहवा, भगवन्, वाहवा! ज्याप्रमाणें, भगवन्, एखाद्यानें उपडें झालेलें सुलटें ठेवावें, अथवा झांकलेलें उघडें करावें, अथवा वाट चुकलेल्यास मार्ग सांगावा, अथवा डोळस मनुष्यांना वस्तू दिसाव्या म्हणून अंधारांत तेलाचा दिवा दाखवावा, त्याप्रमाणें भगवंतांनीं अनेक तऱ्हांनीं धर्माचा उपदेश केलेला आहे. तर मी बुद्ध, धर्म व भिक्षुसंघ यांस शरण जातों. भगवंतांनीं शरण आलेल्या मला आजपासून मरेपर्यंत उपासक म्हणून समजावें. मूर्ख, मूढ, पापी अशा माझा, भगवन्, अपराधानें नाश केला. त्यामुळें मी ऐश्वर्याकरितां धार्मिक व धर्मानें राज्य करणाऱ्या बापाला ठार मारिलें. मी यापुढें काळजी घेईन. भगवंतांनीं माझ्या अपराधाची क्षमा करावी."

१०० "होय, महाराज, मूर्ख, मूढ, पापी, अशा तुमचा अपराधानें नाश केला. त्यामुळें तुम्ही ऐश्वर्याकरितां धार्मिक व धर्मानें चालणाऱ्या बापाला ठार मारिलेंत. ज्याअर्थीं तुम्हांस अपराध कळून येऊन तुम्हीं त्याचा धर्माप्रमाणें प्रतिकार केलात, त्याअर्थीं मी तें ग्रहण करितों. महाराज, जर जनांना आपले अपराध कळून येऊन त्यांनीं पुढें काळजी घेतली तर आर्यधर्माचें हितच होईल."

१०१ एवढें भगवान बोलल्यावर अजातसत्तु राजा त्यांस म्हणाला, "बरें आहे, भगवन्, आम्ही आतां जातों. आम्हांला फार कामें आहेत."

"ठीक आहे, महाराज."

मग राजा भगवंतांच्या भाषणाचें अभिनंदन करून व त्यास अभिमोदन देऊन, आसनावरून उठून, भगवंतांस नमस्कार करून व प्रदक्षिणा घालून तेथून निघून गेला.

---

१. 'आयतिं संवराय'. २. क्षमा मागितलीत व पुढें काळजी घेण्याचें वचन दिलेंत.

१०२ तो गेल्याबरोबर भगवंतांनीं भिक्षूंना हांक मारिली. " भिक्षूहो, हा राजा जखमी[1] झालेला आहे. याच्यावर भयंकर आघात झालेला आहे. जर त्यानें ऐश्वर्याकरितां धार्मिक व धर्मानें राज्य करणाऱ्या बापाला ठार मारिलें नसतें, तर याच जागेवर त्यास शुद्ध व मलरहित धर्मचक्षु[2] प्राप्त झाला असता. "

असें भगवान् म्हणाले. प्रमुदित अंतःकरणांनीं भिक्षूंनीं त्यांच्या भाषणाचा स्वीकार केला.



१. म्हणजे मोक्षमार्गामध्यें चालण्यास तो असमर्थ झाला आहे. मातृघात, पितृघात, अर्हद्वात, तथागताचें दुष्ट चित्तानें रक्त काढणें (तथागतस्स लोहितुप्पाद) व संघभेद हीं पांच आनंतरियकम्में आहेत (महावग्ग १·६४–६७). हीं कर्में मोक्षमार्गास अत्यंत प्रतिबंधक आहेत. ज्याचे हातून हीं कर्में घडतील त्यास इहलोकीं निर्वाणाचा बोध होणें अशक्य आहे. अजातशत्रुराजाच्या हातून पितृवध घडल्यामुळें आध्यात्मिक दृष्ट्या तो जखमी झाला, त्याच्यावर भयंकर आघात झाला, असें भगवंताचें येथें म्हणणें आहे. र्‍हिस् डेव्हिड्स यांनीं 'This king, Brethren, was deep!y affected, he was touched in heart' असें चुकीचें भांषातर केलें आहे. २. सोतापत्तिमग्ग.

# परिशिष्ट.

या सूत्रांत श्रामण्याचें दृश्य फल काय हें सांगितलें आहे. संसारांतील निरनिराळ्या व्यवसायांचें फल जसें आपणास याच जन्मांत पहावयास मिळतें, त्याचप्रमाणें श्रामण्याचीही गोष्ट आहे, आणि म्हणूनच श्रामण्य स्वीकारण्यापासून कांहींही तोटा नसून उलट फायदाच आहे हें भगवंतांनीं येथें उघड करून दाखविलें आहे.

हे फायदे कोणते ? अगदीं पहिला व विशेषतः राजास तावडतोब पटणारा फायदा म्हटला म्हणजे त्याच्या एखाद्या दासानें श्रामण्य स्वीकारिलें तर तो दास्यांतून मुक्त होईल एवढेंच नव्हे, तर आणखी उलट राजासच त्यास वंदन करावें लागेल, हा होय. त्याचप्रमाणें स्वतंत्र मनुष्य श्रमण झाला तर त्याचाही मान वाढेल.

परंतु हे फायदे अगदींच व्यावहारिक झाले. यापुढें जे फायदे सांगितले आहेत, ते सर्व मिळून बौद्धांची श्रामण्याची संगतवार पद्धती होते. तिचे निरनिराळे भाग म्हटले म्हणजे शीलें, इंद्रियसंवर, स्मृती व जागृती, संतुष्टी, पंच नीवरणांचा नाश करणें, चार ध्यानांची भावना, ज्ञानदर्शन, मनोमय काय निर्माण करणें, निरनिराळ्या ऋद्धी, दिव्य श्रोत्रधातु, चेतःपर्यायज्ञान, पूर्वनिवासानुस्मृती, प्राण्यांची च्युती व उत्पत्ती यांचें ज्ञान व आस्रवक्षयज्ञान हे होत.

हीच पद्धती अनेक ठिकाणीं साधारणतः जशीच्या तशीच सांपडते. परंतु कित्येक स्थळीं यांत थोडासा फरक केलेला आढळून येतो. दीघनिकायाच्या पहिल्या तेराही सूत्रांतून तर ही एकच पद्धती आहे. फक्त तेविज्जसुत्तामध्यें फरक आहे. परंतु तेथें निर्वाण हें ध्येय सांगावयाचें नसून ब्रह्मदेवाशीं सायुज्यता कोणत्या रितीनें प्राप्त करून घेतां येईल हाच प्रश्न सोडविला आहे.

मज्झिमनिकायांत निरनिराळ्या ठिकाणीं निर्वाणप्राप्तीच्या मार्गाच्या वेगवेगळ्या तऱ्हा आढळून येतात. कोठें कोठें चार ध्यानांची भावना व त्यानंतर

---

१. ही अभिज्ञाप्राप्तीची तयारी आहे, असें समजलें पाहिजे. इतर ठिकाणीं यांचा उल्लेख केलेला नाहीं. २. याचा खरोखर ऋद्धिविद्यामध्येंच समावेश करावयास पाहिजे, पण अजातशत्रु राजाची समजूत करण्यासाठीं भगवंतांनीं हा भाग निराळा काढिला असावा. सकृद्दर्शनीं पाहणाऱ्यास स्थूलशरीरापासून लिंगशरीर भिन्न आहे, असें येथें प्रतिपादन केल्याचा भास होईल. परंतु ऋद्धिविधांत या भागाचा समावेश केल्यानें हें काम केवळ कल्पनेच्या जोरावर करितां येतें, असेंच तेथें दाखविलें आहे. अतएव यथार्थतया आत्मा म्हणून भिन्न पदार्थ नाहीं असेंच ठरतें.

तीन विद्यांचा लाभ एवढाच मार्ग दिला आहे[1]. या तीन विद्या म्हणजे पूर्वनिवासानुस्मृती, प्राण्यांची च्युती व उत्पत्ती यांचें ज्ञान व आस्रवक्षयज्ञान या होत. कोठें चार ध्यानांची भावना, चार आरुप्यांची भावना व त्यानंतर संज्ञावेदयितनिरोध असा मार्ग दिला आहे[2]. दुसऱ्या कांहीं ठिकाणीं साधारणतः दीघनिकायांतील सूत्रांतील पद्धतीप्रमाणेंच पद्धती आढळून येते[3]. तेविज्जसुत्तांतील तऱ्हा फक्त मज्झिम ४० येथेंच आहे. तेथेंही आस्रवांच्या क्षयानेंच श्रमण होतो असेंच म्हटलें आहे.

शीलादि गोष्टींतही थोडासा फरक आढळून येतो. उदाहरणार्थ, मज्झिम २७ येथें शीलांनंतर संतुष्टी, इंद्रियसंवर, स्मृती व जागृती, पंच नीवरणांचा नाश करणें, चार ध्यानांची भावना व तीन विद्या असा क्रम दिलेला आहे. त्यांमध्यें शीलांनंतर लगेच संतुष्टी आली आहे एवढेंच कायतें, बाकी मुळींच फरक नाहीं.

बुद्धघोषाचार्यांनीं विशुद्धिमार्गांत शीलें, इंद्रियसंवर, स्मृती व जागृती आणि संवर या गोष्टी शीलनिर्देशांतच दिल्या आहेत. पंच नीवरणांचा नाश करणें व चार ध्यानांची भावना या समाधीमध्यें आल्या आहेत. निरनिराळ्या ऋद्धी, दिव्यश्रोत्रधातु, चेतःपर्यायज्ञान, पूर्वनिवासानुस्मृती, प्राण्यांची च्युती व उत्पत्ती यांचें ज्ञान व आस्रवक्षयज्ञान या सहांस षडभिज्ञा असें नांव आहे, व ध्यानांच्या योगानें त्यांची प्राप्ती होत असल्याकारणानें बुद्धघोषाचार्यांनीं त्या समाधीस पुरवणीदाखल म्हणून दिल्या आहेत.

आतां हें सूत्र ऐतिहासिक कसोटीला लावून पाहिलें असतां असें दिसून येतें कीं, बिंबिसाराच्या मरणानंतर अजातशत्रुराजाचें व भगवंतांचें वांकडें आलें. देवदत्ताला साहाय्य होऊन बुद्धास मारण्याचा अजातशत्रूनें एकदोनदां प्रयत्न केल्याचा उल्लेख चुल्लवग्गादिक ग्रंथांत आढळतो. तेव्हां भगवंतांनीं राजगृहास येण्याचें बहुतेक सोडूनच दिलें असावें, आणि हें त्यांचें आगमन पुष्कळ वर्षांनीं—बहुधा देवदत्ताच्या मरणानंतर—घडलें असावें[4]. जीवक कोमारभच्च हा भगवंतांविषयीं अत्यंत प्रेम बाळगणारा वैद्य अजातशत्रुराजाजवळ होता, आणि त्याचें

---

१. मज्झिम ४, १९, २७, ३६, ५१, ५३, ७६, १०७. २. मज्झिम २५, २६, ३०, ६६. ३. मज्झिम ३८, ७७, ११२, १२५. ४. 'According to Schiefner, Tib. Lebens p. 315, the Buddha passed the 36th summer in Râja griha; but this does not agree with our text. It cannot be placed earlier than the 41st summer, or in his 75th year.' (Rockhill p. 95 note ).

राजावर वजनही बरेंच होतें. तेव्हां त्यानें आपल्या धन्याची व गुरूची ही ऐतिहासिक मुलाखत घडवून आणिली असली पाहिजे, व या मुलाखतींत दृश्य श्रामण्यफलाविषयीं संवादही झाला असला पाहिजे. कांकीं, अजातशत्रुराजा हा परलोकाविषयीं फारसें भय बाळगणारा नव्हता. तसें असतें तर त्यानें आपल्या बापाचा निःशंकपणें वध केला नसता.

पण या मुलाखतींत सहा तीर्थ्य आचार्यांचा जो उल्लेख आला आहे, तो अप्रस्तुत आहे असें वाटतें. या सहा आचार्यांचीं मतें हलक्या प्रतीचीं ठरविण्यासाठीं या सूत्राच्या कर्त्यानें किंवा कर्त्यांनीं हा भाग या सूत्रांत घातला असावा. यावरून त्याचें महत्त्व कमी आहे असें नाहीं. त्यावरून या सहा तीर्थ्य आचार्यांच्या तत्त्वज्ञानाची अंधुकपणें[1] कल्पना करितां येते. आमचें म्हणणें

---

१ या सहा तीर्थ्य आचार्यांच्या मतांविषयीं किती घोटाळ्याच्या कल्पना होत्या, हे तिबेटी व चिनी त्रिपिटकावरून स्पष्ट दिसून येतें. तिबेटी दुल्वाचें भाषांतर Rockhill. Life of the Buddha (पृ० ९५-१०६) यामध्यें दिलें आहे. त्याच्याच शेवटीं (पृ० २५५-२५९) Bunyiu Nanjio यांनीं दोन चिनी त्रिपिटकांतील उतारे दिले आहेत. त्यांतील नं० ५९३ इ. स० ३८१ ३९५ या कालांत झालेलें व नं० ५४५ इ. स० ४१२-४१३ या कालांत झालेलें, अशीं त्रिपिटकाचीं चिनी भाषांतरें आहेत. या एकंदर घोटाळ्याची नीट कल्पना यावी म्हणून त्याचें पत्रकच येथें देतों.

| नंबर | नांव | पाली | तिबेटी | चिनी नंबर ५९३ | चिनी नंबर ५४५ |
|---|---|---|---|---|---|
| १ | पूरण कस्सप | कलम १७ | २३ (दोन्ही भाग) अजित केसकंबल | २३ (दोन्ही भाग) अजित केसकंबल | १७ पूरण कस्सप |
| २ | मक्खलि गोसाल | कलम २० (चार भाग) | २० (पहिला भाग) मक्खलि गोसाल | २० (पहिला भाग) मक्खलि गोसाल | २३ (पहिला भाग) अजित केसकंबल |
| ३ | अजित केसकंबल | कलम २३ (दोन भाग) | २६+२०(भाग २, ३, ४)पकुध क.+मक्ख. गो. | ३१ संजय बेलट्ठिपुत्त | २३(दुसरा भाग) अजित केसकंबल |
| ४ | पकुध कच्चायन | कलम २६ | ३१ संजय बेलट्ठिपुत्त | [ निराळेंच ]+२० (भाग ३, ४) मक्खलि गोसाल | २० (पहिला भाग) मक्खलि गोसाल |
| ५ | निगण्ठ नातपुत्त | कलम २८ | [ मज्झिम १४ ] | [ निराळेंच. प्रतीत्यसमुत्पाद ! ] | [ सर्वज्ञता. अंगुत्तर ३. १४ ] |
| ६ | संजय बेलट्ठिपुत्त | कलम ३१ | १७ पूरण कस्सप | १७ पूरण कस्सप | ३१ संजय बेलट्ठिपुत्त |

पृ० ५८–५९ येथील टीपाही पहा.

एवढेंच आहे कीं, भगवंतांच्या व अजातशत्रुराजाच्या या सुप्रसिद्ध मुलाखतीशीं या आचार्यांच्या मतांचा कांहींएक संबंध नसावा.

## जीवक कोमारभच्च.

मगध देशचा राजा बिंबिसार याचा वैद्य. याची हकीकत महावग्ग ८·१ यामध्यें आली आहे ती अशी:—राजगृहामध्यें सालावती नांवाची एक गणिका होती. ती गर्भवती असतां तिला वाटलें कीं, 'पुरुषांना गर्भवती गणिका आवडत नाहीं. तेव्हां आपण आजाऱ्याचें सोंग घ्यावें हें बरें.' असा विचार करून तिनें त्याप्रमाणें केलें व मूल जन्मल्यानंतर दासीकडून त्यास कचऱ्याच्या ढिगांत टाकून दिलें. अभय नांवाचा राजकुमार त्या रस्त्यानें जात असतां त्यानें त्या मुलास कावळे टोंचताहेत असें पाहिलें व सेवकांस विचारिलें कीं, 'कोणाच्या भोंवतीं येथें कावळे जमले आहेत?'

'एक मूल पडलें आहे, सरकार.'

'तें जिवंत आहे काय?'

'होय, सरकार.'

'तर मग त्याला घरीं नेऊन त्याचें चांगलें पालनपोषण करा.'

चाकरांनीं त्याप्रमाणें केलें. अभयकुमारानें विचारिलें असतां चाकरांनीं 'जिवंत आहे' (जीवति) असें उत्तर दिलें, म्हणून मुलाचें नांव जीवक असें ठेविलें, व कुमारानें त्याचें पालनपोषण केलें, म्हणून त्याचें कोमारभच्च (कुमारभृत) असें नांव पडलें.[1]

अशी महावग्गांतील हकीकत आहे. परंतु विनयाच्या भाषांतरकारांचें (Rhys Davids व Oldenberg S. B. E xvii. 174) असें म्हणणें आहे कीं, ही हकीकत केवळ जुळविलेली व शब्दाचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां कल्पिलेली आहे. त्यांच्या मतें संस्कृतभाषेंत दारकाचिकित्सेला कौमारभृत्य असें नांव आहे. तेव्हां कोमारभच्च म्हणजे लहान मुलांच्या रोगांची चिकित्सा करणारा वैद्य असा अर्थ घ्यावा.

महावग्गांत त्याच भागांत त्यानें पुष्कळ मनुष्यांचे रोग बरे केल्याची हकीकत आली आहे. परंतु त्यांत कोठेंही लहान मुलांच्या रोगाची चिकित्सा केल्याचें वर्णन नाहीं. Neumann[2] तो कुमारांच्या (म्हणजे राजपुत्रांच्या)

---

१ दिव्यावदानांत (पृ० २७०, ५८७) त्याचें नांव जीवक कुमारभृत असें दिलें आहे. Rockhill (p. 64) त्याचें नांव जीवक कुमारभण्ड असें देतो, व तो बिंबिसार राजापासून राजगृहांतील एका श्रेष्ठीच्या बायकोस झालेला मुलगा होता, असें म्हणतो. तिनें त्यास एका पेटींत घालून राजवाड्याच्या दाराशीं नेऊन ठेविलें. राजाकडे ती पेटी नेल्यावर त्यानें ती उघडून अभयकुमारास (हा त्याजपासून आम्रपाली नांवाच्या गणिकेस झालेला मुलगा होता) तो जिवंत आहे काय असें विचारिलें व कुमारानें त्याचें पालन केल्यामुळें त्याचें नांव जीवक कुमारभण्ड असें पडलें.

२. Die Reden Gotamo Buddho's aus der mittleren Sammlung Majjhimanikâyo des Pâlikanons. III. 582.

रोगांची चिकित्सा करणारा अर्थात् श्रेष्ठ वैद्य असावा, असें म्हणतात Prinzenarzt=Hofarzt.

---

## अजातशत्रु वैदहीपुत्र.

मगधदेशचा राजा बिंबिसार याचा मुलगा. त्याची आई वैदेही कोसलदेशच्या राजाची मुलगी. तो तिच्या गर्भात असतां तिला राजाच्या दक्षिण बाहूमधील ( गुडघा ? जातक ३३८ ) रक्त प्यावें असे डोहाळे लागले ( जातक ३३८, ३७३ ). परंतु हें कोणास सांगतां येईना, म्हणून ती कृश बनत चालली. तेव्हां राजानें तिला त्याचें कारण विचारिलें. तिनें तें सांगितल्यावर ज्योतिषी म्हणाले,'हा गर्भ आपल्या बापाचा शत्रु होणार आहे.' तेव्हां राणीनें गर्भपात करण्याचे पुष्कळ प्रयत्न केले, परंतु ते सफल झाले नाहींत. राजास ही गोष्ट कळून येऊन त्यानें तिजभोंवतीं पहारा ठेविला, त्यामुळें जन्मल्यावर देखील तिला पुत्रास ठार मारतां आलें नाहीं.

भगवान् बुद्धाचा चुलतभाऊ देवदत्त याला आपणास मोठेपणा मिळावा अशी इच्छा झाली. म्हणून त्यानें अजातशत्रूशीं मैत्री संपादन करून तूं ' आपल्या बापास ठार मार व मी भगवंतांस मारून बुद्ध होतों, ' असा त्यास सल्ला दिला ( जातक ५४२ ). ही गोष्ट बिंबिसारास कळल्यावर त्यानें त्यास बोलावून आणून ' मला मारण्याची तुला कां इच्छा झाली आहे ? ' असें विचारिलें. त्यानें उत्तर दिलें कीं, ' मला राज्य पाहिजे. ' राजानें त्यास राज्य दिलें. परंतु देवदत्तानें त्यास सांगितलें कीं, ' आतां तुला राज्य दिलें आहे खरें, परंतु कांहीं दिवसांनीं तो तें परत काढून घेणार नाहीं कशावरून ? तर बापास ठार मारून टाक. ' तेव्हां अजातशत्रूनें बिंबिसारास एका कोठडींत कोंडून ठेवून त्यास अन्न मिळणार नाहीं अशी व्यवस्था केली. फक्त राणी मात्र तेथें जात असे. परंतु ती राजास अन्न पुरविते असें दिसल्यावरून नंतर तिलाही जाण्याची बंदी केली. पुढें राजाच्या पायासही शस्त्रानें जखमा करविल्या. अशा स्थितींत थोड्याच दिवसांत बिंबिसार मरण पावला. त्याच दिवशीं अजातशत्रूस मुलगा झाल्याची बातमी दूतांनीं त्यास सांगितली. तेव्हां पुत्रस्नेहानें त्यानें पित्यास सोडून द्यावें अशी आज्ञा केली. परंतु काय उपयोग ? ( Rockhill p. 90–91 पहा. )

---

१. पण Rockhill p. 63–64 पहा.

देवदत्तानेंही भगवंतांस मारण्याचे अनेक प्रयत्न केले, पण ते निष्फळ झाले. ( चुल्लवग्ग. ७·२–४ Rockhill p. 92–95 ).

महाकोसलानें आपली मुलगी वैदेही हिला कासिगांव दिलें होतें. ती मेल्यावर त्याचा उपभोग अजातशत्रु घेऊं लागला. तें पसेनदि राजा ( महाकोसलाचा मुलगा ) यास न खपून त्यानें अजातशत्रूवर स्वारी केली. हें युद्ध बरेच दिवस चाललें. एकदां एका पक्षास व एकदां दुसऱ्यास जय मिळे. पहिल्यानें अजातशत्रूची सरशी झाली, परंतु शेवटीं पसेनदीनें त्यास जिवंत धरून आणिलें, पण भाचा असल्यामुळें पुष्कळ संपत्ती व मुलगी वजिरकुमारी देऊन त्याची पाठवणी केली. ( संयुत्त. ३·२·४-५. जातक २३९,२८३,४९२. )

याशिवाय बौद्धग्रंथांतून आणखी त्रोटक उल्लेख आहेत. मज्झिम १०८ येथें अजातशत्रु प्रद्योतराजा स्वारी करणार म्हणून राजगृहाची तटबंदी करीत होता असें म्हटलें आहे. महावग्ग ६·२८-७ येथें सुनीध व वस्सकार हे मगधमहामात्य पाटलिग्रामाची तटबंदी करीत होते असा उल्लेख आहे. भगवंतांच्या परिनिर्वाणाच्या आधीं थोडे दिवस तो वज्जींवर स्वारी करण्याची तयारी करीत होता असें दिसतें ( दीघ. १६ ).

जैनांच्या ग्रंथांत हा कूणिय या नांवानें प्रसिद्ध आहे. हा पहिल्यानें महावीराचा अनुयायी होता. तो जैनास सोडून बौद्धांकडे कां आला याविषयीं Prof. Jacobi यांनीं Jain Sutras i. xiv येथें उहापोह केला आहे. कूणिय हा वेसालीचा राजा चेडग ( चेतक ) याची मुलगी चेल्लना, मगधदेशचा राजा सेनिय याची बायको, हिचा थोरला मुलगा होता. भगवती ( पृ. ४९६ ) या ग्रंथांत त्यानें आपली बायको पउमावई ( पद्मावती ) हिच्या सांगण्यावरून आपल्या बापास ठार मारिलें असें म्हटलें आहे. तेथें त्याचा धाकटा भाऊ वेहल्ल याच्याशीं झालेलें भांडण दिलें आहे. वेहल्ल आपला आजा चेडग याजकडे पळाला, म्हणून कूणियानें त्याच्याशीं युद्ध सुरू केलें. हें युद्ध इ. स. पूर्वीं ५०० या वर्षी झालें असावें.

## सहा आचार्य.

भगवान् बुद्धाच्या वेळीं जीं निरनिराळीं मतें हिंदुस्थानांत प्रचलित होतीं, त्यापैकीं मुख्यतः सहा आचार्यांचीं मतें बौद्धग्रंथांत प्रसिद्ध आहेत. या सहांचेही वेगळे पंथ असून त्यांचें आपआपल्या अनुयायांवर बरेंच वजन होतें.

त्यांच्या मतांवरून आपणास खिस्ती शकाच्या पूर्वीच्या पांचव्या शतकांत कोणतीं मतें विशेषेंकरून प्रचलित होतीं याचें बरेंच ज्ञान मिळतें.

## १ पूरण कस्सप[२]

हा एका घरांत नव्याण्णव दास असतां शंभरावा जन्मास आला, म्हणून त्याचें

---

१ बौद्ध ग्रंथांतून पुष्कळ ठिकाणीं या सहांचाही एकदम उल्लेख आलेला आहे.

संयुत्त २. ३. १० येथें नानातीर्थियांचे श्रावक देवपुत्र भगवंतांसमोर आपआपल्या आचार्यांची स्तुती करितात.

संयुत्त ३. १. १. पसेनदि कोसलराजा भगवंतास विचारितो कीं, 'हे सहाही आपण अभिसंबुद्ध झालों आहों असें म्हणतात, आणि तूं तरुण असूनही तसेंच म्हणतोस.'

संयुत्त ४४. ९. हे सव आपल्या श्रावकांचे मागील जन्म जाणतात.

मज्झिम ३०. पिंगलकोच्छ ब्राह्मण विचारितो कीं, 'या सर्वांस योग्य ज्ञान झाल आहे कीं नाहीं?'

मज्झिम ३६. सच्चक निगण्ठपुत्त म्हणतो कीं, 'या आचार्यांस प्रश्न विचारिल असतां ते उडवाउडवीची उत्तरें देतात.'

मज्झिम ७७. सकुलुदायि म्हणतो कीं, 'या आचार्यांस त्यांच्या शिष्यगणाकडून योग्य मान मिळत नाहीं.'

चुल्लवग्ग ५·८·१ राजगहक सेट्ठीनें असा पण लाविला होता कीं, जो अर्हत् असून ज्यास ऋद्धी प्राप्त झाल्या असतील त्यानें एका काठीवर ठेविलेलें चंदनाचें पात्र खालीं काढून घेऊन जावें. या सहाही आचार्यांस तें जमेना. शेवटीं पिंडोल भारद्वाज नांवाच्या भिक्षूनें तें काढून घेतलें.

जातक ५२८ येथें ते पूर्वजन्मीं ब्रह्मदत्तराजाचे अमात्य होते असें म्हटलें आहे. ते अहेतुवादी, इस्सरकारणवादी, पुब्बेकतवादी, उच्छेदवादी, व खत्तविज्जावादी होते.

मिलिंद १·११–१४. हा केवळ सामञ्ञफलसुत्ताचा अनुवाद आहे.

सुत्तनिपात, सभियसुत्त. दिव्यावदान १२, महावस्तु १·२५३. Rockhill p. 99. Bunyiu Nanjio p. 255.

२. मज्झिम ६० व ७६, संयुत्त २४. ६ येथ त्याचें नुसतें मत दिलें आहे.

संयुत्त २२·६०; ४६·५६; अंगुत्तर ६·५७ येथें मक्खलि गोसालाचीं मतें पूरणाचीं म्हणून दिलीं आहेत.

अंगुत्तर ९·३८. दोन लोकायतिक ब्राह्मण म्हणतात कीं, पूरण कस्सप व निगण्ठ नातपुत्त हे दोघेही 'आम्ही सर्वज्ञ व सर्वदर्शी असून आम्हांस सर्व ज्ञान झालें आहे; चालत असतां व उभे असतां, निजलों असतां व जागे असतां, आमच्या पुढें नेहमीं ज्ञान असतें. अनंत ज्ञानानें अंतवान लोक आम्ही जाणतों व पाहतों,' असें म्हणतात. तर यांतील खरें कोणतें?

नांव पूरण ( शंभर ही संख्या पुरी करणारा ) असें ठेविलें. तो आपल्या कामांत फार हुशार होता. कांहीं दिवसांनीं तो तेथून पळाला. वाटेंत चोरांनीं त्याचीं वस्त्रें हिरावून घेतलीं. तेव्हां नग्नरूपानेंच तो एका गांवांत शिरला. तेथील लोकांस तो कोणी मोठा साधू आहे असें वाटलें. हें पाहून तो पुढें वस्त्रें वापरीनासा झाला ( बुद्धघोष ). या हकीकतींत फारसें तथ्य नसून पूरण या नांवाचा अर्थ देण्याकरितांच ती जुळविलेली दिसते.

मृत्युः—शक्रानें बुद्धाकरितां एक मंदिर बांधिलें व तीर्थियांचें मंदिर वाऱ्यानें व पावसानें नाश पावलें. तेव्हांपासून पूरण कस्सपास कोणी विचारीनासें झालें. तो जिकडे जिकडे जाई तिकडे तिकडे त्याची थट्टा होऊं लागली. एकदां त्याच्या एका पूर्वींच्या अनुयायानें त्यास चमत्कार करून दाखविण्यास सांगितलें. पूरणानें त्यास एक मडकें व दोरी आणावयास सांगितलें. तीं आणिल्यावर तो नदीवर गेला व पाण्यांत उतरून गळ्यास तें मडकें बांधून त्यानें नदींत बुडी मारिली व दिसेनासा झाला. [ Spence Hardy. Manual p. 306. दिव्यावदान १२ Kern. Manual of Indian Buddhism. p. 32-33, 40. note 3. Rockhill. 79-80 ].

संयुत्त २·३·१० येथें असम देवपुत्रानें त्याच्या मताचा सारांश असा दिला आहे.

इध छिन्दितमारिते हतजानीसु कस्सपो
पापं न समनुपस्साति पुञ्ञं वा पन अत्तनो
स वे विस्सासमाचिक्खि सत्था अरहति माननं ।

## २ मक्खलि गोसाल.

हा एक दास होता. एके दिवशीं चिखलांतून तेलाचें भांडें घेऊन जात असतां त्यास त्याच्या धन्यानें पडूं नको ( मा खलि ) असें सांगितलें. परंतु तो पाय घसरून पडलाच व धनी शिक्षा करील म्हणून पळत सुटला. धन्यानें मागून धांवत जाऊन त्याचें वस्त्र पकडिलें. वस्त्र सोडून देऊन तो पुढें पळाला व नंतर नग्नवृत्तीनें राहूं लागला. गोशालेंत जन्मल्यामुळें त्यास गोसाल हें नांव मिळालें होतें ( बुद्धघोष ).

श्रावस्ती नगरीच्या नजीक सरवणग्रामांत त्याचा जन्म झाला. त्याच्या बापास मंखलि म्हणत, कारण तो चित्रें दाखवून आपली उपजीविका करी ( असा धंदा करणाऱ्या भिक्षूस मंख म्हणत ). त्याच्या आईचें नांव भद्दा. एकदां भटकतां भटकतां मंखली सरवणांत आला व दुसऱ्या कोठें आसरा न मिळाल्याकारणानें एका धनाढ्य ब्राह्मणाच्या गोशाळेंत राहिला. तेथें त्याची

पत्नी प्रसूत झाली. तो गोशाळेंत जन्मला म्हणून त्या मुलाचें नांव गोसाल ठेविलें. मोठा झाल्यावर त्यानें बापाचाच धंदा चालूं ठेवला. त्यावेळीं महावीर तीस वर्षें वयाचा असतां प्रव्रज्या घेऊन राजगृहानजीक नालंदा गांवांत एका कोष्ट्याच्या घरांत दोन वर्षें राहिला होता. गोसालही भटकतां भटकतां तेथें आला. विजय नांवाच्या धनाढ्य गृहपतीनें महावीराचा आदर केलेला पाहून त्यास महावीराचा शिष्य होण्याची इच्छा झाली. परंतु पहिल्यानें महावीरानें त्याचा स्वीकार केला नाहीं. पुन्हां गोसालानें दोनदां आनंद व सुदर्शन या गृहपतींना महावीराचा सत्कार करितांना पाहिल. नंतर एकदां महावीर नालंदेजवळ कोल्लाग येथें गेला असतां गोसालास त्याचा पत्ता न लागून तो भांडीं, वस्त्रें पादुका, चित्रें वगैरे सर्व एका ब्राह्मणास देऊन टाकून दाढी व केस काढून टाकून तेथून निघाला तो पुन्हां कोल्लाग येथें त्याची व महावीराची गांठ पडली. यावेळीं महावीरानें त्याचा स्वीकार केला व ते दोघेहीं पणियभूमींत सहा वर्षें तपश्चर्या करीत एके ठिकाणीं राहिले. त्यानंतर एकदां ते सिद्धत्थगामाहून मुक्कामास जात असतां त्यांना एक तिळाचें झाड लागलें. तेव्हां गोसालानें महावीरास विचारिलें कीं, ‘ हें झाड मरेल कीं नाहीं आणि याच्या बिया कोठें उगवतील ?’ महावीरानें उत्तर दिलें, ‘हें झाड मरेल, परंतु याच्या बिया येथेंच शेतांत राहतील.’ गोसालास तें खरें वाटलें नाहीं, व त्यानें तें तावडतोब उपटून टाकिलें. परंतु इतक्यांत पावसाची सर येऊन ते झाड पुन्हां उगवलें व शेतांत बिया उत्पन्न झाल्या. ते कुम्मगामास गेल्यावर गोसालानें वेसियायन नांवाच्या लिखांनीं नखशिखांत भरलेल्या व हात जोडून सूर्योपासना करीत उभा असलेल्या तपस्व्याची थट्टा केली, त्यावरून त्यास राग येऊन आपल्या ऋद्धीनें त्यानें गोसालास, मारण्याचा प्रयत्न केला. परंतु महावीरानें त्यास वांचाविलें. एवढें त्याचें सामर्थ्य पाहून तें कशामुळें आपणास प्राप्त झालें असा गोसालानें महावीरास प्रश्न केला. महावीरानें ऋद्धी प्राप्त करून देणारा तपोपक्रम त्यास सांगितला. परत येतांना गोसालास त्या झाडाच्या शेतांत बी दिसलें व महावीराच्या म्हणण्याची सत्यता पटली. नंतर गोसाल म्हणूं लागला कीं,‘ नुसती झाडेंच नव्हेत तर सर्व प्राणी पुनः पुनः जिवंत होतात.’ परंतु महावीरास तें पटले नाहीं. तेव्हां गोसाल त्यास सोडून गेला व महावीरानें सांगितलेल्या तपोपक्रमानें सहा महिन्यांतच त्यास ऋद्धिसिद्धी प्राप्त झाल्या. तो आपणास जिन म्हणवूं लागला व आजीविक नांवाचा पंथ त्यानें सुरू केला. त्याचें मख्य ठिकाण श्रावस्ती नगरींत हालाहला नांवाच्या एका कुंभारणीच्या घरांत होतें. यानंतर २४ वर्षांनीं सहा दिशाचारी

नांवाचे भिक्षू त्याजकडे आले. त्यांच्यांशीं त्यानें वाद केला. त्याचें स्वतःचें आठ महानिमित्तें हें मत जैनांच्या पूर्व नांवाच्या ग्रंथांतून घेतलें होतें. त्यामध्यें लाभ, अलाभ, सुख, दुःख, जीवित व मरण हीं मुख्य तत्त्वें होतीं. त्याच वेळीं महावीर श्रावस्तीस आला व त्यास ही बातमी त्याचा शिष्य इंद्रभूती याजकडून कळली. तेव्हां त्यानें सांगितलें कीं गोसाल जिन मुळींच नाहीं. ही बातमी जिकडे तिकडे पसरली. त्यानंतर एकदां महावीराचा शिष्य आनंद हा हालाहलेच्या दुकानावरून जात असतां गोसालानें त्यास पाण्याकरितां वारूळ खोदणाऱ्या मूर्ख वाणिजांस त्यांतून सर्प निघून कसा चावला ही गोष्ट सांगून महावीराचीही तीच गत होणार असें सांगितलें. महावीर म्हणाला, ‘ त्याच्या अंगीं ऋद्धी सिद्धी आहेत. परंतु मी अर्हत् असल्याकारणानें त्या मला कांहींही करूं शकणार नाहींत. माझ्या अनुयायांनीं त्याच्याशीं कोणत्याही प्रकारें संबंध ठेवूं नये. ’ तेव्हां गोसाल आपल्या अनुयायांसह महावीराकडे येऊन म्हणाला, ‘ तूं मला आपला शिष्य म्हणवितोस, पण तो शिष्य मेला व देवलोकांत गेला. मी खरोखरी उदायि कुंडियायणिय असून या सातव्या जन्मांत गोसालाच्या शरीरांत शिरलों आहें. मी २२ वर्षे एणेज्जग, २१ वर्षे मल्लराम, २० वर्षे मंडिय, १९ वर्षे रोह, १८ वर्षे भारद्वाई, १७ वर्षे अज्जुण गोयमपुत्त व १६ वर्षे गोसाल मंखलिपुत्त यांच्या शरीरांत वास केला आहे. ’ महावीर त्यास म्हणाला, ‘ तूं चोर आहेस आणि आतां उगीच लपवालपवी करूं पहात आहेस. ’ तेव्हां तो महावीरास शिव्या देऊं लागला. महावीराचे शिष्य सर्वानुभूती व सुनक्षत्र हे त्यास आडवूं लागले असतां त्यांचा अग्नितेजानें त्यानें नाश केला, परंतु महावीरापुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं, व तो अग्नि त्याच्याच शरीरांत परत आला. गोसालास तें न समजून तो महावीरास म्हणाला, ‘ तूं सहा महिन्यांत मरशील. ’ महावीरानें उत्तर दिलें, ‘ मी आणखी सोळा वर्षे जगणार आहें. परंतु तूं मात्र सात दिवसांतच मरशील. ’ ही बातमी सर्व गांवांत पसरून जिकडे तिकडे चर्चा सुरू झाली. महावीराचे अनुयायी गोसालाकडे जाऊन त्यास नानातऱ्हेचे प्रश्न विचारूं लागले. त्यांचीं त्यास उत्तरें देतां येईनात, तेव्हां त्याचे बरेच अनुयायी त्यास सोडून महावीराकडे आले. गोसाल तापानें पडला व हालाहलेच्या दुकानांत जाऊन एक आंबा हातांत घेऊन दारू पिणें, गाणें, नाचणें, हालाहलेची याचना करणें व मडक्यांतील गार पाणी अंगावर उडवून घेणें इत्यादि क्रिया करूं लागला. महावीरानें त्याच्या अनुयायांना या कृत्यांपासून गोसालाचीं मतें कशीं उत्पन्न झालीं हे सांगितलें. दारू पिणें वगैरे

पासून आठ अंत्यें ( अट्ठ चरमाई ) उत्पन्न झालीं, तीं अशीं. शेवटचें दारू पिणें, शेवटचें गाणें, शेवटचें नाचणें, शेवटची याचना, शेवटचें तुफान, शेवटचा सेचनक हस्ती, शेवटचें शिलास्त्रांनीं युद्ध व शेवटचा तीर्थंकर म्हणजे मंखलिपुत्त होय. पुनःपुनः तो गार पाण्यानें आंग भिजवूं लागला. त्यावरून त्याचीं चार पेयें व चार अपेयें म्हणजे पेयासारखेच थंड पदार्थ ( चत्तारि पाणगाई चत्तारि अपाणगाई ) यासंबंधाचें तत्व निघालें. चार पेयें म्हणजे गोपृष्ठक, हस्तमर्दित (कुंभाराच्या भांड्यांतील पाणी ), आतपतप्त व शिलाप्रभ्रष्ट. चार अपेयें म्हणजे थंडगार उदकानें भरलेलें पात्र हातांत धरणें पण तें पाणी न पिणें, एखादें मऊ फळ तोंडांत धरणें पण त्याचा रस न पिणें, मूग, उडीद वगैरे तोंडांत धरणें पण ते चावून त्यांचा रस न पिणें, व दोन महिने जमिनीवर, दोन महिने फळ्यांवर व दोन महिने दर्भावर निजून शुद्ध अन्न खाणें. म्हणजे सहा महिन्यांनंतर रात्रीं पुण्णभद्द व माणिभद्द हे देव त्याजकडे येऊन थंडगार हातांनीं त्याचें अंग चेपतात. ही सेवा जो करून घेतो तो सर्पांचें काम चालवितो, परंतु जो सेवा घेत नाहीं त्याचें शरीर अग्नि दहन करितो व त्यास मरण व पूर्णत्व प्राप्त होतें. हें शुद्ध पान होय. अशा तऱ्हेचे वेडे चार करीत तो लवकरच मेला. खि. पू. ४८४ हें महावीराच्या मृत्यूचें वर्ष धरिलें तर गोसालाचा मृत्यु खि. पू. ५०० यावर्षीं पडतो. [ भगवती १५. Hœrnle. उवासगदसाओ App. I. Rockhill p. 249. ]

मक्खलि अथवा मंखलि हा शब्द खरोखरी मस्करिन् या संस्कृत शब्दापासून आलेला आहे. पाणिनीच्या मतें ( ६·१·१५४ ) मस्कर ( बांबू ) धारण करणारा तो मस्करी. यांस एकदण्डिन् असेंही नांव असे. पतंजली (३-९६) म्हणतो कीं मस्करी म्हणजे ज्यानें सर्व कर्मांचा त्याग केला आहे असा परिव्राजक. मंखलिपुत्त म्हणजे मस्करीसंघांतील भिक्षु. आजीविकांस तेरासिय ( त्रैराशिक ) असेंही नांव दिलेलें जैन ग्रंथांतून आढळतें. तेरासिय म्हणजे प्रत्येक गोष्टीचें सत्य, असत्य व दोन्हीं ( सत्, असत्, सदसत् ) असे तीन भाग करणारे. जैनांचा स्याद्वाद अशाच तऱ्हेचा आहे.

आजीविकांच्या मतांतील मुख्य भाग या सूत्रांत दिलेलाच आहे व तो जैन ग्रंथां-

---

१ हा हत्ती मगधदेशाचा राजा श्रेणिक यानें आपला धाकटा मुलगा वेहल्ल यास दिला होता. त्याचा थोरला मुलगा कूणिय यानें बापास पदच्युत करून राज्य बळकाविल्यावर तो हत्ती धाकट्या भावाकडून घेण्याकरितां त्याच्याशीं युद्ध मांडिलें. तेव्हां तो आपला आजा वेसालीचा चेडग राजा याकडे परत गेला. तेव्हां कूणियानें चेडगाशीं युद्ध आरंभिलें. हें युद्ध खि. पू० ५०० या वर्षीं झालें असावें ( निरयावलिय सुत्त १८ ).

तही आढळतो[1]. गोसाल हा कांहीं काळ महावीराचा शिष्य असल्याकारणानें त्याचीं बरीचशीं मतें जैनग्रंथांतून घेतलेलीं आहेत. भगवती या जैनग्रंथांमध्यें गोसालानें आपलें मत जैनांच्या 'पूर्व' नांवाच्या ग्रंथांतील आठ महानिमित्तांमधूनच उचलिलें असें म्हटलें आहे. प्राण्यांचे निरानिराळे प्रकार हें तर त्यावेळच्या बहुतेक आचार्यांचें मत असावें असें दिसतें. आजीवक आत्मा मानीत असत व मरणानंतर तो रूपी असतो असेंही त्यांचें म्हणणें असे ( दीघ १.२.३८ पहा ). पुनर्जन्म, अट्ठचरमाइं, चत्तारि पाणगाइं, अपाणगाइं वगैरे मतें वर आलेलींच आहेत. ते नग्न ( अचेलक[2] ) असत व त्यांचा देहदंडनावर फार भर असे[3].

एकंदरीनें त्याची वागणूक भोंदू गुरूप्रमाणें दिसून येते[4]. मज्झिम ३६ येथें

१. उवासगदसाओ, अज्झयण ६. एका देवानें कुंडकोलियाच्या पुढें गोसालाच्या 'बल नाहीं, वीर्य नाहीं' इत्यादी मतांची स्तुती केली. तेव्हां त्यानें त्या देवास विचारिलें कीं, 'जर वीर्य वगैरे नाहीं तर तुला प्रयत्नाशिवाय देवत्व कसें प्राप्त झालें?'

२. महावग्ग ८.१५.२-६, पातिमोक्ख, निस्सग्गिय पाचित्तिय ६.२ पाचित्तिय ४१.१ व जातक १४४ पहा.

भगवती ८.५. आजीवियसमयस्स णं भंते अयमट्ठे पण्णत्ते अक्खीणपडिभोगिणो सव्वसत्ता से हंता छेत्ता भेत्ता लुंपित्ता विलुंपित्ता उद्दवइत्ता आहारमाहारेंति ।

भगवती १५.१. कासवा, अम्हं समयंसि केइ सिज्झिसु वा सिज्झिति वा सिज्झिस्संति वा, सव्वे ते चउरासीइमहाकप्पसयसहस्साइं सत्त दिव्वे सत्त संजूहे सत्त सण्णिगब्भे सत्त पउट्टपरिहारे पंच कंमणिसयसहस्साइं सट्ठिं च सहस्साइं छच्च सए तिणि य कंमंसे अणुपुव्वेणं खवइत्ता तओ पच्छा सिज्झंति बुज्झंति मुच्चंति परिणिव्वाइंति सव्वदुक्खाणमंतं करिंसु वा करिंति वा करिस्संति वा । मागें पृ० ६० पहा.

३ त्यांच्या देहदंडनाचे अनेक प्रकार दीघ ८, मज्झिम ३६, जातक ९४, १४४ येथें सांपडतात. ते नवीन येणाऱ्याच्या हातावर डाग देत. जातक ४३८.

संयुत्त २.३.१० येथें सहाली देवपुत्त म्हणतो,

तपोजिगुच्छाय सुसंवुतत्तो वाचं पहाय कलहं जनेन
समोसवज्जा विरतो सच्चवादी न हि नून तादिसं करोति पापं ।

४. उवासगदसाओ, अज्झयण ७. गोसालाचा अनुयायी सद्दालपुत्त कुंभार यास एका देवानें एक ब्राह्मण तुझ्या भेटीस येणार आहे असें सांगितलें. त्यास वाटलें कीं गोसालच येणार आहे. परंतु खरोखर महावीर आला व त्यानें 'वीर्य नाहीं असें कसें होईल, मडकीं सुद्धां प्रयत्नाशिवाय होत नसतात,' इत्यादी उपदेश केला. तेव्हां सद्दालपुत्त त्याचा अनुयायी बनला. पुढें गोसाल आला व कोठेंच भिक्षा मिळत नाहीं असें पाहून त्यानें लबाडीनें महावीराची स्तुती आरंभिली. मग त्यास भिक्षा मिळाली व तो तेथून निघून गेला.

सच्चक म्हणतो कीं हें देहदंडन तो नेहमींच करितो असें नाहीं. यावरून त्याची लबाडी दिसून येते. मज्झिम ७६ येथें बुद्धानें त्याच्या पंथास अब्रह्मचरियवासांत घातलें आहे[1]. महावीरापासून निघून जाण्यास त्यास असेंच कारण झालें. सूयगडंग २.६.८ येथें गोसालाचा आर्द्रकाशीं जो संवाद झाला त्यांत आर्द्रकानें त्यास

सीतोदगं वा तह बीयकायं आहाय कम्मं तह इच्छियाओ
एयाइं जाणं पडिसेवमाणा अगारिणो अस्समणा भवन्ति ।

असें म्हटलें आहे[2].

शिवाय चातुर्याम त्यास पसंत नव्हता, परंतु कांहीं देहदंडनाच्या पकारांचा त्यास अतिरेक करावयाचा होता. पात्र घेऊं नये, हातांतूनच अन्न खावें, नग्न रहावें, स्त्रीसंबंधाविषयीं निर्बंध नसावा, वगैरे तऱ्हेचे त्याचे विचार होते[3]. तो कुंभारणीच्या घरीं राहिला होता यावरून त्याचें शील कोणत्या दर्जाचें होतें हें स्पष्टच होत. गोसालाचा संघटित संघ असा मुळींच नव्हता. अर्थातच विशेष बंधनें अशीं कांहीं त्यास नव्हतींच. त्याच्याशिवाय नंद वच्छ व किस संकिच्च असे आजीविकांचे आणखी दोन गुरू होते[4] ( मज्झिम ७६ ).

---

१. 'भिक्षूहो, मला या मूर्ख मक्खलीसारखा बहुजनांच्या व देव आणि मनुष्य यांच्या दुःखास कारण होणारा असा दुसरा एकही मनुष्य दिसत नाहीं. तो माशांच्या अहितास व दुःखास कारण होणाऱ्या जाळ्याप्रमाणें आहे. ज्याप्रमाणें, भिक्षूहो, विणलेल्या वस्त्रांत केशकंबल अति वाईट—तें थंडींत थंड व उन्हांत ऊष्ण, दुर्वर्ण, दुर्गंध, दुःखस्पर्श असतें—त्याप्रमाणें निरनिराळ्या श्रमणांच्या मतांमध्यें मक्खलीचें मत अतिशय वाईट. मक्खलि म्हणतो कीं, 'कर्म नाहीं, क्रिया नाहीं, वीर्य नाहीं.' 'मक्खली सर्व क्रियावाद्यांच्या पूर्वींही विरुद्ध होता, आतांही आहे व पुढेंही असेल.' अंगुत्तर १.१८.४.

'माझ्या ध्यानांत असलेल्या एक्याण्णव कल्पांत एकाशिवाय दुसरा कोणी आजीवक स्वर्गलोकास गेल्याचें मला स्मरत नाहीं, आणि तो एकही कर्मवादी, क्रियावादी होता.' मज्झिम ७१. २. तसेंच सूयगडंग १.१.३.१३. 'बंभचेरे ण ते वसे'

३. भगवती ८.५. ते उदुंबर, वट, बदर, सतर व प्लक्ष या पांच वृक्षांचीं फळें व पलांडु, लशुन व कदमूल हीं खात नाहींत.

अणिल्लंछिएहिं अणक्कभिण्णेहिं गोणेहिं तसपाणविवज्जिएहिं वित्तेहिं वित्तिं कप्पेमाणा विहरंति ।

४. भगवती ८.५ येथें कांहीं प्रमुख आजीविक उपासकांचीं नांवें दिलीं आहेत. तीं अशीं. ताल, तालपलंब, उव्विह, संविह, अवविह, उदअ, नामुदअ, नमुदअ, अणुवालअ, संखवालअ, अयंपुल, कायरिअ.

आजीविकांचा हा पंथ पुष्कळ शतकें चालू होता. त्यांविषयीं उल्लेख पुढील-प्रमाणें आहेत.[1]

इ. स. पू. २५१. अशोकानें बाराबर पर्वतांतील गुहा त्यांजकरितां खोदविल्या.

इ. स. पू. २३६. आजीविक व निगंठ यांजकरितांही अशोकानें धर्ममहामात्र नेमिले. ( Pillar Edict VII ).

इ. स. पू. २२७. अशोकाचा नातू दशरथ यानें नागार्जुनी पर्वतांतील गुहा त्यांजकरितां खोदविल्या.

इ. स. ५५०. वराहमिहिरानें (बृहज्जातक) त्यांस एकदण्डिन् म्हटलें आहे.

इ. स. ८७६. शीलांकाच्या टीकेंत त्यांस कोठें दिगंबर व कोठें त्रैराशिक असें म्हटलें आहे.

इ. स. ९५०. हलायुधानें ( अभिधानरत्नमाला) त्यांस दिग्वासस् असें नांव दिलें आहे.

इ. स. १२३८. राजराज नांवाच्या चोल राजानें त्यांजवर कर बसविले.

आजीविकासंबंधीं संपूर्ण माहिती Hastings. Encyclopaedia of Religion and Ethics. Vol. I. 259-263 येथील Hoernle यांच्या लेखांत सांपडेल.

### ३ अजित केसकंबली.

मनुष्याच्या केसांचें कांबळें धारण करणारा अजित. याविषयीं कांहींही माहिती सांपडत नाहीं.[2]

### ४ पकुध कच्चायन.[3]

यानें थंड पाणी वापरावयाचें नाहीं असा नियम केला होता. शौचाहून आल्यावर देखील ऊन पाणी नसलें तर थंड पाण्याचा उपयोग तो करीत नसे. वाटेंत नदी लागली तर पलीकडे जाऊन वालुकास्तूप करून त्यापुढें तो शील-समादान करी (बुद्धघोष).

### ५ संजय बेलट्ठिपुत्त.

सारिपुत्त व मोग्गल्लान हे त्याचे अनुयायी होते. ते अडीचशें लोकांसहित

---

१. बौद्धग्रंथांतील बाकीचे उल्लेखः-महावग्ग १.६.७; चुल्लवग्ग ११.१.१; ५.८.३.२; ६.१०.१; सुत्तविभंग, पाचित्तिय ३२.८; संघादिसेस ५.१; भिक्खुणिसंघादिसेस १.१, जातक ४९; दिव्यावदान २७, २८. २. मज्झिम ६०, ७६, ११४, ११७; संयुत्त २४.५, धम्मसंगणी १२१५, १३६२, १३६४ येथें त्याचीं मतें नुसतीं नांवाशिवाय दिलीं आहेत. ३. ककुध असाही पाठ आहे. संयुत्त २४.८ व मज्झिम ७६ येथें त्याचें नुसतें मत दिलें आहे.

बुद्धाकडे जाऊं लागले तेव्हां संजयानें त्यास आपल्या बरोबरीचा मान देण्याचें कबूल केलें. पण तें त्यांनीं नाकारिलें. त्याबरोबर त्यास ऊष्ण रक्ताची उलटी येऊन तो मरण पावला[1]. ( महावग्ग १.२३–२४ ).

## ६ निगण्ठ नातपुत्त.

निर्ग्रंथ ज्ञातृपुत्र अथवा वर्धमान महावीर. जैनांचा शेवटला तीर्थंकर. हा क्षत्रिय असून ज्ञातृकुलांमध्यें वेसाली नगरीजवळील कुण्डग्रामांत जन्मला. त्याच्या बापाचें नांव सिद्धार्थ व आईचें नांव त्रिशाला असें होतें. त्याचीं लहानपणचीं बरींच दैवी कृत्यें जैन ग्रंथांतून वर्णिलीं आहेत[3]. पुढें त्याचें लग्न यशोदेशीं झालें व त्यास अनोज्जा नांवाची एक मुलगीही झाली. त्याच्या वयाच्या तिसाव्या वर्षीं त्याचीं आईबापें वारलीं. त्याबरोबर घरांतून निघून जाऊन त्यानें पार्श्वनाथाचा पंथ स्वीकारिला, आणि बारा वर्षें घोर तप करून व अतिशय हाल सोसून कैवल्य प्राप्त करून घेतलें[4].

या अवधींतच गोसाल त्यास येऊन मिळाला व ते दोघे सहा वर्षें बरोबर राहिले. परंतु पुढें गोसाल त्यास सोडून गेला. कैवल्यप्राप्तीनंतर महावीर बेचाळीस वर्षें जगला. त्या कालांत तो एकसारखा धर्मोपदेश करीत हिंडत होता. वयाच्या बाहत्तराव्या वर्षीं तो पावा येथें मरण पावला. ही गोष्ट ख्रि. पू. ४८४ या सुमारास घडली असावी. त्याचे इंद्रभूति आदिकरून अकरा गणधर होते. ( Mrs. Stevenson. The Heart of Jainism, pp. 21–47 पहा ).

---

१. Hardy (Manual p. 202) म्हणतो कीं, संजयाच्या पांचशें अनुयायांपैकीं त्याजबरोबर अडीचशेंच गेले व बाकीचे राहिले. यावरून तो त्यावेळीं मरण पावला असें दिसत नाहीं. Rockhill ( p. 45 note ) म्हणतो कीं, हा संजय व सारिपुत्त आणि मोग्गल्लान यांचा गुरु संजय हे दोघे अगदीं निराळे आहेत. ब्रह्मजालसुत्तांतील सुप्पिय हाही त्याचाच अनुयायी होता. २. मला क्लेशग्रंथि नाहीं असें तो म्हणे, म्हणून त्याचें नांव निगण्ठ पडलें ( बुद्धघोष ). ३. कल्पसूत्रांत असें म्हटलें आहे कीं, महावीराचा आत्मा पहिल्यानें ब्राह्मणी देवनन्दा हिच्या कुक्षींत शिरला परंतु इंद्रानें तो तेथून काढवून त्रिशालेच्या कुक्षींत ठेवविला. Jacobi. Jain Sûtras I. xxxi पहा. ४. बौद्धांच्या ग्रंथांत तो आपण सर्वज्ञ सर्वदर्शी असून कोणत्याही स्थितींत ज्ञानदर्शन आपणापुढें नेहमीं असतें असें प्रतिपादन करी असें म्हटलें आहे. अंगुत्तर ३.७४; ९.३८; मज्झिम १४ पहा. ५. त्याचा शिष्य उपाली बौद्ध झाल्याबरोबर त्यास ऊष्ण रक्ताची उलटी होऊन तो मरण पावला ( मज्झिम ५६). त्याच्या मरणानंतर त्याच्या अनुयायांमध्यें आपसांत भांडणें सुरू झालीं ( मज्झिम १०४ ).

जैनांचें मुख्य मत म्हणजे त्यांचा अनेकान्तवाद होय. वस्तूंचें मूल द्रव्य कायमच असतें, परंतु त्यांचे गुणधर्म एकसारखे बदलत असतात. या दृष्टीनें एखादी वस्तू आहे असेंही म्हणतां येईल अथवा नाहीं असेंही म्हणतां येईल. आत्मा जेव्हां पापपुण्यामुळें केव्हां देव, केव्हां मनुष्य व केव्हां नरकवासी अशीं अनेक स्वरूपें घेतो, तेव्हां एका दृष्टीनें तो आत्मा कायमच आहे. परंतु निराळ्या दृष्टीनें पाहिलें तर तो या प्रत्येक बाबतींत निरनिराळा आहे.[1] जैनग्रंथांतून हें स्याद्वाद अथवा सप्तभंगीनय या पद्धतीनें सिद्ध केलें आहे. या पद्धतीनें कोणत्याही बाबतीविषयीं सात तऱ्हांनीं बोलतां येतें. त्या तऱ्हा अशा. स्यादस्ति (असेल), स्यान्नास्ति ( नसेल ), स्यादस्ति नास्ति ( एकदां असेल व एकदां नसेल ), स्यादवक्तव्यः ( एखादी वस्तु एकाच वेळीं असेल व नसेल असें प्रतिपादन करावयाचें असल्यास तिजविषयीं कांहींच सांगतां येत नाहीं असें म्हणणें ), स्यादस्ति अवक्तव्यः ( असेल असें सांगतां येत नाहीं ), स्यान्नास्ति अवक्तव्यः ( नसेल असेंही सांगतां येत नाहीं ), स्यादस्तिनास्ति अवक्तव्यः (असेल व नसेल याविषयीं कांहींच सांगतां येत [2]नाहीं ).

जैनांच्या मतें प्रत्येक वस्तूमध्यें जीव अथवा आत्मा आहे, आणि हे आत्मे एक नसून निरनिराळे आहेत. केवळ सजीव वस्तूंमध्येंच नव्हे तर पृथ्वी, आप, तेज, वायु यांच्या अत्यंत सूक्ष्म अणूंमध्येंही हे आत्मे [ जीव ] असतात. म्हणूनच त्यांतील कोणत्याही जीवास धक्का न लागेल अशा सावधगिरीनें वागलें पाहिजे. याकरितांच जैन थंड पाण्याचा उपयोग करीत नाहींत.[3] तापविलेल्या पाण्यांत मात्र ते जीव नसतात.

[4]आस्रवांमुळें आत्मा दूषित होतो, व कर्में करूं [5]लागतो. हाच आत्म्याचा बंध होय. या आस्रवांचा निरोध करणें व या रितीनें आत्म्याची मुक्तता

१. Bhandarkar, Search for Sanskrit Manuscripts, 1883–84 p. 95.

२. ब्रह्मजालसुत्त २·२३-२८, सामञ्ञफलसुत्त ३१ येथील मतांसारखीं मतें खोडून काढण्याकरितां ही पद्धती शोधून काढिली असें Prof. Jacobi ( Jain Sûtras II. xxvii ) यांचें म्हणणें आहे. ३. सो किर सीतोदके सत्तसञ्ञी अहोसि ( बुद्धघोष, सुमंगलविलासिनी २·२८ यावरील टीका ). ४ मोग्गल्लानानें वप्प सक्क निगंठसावकास विचारिलें कीं, ' ज्यास अविद्या नष्ट होऊन विद्या प्राप्त झाली, त्यास दुःखवेदनिय आस्रवांपासून त्रास होईल काय ? ' त्यानें उत्तर दिलें, ' होय. जर त्याच्या पूर्वींच्या कर्मांचें फल परिपक्क झालें नसेल तर होईल. ' इतक्यांत बुद्ध तेथें येऊन म्हणाले, ' जो नवीं कर्में करीत नाहीं व विपाकसेवनानें ज्याच्या मागील कर्मांचा नाश झाला आहे, त्यास दुःखवेदनिय आस्रव त्रास देतील काय ? ' तेव्हां त्यानें उत्तर दिलें, ' नाहीं.' बुद्ध म्हणाले, ' अशा मनुष्यास कोणतीही वेदना होणें शक्य नाहीं. 'अंगुत्तर ४·२०·५. ५. कायवाङ्मनःकर्म योगः । स आश्रवः । तत्वार्थाधिगम ६·१-२

करणें याचेंच नांव संवर.[1] मनुष्याचें मुख्य कर्तव्य म्हणजे मागील कर्मांचा समूळ नाश करणें व नवीन कर्म उत्पन्न होऊं न देणें हें होय. मागील कर्मांचा नाश तपाच्या योगानें केला व नवीन कर्मांचा प्रवेश संवराच्या योगानें थांबविला म्हणजेच प्राणी जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटतो. एवढ्याचकरितां जैनधर्मांचा तपोपक्रमांवर[2] अत्यंत भर आहे. त्यांच्या मतें पापनाशनार्थ दंडाचा अवलंब केला पाहिजे व सर्वांत उत्तम दंड म्हणजे कायदंड[3] होय (मज्झिम ५६).

इतके आयास करून जें ध्येय प्राप्त करून घ्यावयाचें तें निर्वाण अथवा मोक्ष होय, व तें मिळविण्यास त्रिरत्नांचा अवलंब केला पाहिजे. हीं तीन रत्नें म्हणजे सम्यक् ज्ञान, सम्यक् दर्शन व सम्यक् चारित्र होत. कर्मांचा नाश झाला म्हणजे यांची प्राप्ती होते, व नाश करण्यास साधनें म्हटलीं म्हणजे पंच महाव्रतें, शीलव्रतें इत्यादि होत. त्यांतील दिग्विरतिव्रताचा उल्लेख बौद्धग्रंथांत आला आहे. हें व्रत म्हणजे प्रत्येक दिशेस अमुक एका अंतराच्या पलीकडे मी जाणार नाहीं अशी प्रतिज्ञा करणें. यामध्यें अर्थात वाईट असें कांहींच नाहीं. परंतु एके ठिकाणीं बुद्धानें त्याची थट्टा केली[5] आहे.

१. आस्रवनिरोधः संवरः । तत्वार्थाधिगम ९.१. २. यासंबंधी उल्लेख मज्झिम १४, १०१, अंगुत्तर ३.७४ येथें आहेत. तेथें बुद्धानें म्हटलें आहे कीं, 'निगंठानो, तुम्हांस मागे जन्म होते कीं नाहीं, ते किती होते, त्यांमध्यें तुम्ही किती कर्में केलींत, त्यांतील तपाच्या योगानें किती नष्ट झालीं व किती राहिलीं, हें तुम्हांस कांहींही ठाऊक नाहीं. तेव्हां तुमचें तप व्यर्थ आहे ' तेव्हां ते म्हणाले, ' सुखानें सुख मिळत नसतें, तपादि आयासांनींच तें मिळवावयाचें असतें. ' बुद्धानें त्यांस उत्तर दिलें कीं, ' जर जुनीं पापकर्में नष्ट करण्याकरितां तुम्ही हें तप करीत असाल, तर या तपावरून सर्व निगंठ मागील जन्मीं फार पापाचरण करणारे असले पाहिजेत असें ठरतें. तेव्हां चोर, दरोडेखोर, परदारागमन करणारे इत्यादि पापी लोकांनींच तुमचा संघ भरला असला पाहिजे ! ' ३. तपसा निर्जरा च । तत्वार्थाधिगम ९.३. ४. या कायदंडांतील प्रमुख म्हणजे उपवास होत. कल्पसूत्र, सामाचारी २०-३०, दीघ ८.१४ पहा.

५ अंगुत्तर ३.७०.३ येथें निगंठउपोसथ म्हणजे काय हें समजावून देतांना भगवान् म्हणतात, ' विशाखे, निगंठ नांवाचे श्रमण आहेत. ते श्रावकांना असा उपदेश करितात कीं, ' हे पुरुषा, पूर्वादिक दिशांमध्यें शंभर योजनांपर्यंत जे प्राणी असतील त्यांस न दुखावण्याची काळजी घे '. अशा रीतीनें ते श्रावकांस कांहीं प्राण्यांवर दया करण्यास व दुसऱ्यांवर न करण्यास शिकवितात. आणखी ते असा उपदेश करितात कीं, ' हे पुरुषा, सर्व वस्त्रें बाजूस ठेवून असें म्हण कीं, ' मी कोठेंही, कोणाचाही, कोणीही नाहीं; माझें कोठेंही, कोणाचेंही, कोणीही नाहीं. ' परंतु त्याच्या आईबापांस तो आपला पुत्र असें वाटत असतें व तोही हे माझे आईबाप असें जाणतो. बायकापोरांस तो आपला भर्ता असें वाटत असतें व तोही हीं माझीं बायकापोरें असें जाणतो. चाकरनोकरांस तो आपला धनी असें वाटत असतें व तोही हे माझे चाकर नोकर असें जाणतो. तेव्हां असा उपदेश करून ते श्रावकांस खोटें बोलावयास शिकवितात ! आणि ते त्यांस चोरी करावयासही शिकवितात ! कारण दुसऱ्या दिवशीं जेव्हां तो पुन्हां तीं वस्त्रें नेसतो, तेव्हां तीं त्याचीं नसल्याकारणानें ( कारण त्यानें माझें कोणीही नाहीं असें म्हटलेलें असतें ) ती चोरी होते ! '

कर्मवादावर अवलंबून असणाऱ्या जैनांच्या एका विशिष्ट मताचाही येथें उल्लेख केला पाहिजे. कर्मांचा आत्म्याशीं संबंध घडला म्हणजे त्या एकंदर कर्मामुळें त्याजवर कोणत्या तरी प्रकारचा रंग चढतो. हा रंग जरी आपल्या डोळ्यांस दिसला नाहीं तरी तो तेथें असतोच, व त्याप्रमाणें जीवाच्या वृत्ती बनलेल्या असतात. यांस लेष्या असें नांव आहे. त्यांचे सहा प्रकार आहेत. त्यांतील कृष्णलेष्या सर्वांत वाईट. तिच्यामुळें प्राणी सर्व प्रकारचीं वाईट कर्में करण्यास उद्युक्त होतो. नीललेष्या असणारा प्राणी मत्सरी, आळशी, खादाड व दंगेखोर असतो. कपोतलेष्येनें प्राणी चोरी करणारा, खोटें बोलणारा, दुसऱ्याचे दोष काढणारा परंतु आपले दोष लपवून ठेवणारा होतो. तेजोलेष्येनें पापभीरुता, श्रद्धा, ज्ञान संपादन करण्याविषयीं उत्सुकता, सरलता इत्यादि गुण अंगीं येतात. पद्मलेष्यायुक्त प्राणी क्रोध, मान, माया, लोभ यांचें दमन करितो. शेवटची शुक्ललेष्या. तिच्या योगानें मनांतील द्वेषवृत्तीचा समूळ नाश होऊन अंतःकरण सर्व जगताविषयींच्या प्रेमानें भरून जातें. आत्म्याच्या वर्णासंबंधींच्या या मताचा त्या कालीं बराच प्रसार झाला होता असें दिसतें (पृष्ठ५९ येथील टीप पहा).

जैनधर्माची संपूर्ण माहिती देण्याचा उद्देश नसल्याकारणानें याशिवाय जैनांचीं नवतत्त्व, कर्म, व्रतें, गुप्ति, समिति, कषाय, भावना, चारित्र, गुणस्थानें इत्यादि जीं मतें आहेत त्यांविषयीं माहिती येथें दिली नाहीं.[1] येथें फक्त बौद्धधर्माचा अभ्यास करणारास त्यांतील जेवढी माहिती उपयुक्त होईल तेवढीच देण्याचा प्रयत्न केला आहे.

आतां बौद्धग्रंथांतून निगंठांचीं म्हणून जीं मतें दिलीं आहेत त्यांचा विचार करूं. सिंह नांवाचा सेनापती निगंठांचा श्रावक होता, त्यानें निगंठ नातपुत्ताजवळ श्रमण गौतमास भेटण्यास जाण्याची परवानगी मागितली. तेव्हां नातपुत्त म्हणाला, ‘ तूं क्रियावादी[2] असून अक्रियावादी अशा श्रमण गौतमाला भेटण्याची कां इच्छा करितोस ? ’ तरीही सिंह गेलाच. तेव्हां बुद्धानें त्यास आपणास क्रियावादी व अक्रियावादी हीं दोन्हीं विशेषणें कशीं लागूं पडतील हें अनेक प्रकारांनीं सांगितलें ( महावग्ग ६-३१. अंगुत्तर ८-१२ ).

---

१. त्याकरितां Hastings. Encyclopædia of Religion and Ethics. Vol. VII. Article on Jainism ( Jacobi ) व Mrs. Stevenson. The Heart of Jainism हीं पुस्तकें पहावीं. २ क्रियावाद म्हणजे कर्माचें यथायोग्य फल मिळतें असा विश्वास. गौतम आत्मा मानीत नसल्याकारणानें कर्माचें फलही त्याच्या दृष्टीनें नसणार अशा समजुतीनें निगंठ नातपुत्तानें त्यास अक्रियावादी म्हटलें आहे.

एकदां बुद्धानें असिबंधकपुत्त गामणि निगंठसावक यास निगंठांचा धर्म काय आहे म्हणून विचारिलें. तेव्हां तो म्हणाला, ‘ प्राणघात, अदत्तादान, व्यभिचार व खोटें भाषण करणारे सर्व नरकाप्रत जातात. ज्यामध्यें मनुष्य जास्त वेळ व्यग्र असतो त्यानें त्याची सुटका होते (?) [ यं बहुलं यं बहुलं विहरति तेन तेन निय्यति ]. ’ तेव्हां बुद्ध म्हणाला, ‘ जर तुमचें शेवटचें म्हणणें खरें असेल तर कोणीच नरकांत जाणार नाहीं. कारण प्राणघात वगैरे करणारा मनुष्य त्याच कर्मांत अधिक व्यग्र असतो ’ ( संयुत्त ४२·८ ).

निगंठ नातपुत्त एकदां मच्छिकासंड येथें असतां चित्त गृहपती त्याकडे गेला. तेव्हां नातपुत्तानें त्यास विचारिलें, ‘ गौतमाचें अवितक्कअविचारसमाधि असते हें मत तूं खरें मानितोस काय ? ’ त्यानें ‘ नाहीं ’ असें उत्तर दिलें. तेव्हां नातपुत्तानें त्यास शाबासकी दिली व वितर्क आणि विचार यांचा निरोध होणेंच शक्य नाहीं असें प्रतिपादन केलें. नंतर चित्तानें विचारिलें, ‘ ज्ञान श्रेष्ठ कीं श्रद्धा श्रेष्ठ ? ’ नातपुत्त म्हणाला, ‘ ज्ञान. ’ चित्त बौद्धांचीं चार ध्यानें सांगून म्हणाला, ‘ हीं चार ध्यानें मला अवगत आहेत. तेव्हां गुरूवर श्रद्धा ठेविण्याचें मला काय कारण आहे ? ’ नातपुत्त त्याची निर्भर्त्सना करूं लागला, तेव्हां चित्तानें त्याचें कृत्य विसंगत कसें आहे हें दाखवून दिलें ( संयुत्त ४१·८ ).

मज्झिम ७९ येथें सकलुदायि परिव्राजक म्हणतो, ‘ आपणास सर्वज्ञ सर्वदर्शी म्हणविणाऱ्या निगंठ नातपुत्ताला मीं एकदां पूर्वजन्मांविषयीं विचारिलें, तेव्हां त्यास कांहींही उत्तर देतां न येऊन तो उलटा मजवरच चिडला. ’

संयुत्त २·३·१० येथें निंक देवपुत्तानें नातपुत्ताची पुढीलप्रमाणें स्तुती केली आहेः—

जेगुच्छी निपको भिक्खु चातुयामसुसंवुतो
दिट्ठं सुतं च आचिक्खं न हि नून किब्बिसी सिया ।

बुद्धाच्या निगंठांशीं झालेल्या वादांचीं वर्णनें बौद्धग्रंथांतून आढळतात. एकदां नालंदेंत भयंकर दुष्काळ पडला असतां निगंठ नातपुत्तानें असिबंधकपुत्त गामणि यास बुद्धाशीं वाद करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो बुद्धाकडे येऊन म्हणाला, ‘ गौतमा, दया, रक्षा, अनुकंपा हे गुण चांगले आहेत असें तूं म्हणतोस ना ? ’ बुद्धानें ‘ होय ’ असें उत्तर दिल्यावर तो म्हणाला, ‘ तर मग येथें एवढा दुष्काळ पडला असतांना तूं आपल्या अनुयायांसह येथें राहून लोकांवर कां भार घालीत आहेस ? ’ बुद्धानें ज्यामुळें त्रास होतो अशीं आठ कारणें दाखवून म्हटलें, ‘ या आठ कारणांनीं लोकांस त्रास होतो, मजमुळें नव्हे. ’(संयुत्त ४२·९).

दुसऱ्या एका प्रसंगीं निगंठ नातपुत्तानें अभय राजकुमारास सांगितलें कीं, ‘ तूं बुद्धाकडे जा व त्यास विचार कीं, तूं कोणाविषयीं वाईट शब्द बोलतोस काय ? जर तो होय म्हणाला तर त्याच्यामध्यें आणि साध्या लोकांमध्यें काय फरक ? जर तो नाहीं असें म्हणाला तर तूं त्यास पुढें विचार कीं, मग तूं देवदत्ताविषयीं कां असें वाईट बोलतोस ? ’ अभयानें बुद्धास आपल्या घरीं भोजनास बोलावून त्यास हें सर्व विचारिलें. तेव्हां बुद्ध म्हणाला, ‘ लहान मुलाच्या घशांत कांहीं अडकलें तर तें आपण कोणत्या तरी रितीनें काढण्याचा प्रयत्न करितों. मग त्यामध्यें मुलास थोडी इजा झाली, रक्त निघालें, तरी त्याची आपण फिकीर करीत नाहीं ! तसेंच देवदत्ताच्या अंतिम कल्याणाची इच्छा असल्यामुळें मी ही खरी गोष्ट बोलतों. ’ ( मज्झिम ५८ ).

सच्चक निगंठपुत्त यांस केव्हां तरी बुद्धाशीं वाद करावयाचा होता. म्हणून तो एकदां बुद्धाकडे गेला व मनुष्याच्या शरीरांत पंचस्कंध हे पांच आत्मे आहेत असें प्रतिपादन करूं लागला. तेव्हां बुद्धानें त्यास असें दाखवून दिलें कीं, ज्याअर्थीं हे स्कंध अनित्य, दुःख व अनात्म असून निर्बल, असहाय आहेत, त्याअर्थीं ते आत्मे असणेंच शक्य नाहीं ( मज्झिम ३५ ).

या सर्व ठिकाणीं बौद्धांनीं जैनांचीं मतें बरोबर प्रतिपादन केलीं आहेत असें मुळींच म्हणतां यावयाचें नाहीं. एक पंथाचे लोक दुसऱ्या पंथाविषयीं बोलूं लागले तर त्यांत कांहीं गोष्टींचा विपर्यास केलेला आढळणारच, परंतु त्यामुळें त्या पंथाचीं खरीं मतें काय असावींत याचें अनुमान करण्यास जागा मिळते. म्हणून त्या प्रतिपादनांतील खरा भाग कोणता व खोटा कोणता हें निर्विकार चित्तानें व शास्त्रीय पद्धतीनें शोधून काढिलें पाहिजे[1].

---

१ बौद्धधर्म व जैनधर्म यांतील बऱ्याचशा मतांत साम्य असल्याकारणानें पहिल्यानें पाश्चात्य पंडितांस जैनधर्म म्हणजे बौद्धधर्माचा केवळ एक पंथ आहे असें वाटलें होतें, परंतु आतां तो अगदीं निराळा आहे हें सिद्ध झालें आहे. तरीही जैनधर्माच्या अभ्यासापासून बौद्धधर्माच्या अध्ययनास फार मदत होणार आहे. शिवाय जैनांच्या मूळ ग्रंथांतील अर्धमागधी भाषेशीं पाली भाषेचें बरेंच साम्य आहे. म्हणून बौद्धधर्माप्रमाणेंच जैनधर्माचाही खरा तुलनात्मक अभ्यास हिंदुस्थानांत सुरू होण्याची फार आवश्यकता आहे.

# ३ अंबट्ठसुत्त.

१ असें मी ऐकिलें आहे. एके समयीं भगवान् [ बुद्ध ] कोसल[1] देशांत पांचशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित हिंडत असतां त्या देशांतील इच्छानंगल नांवाच्या ब्राह्मणग्रामाकडे जाण्यास निघाले. तेथें भगवान् इच्छानंगल नांवाच्या वनांत रहात होते. त्यावेळीं पोक्खरसाती[2] नांवाचा ब्राह्मण उक्कट्ठानगरींत रहात होता. तें नगर माणसांनीं गजबजलेलें, तृण, काष्ठ, उदक व धान्य यांनीं परिपूर्ण, राजभोग्य असून कोसल देशाचा राजा पसेनदि[3] यानें राजदाय म्हणून ब्राह्मणास दान दिलें होतें[4].

२ पोक्खरसाती ब्राह्मणानें ऐकिलें कीं शाक्यपुत्र श्रमण गौतम शाक्यकुलांतून प्रव्रज्या घेण्याकरितां बाहेर पडून कोसल देशांत पांचशें

---

१ हल्लींचा अयोध्या प्रांत. त्याची राजधानी सावत्थी ही होती. काशी व साकेत यांचा या राज्यांत अंतर्भाव होत असे असें दिसतें ( Buddhist India. pp.3,25 ). २. पोक्खरसादि असाही पाठ आहे व तोच बरोबर दिसतो. सं० पौष्करसादि. शांखायन आरण्यक ७·१७, तैत्तिरीय प्रातिशाख्य ५.३७,३८वगैरे. (पुष्करसादींच्या वंशांतील). पण दिव्यावदान ३३ येथें पुष्करसारी असें नांव आढळतें. त्याचें पूर्ण नांव पोक्खरसादि ओपमञ्ञो सुभगवनिको असें होतें. ( मज्झिम ९९ ). Rockhill. p. 82 पहा. तेथें त्याच्या शिष्याचें नांव अप्रिय ( ? Ma-sdug ) असें दिलें आहे. ३. हा फार हुशार व सज्जन होता. त्याचे भगवंताशीं बरेच संवाद झाले. ते संयुत्तनिकायांतील कोसलसंयुत्तांत दिले आहेत. त्याचें अजातशत्रु राजाशीं जें युद्ध झालें त्याचा उल्लेख मागें आलाच आहे. ( पृ० ८८ ). त्यास शाक्यांच्या कुलांतील मुलीशीं लग्न करण्याची इच्छा झाली. शाक्यकुल त्याच्या सत्तेखालीं असल्याकारणानें त्यांस ही विनंति नाकारितां येईना. म्हणून त्यांनीं महानाम शाक्याची दासीपासून झालेली मुलगी वासभखत्तिया त्यास दिली. तिजपासून त्यास विडूडभ नांवाचा मुलगा झाला. (जातक ४६५). पसेनदिराजाचें खरें नांव कदाचित् अग्निदत्त असावें (दिव्यावदान ३३). Buddhist India pp. 8, 11 पहा. पसेनदि हें प्रसेनजित् याचें पाली रूप असतां कांहीं टीकाकारांनीं त्याचा पस्से नदी अस्स असा विग्रह केला आहे। ४. दिव्यावदान ३३ पहा. 'तस्मिं खलु पुनः समये पुष्करसारी नाम ब्राह्मण उत्कटं नाम द्रोणमुखं परिभुंक्ते स्म । सप्तोत्सदं सतृणकाष्ठोदकं धान्यसहगतं राज्ञाग्निदत्तेन ब्रह्मदेयं दत्तम् ।' राजभोग्य म्हणजे राजाकडून राहण्यासाठीं मिळालेलें, अथवा राजाप्रमाणें ज्यावर पूर्ण हक्क आहे असें. ब्रह्मदेय म्हणजे श्रेष्ठदेय. जें दिलें असतां केव्हांही परत घेतां येत नाहीं असें. ( बुद्धघोष ).

भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित हिंडत असतां इच्छानंगल नांवाच्या ब्राह्मणग्रामास येऊन तेथें इच्छानंगल नांवाच्या वनांत रहात आहे. त्या गौतमाची अशी कीर्ती पसरली आहे कीं अर्हत्, सम्यक्संबुद्ध, विद्या व आचरण यांनीं सपन्न, सुगत, सर्व लोक जाणणारा, सर्वश्रेष्ठ, दमन करण्यास योग्य अशा जनांचा मार्गदर्शक व देव आणि मनुष्य यांचा शास्ता असा भगवान् बुद्ध आहे. तो देवलोक, मारलोक व ब्रह्मलोक यांसहित हें जग व श्रमण आणि ब्राह्मण, देव आणि मनुष्य यांसाहित ही प्रजा स्वतः जाणून व पूर्णपणें ओळखून तें ज्ञान इतरांसही देतो व आरंभीं, मध्यें, व शेवटींही कल्याणप्रद, सार्थ व सव्यंजन असा धर्म व अगदीं पूर्ण व शुद्ध असें श्रेष्ठ आचरण हीं स्पष्टपणें दाखवितो. अशा अर्हन्तांचें दर्शन घेणें चांगलें.

३ त्यावेळीं पोक्खरसाती ब्राह्मणाचा अंबट्ठ नांवाचा एक तरुण शिष्य होता. तो अध्ययन करणारा, मंत्र शिकणारा, निघंटु[2], कैटुभ[3] व अक्षर-प्रभेद[4] यांसहित तिन्ही वेद व इतिहास पांचवा[5] यांचें अध्ययन केलेला, पदें व व्याकरण जाणणारा, लोकायत व महापुरुषलक्षणें[6] यांमध्यें निष्णात व आपल्या आचार्यांच्या त्रैविद्यशास्त्रांत इतका प्रवीण व पारंगत होता कीं

१. सामञ्ञफलसुत्त ४०. २. वेदांतील शब्दांचा कोश. ३. क्रियाकप्प-विकप्पो; कवीनं उपकारावहं सत्थं ( बुद्धघोष ). एकेकस्स अत्थस्स अनेकपरियाय-वचनविभावकं ( टीका ). ४. शिक्षा व निरुक्ति ( बुद्धघोष ). ५. अथर्ववेद चवथा धरून (बुद्धघोष). यावर न्हिस् डेव्हिड्स् यांचें असें म्हणणें आहे कीं बौद्धग्रंथांतून अथर्वाचा वेद म्हणून कोठेंही उल्लेख नाहीं. तेव्हां निघंटु, कैटुभ, अक्षर व प्रभेद यांसहित पांचवा इतिहास असा अर्थ करावा. परंतु हें बरोबर दिसत नाहीं. अथर्व पहिल्या तीन वेदांच्या जोडीचा म्हणून नसला तरी एक वेद म्हणून मानीतच असत. शिवाय इतर ठिकाणीं जे उल्लेख येतात त्यांवरून यास पुष्टी मिळते. ' इतिहासपुराणं पंचमं वेदानां वेदं ' ( छांदोग्य ७.१.२ ). ' रिउव्वेअ-जउव्वेअ-सामवेअ-अथव्वणवेअ-इतिहासपंचमाणं निघंटुच्छट्ठाणं संगोवंगाणं सरहस्साणं' कल्पसूत्र १०. ' अध्यापको मंत्रधरः त्रयाणां वेदानां पारगः सांगोपांगानां सरहस्याणां सनिर्घण्टकैटभानां साक्षर प्रभेदानां इतिहासपंचमानां सादृशो व्याकर्ता पदको वैयाकरणः लोकायतयज्ञतंत्रे महापुरुषलक्षणेषु पारगः । ' दिव्यानदान ३३. ६. दीघ १४.१.३२ व ३० (लक्खणसुत्त) पहा.

गुरूनें 'जें मला माहीत आहे तें तुला माहीत आहे व जें तुला माहीत आहे तें मला माहीत आहे,' असें म्हणावें.[1]

४ तेव्हां पोक्खरसाती ब्राह्मणानें अंबट्ठास बोलावून सांगितलें कीं, " बाळ अंबट्ठा, शाक्यपुत्र श्रमण गौतम शाक्यकुलांतून प्रव्रज्या घेण्या-करितां बाहेर पडून कोसलदेशांत पांचशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित हिंडत असतां [ या देशांतील ] इच्छानंगल नांवाच्या ब्राह्मणग्रामास येऊन तेथें इच्छानंगल नांवाच्या वनांत रहात आहे. त्या गौतमाविषयीं अशी कीर्ती पसरली आहे कीं अर्हन्........दाखवितो. अशा अर्हन्तांचें दर्शन घेणें चांगलें. तर बाळ अंबट्ठा, इकडे ये, श्रमण गौतमाकडे जा आणि श्रमण गौतम तसा असून त्याची तशी कीर्ती पसरली आहे कीं नाहीं, गौतम तसाच आहे कीं नाहीं, हें सोधून काढ म्हणजे मी त्याप्रमाणें श्रमण गौतमास ओळखीन. "

५ " पण, गुरुजी, श्रमण गौतम तसा असून त्याची यथायोग्य कीर्ती पसरली आहे कीं नाहीं, गौतम तसाच आहे किंवा नाहीं, हें मीं कसें ओळखावें ? "

" बाळ अंबट्ठा, आपल्या मंत्रांत बत्तीस महापुरुषलक्षणें सांगितलीं आहेत. त्यांनीं युक्त पुरुष असला म्हणजे त्याला फक्त दोनच गती शक्य असतात. जर तो घरांत राहिला तर तो चक्रवर्ती, धार्मिक, धर्मानें राज्य करणारा, चारी समुद्रांपर्यंत भूमीचा मालक, विजयी, सर्व देशांत शांतता राखणारा व सात रत्नांनीं युक्त असा राजा होतो[2]. त्याचीं सात रत्नें म्हणजे चक्र, हत्ती, घोडा, मणी, स्त्री, गृहपती, व परिणायक[3] हीं होत. त्याला हजारापेक्षां अधिक, शूर, वीर व शत्रुसेनेचा संहार करणारे असे पुत्र होतात. तो समुद्रापर्यंत ही पृथ्वी दंड अथवा शस्त्र यांवांचून केवळ धर्मानें जिंकून तिजवर वास करितो. परंतु जर त्यानें प्रव्रज्या घेतली

१. गुरूनें 'जें मला माहीत आहे तें तुला माहित आहे,' असें म्हटलें असतां, 'जें तुम्हास माहित आहे तें मला माहीत आहे' असें म्हणण्यालायक होता. (बुद्धघोष). २. दीघ १४.१.३१; १७.१.७–१७; ३०.१.३ पहा. ३. राजाचा ज्येष्ठ पुत्र. Adviser.

तर तो या जगामध्यें अर्हत्, सम्यक्संबुद्ध, लोकांच्या डोळ्यावरील आवरण[1] दूर करणारा होतो. अंबट्ठा, मी तुला मंत्र शिकविणारा आहें, तूं त्यांचें ग्रहण करणारा आहेस. ''

६ " ठीक आहे, '' असें उत्तर देऊन अंबट्ठ आसनावरून उठून पोक्खरसातीला नमस्कार करून प्रदक्षिणा घालून घोड्यांच्या रथांत बसून पुष्कळ तरुणांसहित इच्छानंगल गांवाकडे जाण्यास निघाला. जोंपर्यंत रथ नेणें शक्य होतें तेथपर्यंत रथांतून जाऊन नंतर खालीं उतरून तो पायांनींच आरामांत गेला.

७ त्या समयीं पुष्कळ भिक्षू मोकळ्या हवेंत हिंडत होते. अंबट्ठ त्यांच्याजवळ जाऊन त्यांना म्हणाला, " श्रमण गौतम आतां कोठें असेल ? त्याचें दर्शन घेण्याकरितां आम्ही येथें आलों आहों. ''

८ तेव्हां त्या भिक्षूना वाटलें कीं, हा अंबट्ठ [ नांवाचा ] तरुण मोठ्या कुलांतील असून कीर्तिमान् पोक्खरसाती ब्राह्मणाचा शिष्य आहे. अशा कुलपुत्राबरोबर भगवंतांस संभाषण करणें त्रासदायक वाटणार नाहीं. असा विचार करून ते अंबट्ठास म्हणाले, ' अंबट्ठा, ही जी दार बंद केलेली कुटी आहे, तिकडे मुकाट्यानें जा व सावकाश मंडपांत शिरून खांकरून अडसर वाजव म्हणजे भगवान तुला दार उघडतील. '

९ अंबट्ठानें दार बंद केलेली कुटी होती तिकडे मुकाट्यानें जाऊन सावकाश मंडपांत शिरून खांकरून अडसर वाजविला. तेव्हां भगवंतांनीं दार उघडलें व अंबट्ठ आंत शिरला.

त्याच्या बरोबरीचे शिष्यही आंत जाऊन भगवंतांशीं चार शब्द[2] बोलून बसले. परंतु अंबट्ठ उभा राहून व इकडे तिकडे हिंडून समोर बसलेल्या भगवंतांबरोबर गोष्टी बोलूं लागला.

१० नंतर भगवान् अंबट्ठास म्हणाले, " ज्याप्रमाणें समोर बसलेल्या मजबरोबर हिंडत हिंडत व उभ्यानें तूं संभाषण करीत आहेस,

---

१. राग, द्वेष, मोह, मान, दृष्टि, अविद्या व दुश्चरित हीं सात आवरणें (बुद्धघोष).

२. ' संमोदनीयं साराणीयं वीतिसारेत्वा. ' संमोदनीय व स्मरणीय भाषण संपवून. ' संमोदनीं संरंजनीं कथां व्यतिसार्य ' ( दिव्यावदान ४ ).

तशाच रितीनें तुझे वृद्ध व मोठे ब्राह्मण गुरु व गुरूंचे गुरू यांच्याशीं भाषण चालतें काय ? ”

“ नाहीं, गौतम. चालणाऱ्या ब्राह्मणांबरोबर चालत, उभ्या असलेल्या ब्राह्मणांबरोबर उभ्यानें, बसलेल्या ब्राह्मणांबरोबर बसून, निजलेल्या ब्राह्मणांबरोबर निजूनच बोललें पाहिजे. परंतु, गौतमा, जे मुंडित[1], क्षुद्र श्रमण, हलक्या दर्जाचे[2], काळे[3], व ब्रह्मदेवाच्या पायापासून उत्पन्न झालेले[4], त्यांच्या बरोबर आमचें तुझ्याबरोबर भाषण झालें अशाच रितीनें होतें. ”

११ “ अंबट्ठा, तूं येथें कांहीं तरी उद्देशानें आला आहेस. ज्या उद्देशानें एखाद्या ठिकाणीं जावें, तो उद्देश नीट ध्यानांत धरावा. या अंबट्ठाला योग्य शिक्षण मिळालें नसतां त्यास आपण सुशिक्षित[5] आहों असें वाटतें. याचें कारण शिक्षणाच्या अभावाशिवाय दुसरें काय असणार ? ”

१२ भगवंतांनीं अशिक्षितत्वाचा आरोप केल्यामुळें अंबट्ठास राग आला व वाईट वाटलें, आणि गौतमालाच पापी ठरवावें अशा उद्देशानें उपहास, निंदा व अपमान करीत तो म्हणाला, “गौतमा, शाक्यजाति[6] उग्र, रानटी, हलकट, बडबड करणारी आहे. हलक्या दर्जाचे असून

१. मूळ–‘ मुण्डका समणका इब्भा किण्हा बन्धुपादापच्चा’. मुण्डक व समणक येथें क प्रत्यय कुत्सितार्थी आहे. २ इब्भ (सं. इभ्य) ऋग्वेद १.६५.४ शत्रवो धनिनो वा (सायणाचार्य) Retainers; छान्दोग्य० १.१०.१.२ ईश्वरो हस्त्यारोहो वा (शंकराचार्य) Rich; गहपतिक ( बुद्धघोष ); इभो हत्थी परस्स वसेन वत्तति । एवमेतेऽपि ब्राह्मणानं सुस्सूसका सुद्दा परस्स वसेन वत्तन्ति ( टीका ). Menials. ३. ‘ ब्राह्मणवर्णच शुक्लवर्ण आहे, इतर वर्ण कृष्ण आहेत.’ अस्सलायनसुत्त (मज्झिम ९३). ४. ब्रम्हुनो पिट्ठिपादतो जाता ( बुद्धघोष). ‘ ब्राह्मण ब्रह्मदेवाच्या मुखांपासून उत्पन्न झाले, क्षत्रिय उरापासून, वैश्य नाभीपासून, शूद्र गुडघ्यापासून व श्रमण पायांपासून ( बुद्धघोष ). येथें ‘ पद्भ्यां शूद्रो अजायत.’ (ऋग्वेद १०.९०.१२) या वचनाचाच निर्देश केला आहे. परंतु अग्गञ्ञसुत्ताच्या अट्ठकथेंत बुद्धघोषाचार्यांनीं ‘ बन्धूऽति मारस्स बन्धुभूते मारपक्खिके । पादापच्चाऽति महाब्रम्हुनो पादतो जाते ’ असा अर्थ दिला आहे. महाभारत १२.२९६.६ येथें शूद्राचें लक्षण ‘ पादजाः परिचारकाः ’ असेंच दिलें आहे. Offscouring of our kinsmen's heels ( Rhl) ). ५. ‘वुसितवामानी.’ आपणास योग्य आचार, योग्य वागणूक, यांचें शिक्षण मिळालें आहे असें मानणारा . ६. या सूत्राच्या शेवटीं दिलेली टीप पहा.

शाक्य ब्राह्मणांचा सत्कार करीत नाहीत, त्यांचा गौरव करीत नाहीत, त्यांस मान देत नाहीत, त्यांची पूजा करीत नाहीत, त्यांची संभावना करीत नाहीत, हें योग्य नाहीं, उचित नाहीं."

अशा रितीनें अंबट्ठानें शाक्यांवर हलकेपणाचा हा पहिला आरोप केला.

१३ "पण, अंबट्ठा, शाक्यांनीं तुझा असा अपराध तरी काय केला?"

"गौतमा, एके समयीं मी माझा गुरु पोक्खरसाति ब्राह्मण याच्या कांहीं कामाकरितां कपिलवस्तु[1] नगरास गेलों होतों, तेव्हां शाक्यांच्या सभागृहांत[2] गेलों. त्यावेळीं तेथें पुष्कळ शाक्य व शाक्यकुमार उंच उंच आसनांवर एकमेकांस बोटांनीं गुदगुल्या[3] करीत हंसत खेळत बसले होते. आणि खरोखरच मला वाटतें माझा उपहास करण्याच्या बुद्धीनेंच कीं काय, एकानें सुद्धां मला आसनावर बसा म्हणून म्हटलें नाहीं. तेव्हां, गौतमा, शाक्य हलके असून ब्राह्मणांचा सत्कार करीत नाहीत, त्यांचा गौरव करीत नाहीत, त्यांस मान देत नाहीत, त्यांची पूजा करीत नाहीत, त्यांची संभावना करीत नाहीत, हें योग्य नाहीं, उचित नाहीं."

अशा रितीनें अंबट्ठानें शाक्यांवर हलकेपणाचा हा दुसरा आरोप केला.

१४ "लावी पक्षीण जरी क्षुद्र असली तरी ती सुद्धां आपल्या घरट्यांत आपल्या मनाजोगें बोलते. आणि, अंबट्ठा, कपिलवस्तु हें तर शाक्यांचें घरच आहे. एवढ्याशा गोष्टीनें चिडून जाणें तुला योग्य नाहीं."

---

१. रोहिणी नदीच्या कांठीं. गोतमबुद्धाचा बाप शुद्धोदन येथेंच होता. हें नगर इक्ष्वाकु राजाच्या वंशजांपैकीं एकानें अरण्यांत वसविलें व कपिलमुनीनें ती जागा त्यास दिली म्हणून कपिलवस्तु असें त्याचें नांव ठेविलें. विडूडभानें शाक्यांवर जेव्हां स्वारी केली तेव्हां या शहराचा विध्वंस झाला. पुढें अशोकराजानें त्यानजिक एक स्तूप उभारिला. 'Probably Pipráwá in the north of the Basti district. The Kapilavastu of Hieun Tsang is certainly represented by Tilaura Köt and neighbouring ruins. (Smith. Early History of India. P. 147, note 3). कपिलवस्तुनगराविषयीं संपूर्ण माहिती ERE vII. 659 येथें सांपडेल. २. संथागार. 'रज्जअनुसासनसाला' (बुद्धघोष). Buddhist India. P. 19 पहा. ३. अञ्ञमञ्ञं अंगुलिपतोदकेन संजग्घन्ता संकीळन्ता. 'अंगुलिसंघट्टनपाणिप्पहारदानादीनि करोन्ता' (बुद्धघोष). 'अंगुलिपतोदको नाम हासाधिप्पायो कायेन कायं आमसति' (पाचित्तिय ५२. पाराजिक ३·५·२२.). अंगुलीहि उपकच्छकादिघट्टनं' (कंखावितरणी.)

१५ "गौतमा, क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य व शूद्र असे चार वर्ण आहेत व यांतील तीन वर्ण म्हणजे क्षत्रिय, शूद्र व वैश्य हे ब्राह्मणांचे परिचारक होत. तेव्हां, गौतमा, शाक्य हलके असून ब्राह्मणांचा सत्कार करीत नाहीत, त्यांचा गौरव करीत नाहीत, त्यांस मान देत नाहीत, त्यांची पूजा करीत नाहीत, त्यांची संभावना करीत नाहीत, हें योग्य नाहीं, उचित नाहीं."

अशा रितीनें अंबट्ठानें शाक्यांवर हलकेपणाचा हा तिसरा आरोप केला.

१६ तेव्हां भगवंतांस वाटलें कीं हा अंबट्ठ शाक्यकुलावर फारच जोराचा आरोप करीत आहे, तर यालाच याचें गोत्र विचारावें. असा विचार करून भगवान् अंबट्ठास म्हणाले, "अंबट्ठा, तुझें गोत्र काय ?"

" मी कण्हायन आहें, गौतम."

" अंबट्ठा, तुझ्या मातापित्यांचें पुराणकालापासूनचें नांव व गोत्र पाहूं जाणाऱ्यास शाक्य हे धनी व तूं शाक्यांचा दासीपुत्र आहेस हें कळून येईल. शाक्य तर ओक्काकाला आपला पितामह समजतात. अंबट्ठा, पूर्वी ओक्काक राजानें जी राणी प्रिय व आवडती होती तिच्या पुत्रास राज्य देण्याच्या हेतूनें ज्येष्ठ पुत्रांस देशांतून हाकलून लाविलें. ते ज्येष्ठ पुत्र म्हणजे ओक्कामुख, करंडु, हत्थिनीक व सिनीसुर हे होत. देशांतून हाकलून लाविल्यावर ते हिमालयाच्या पायथ्याशीं एका पुष्करिणीच्या तीरीं शाकवृक्षांची एक मोठी राई होती, तेथें जाऊन राहिले. तेथें त्यांनीं कुलाची शुद्धता जाईल म्हणून आपल्या बहिणींशीं विवाह केले.

" इकडे राजानें सभेंतील मंत्री बोलावून आणून त्यांस कुमार कोठें आहेत म्हणून विचारलें. [ते म्हणाले,] "हिमालयाच्या पायथ्याशीं एका पुष्करिणीच्या तीरीं शाकवृक्षांची एक मोठी राई आहे, तेथें कुमार रहात आहेत. तेथें त्यांनीं कुलाची शुद्धता जाईल म्हणून आपल्या बहिणींशीं विवाह केले आहेत." तेव्हां ओक्काक राजानें आनंदानें पुढील

१. 'निम्मादेति.' निम्माने करोति (बुद्धघोष). २. या सूत्राच्या शेवटीं दिलेली टीप पहा. ३. उक्कामुख, करकण्ड, हत्थिनीय व सीनिपुर असेही पाठ आहेत. ४. या सूत्राच्या शेवटीं दिलेली टीप पहा.

उद्गार कांढले, 'कुमार खरोखरींच समर्थ, पूर्ण समर्थ आहेत.' तेव्हांपासून, अंबट्ठा, त्यांना शाक्य म्हणूं लागले, व तो त्यांचा मूळ पुरुष होय.

"ओक्काक राजाची दिसा नांवाची एक दासी होती. तिला कण्ह नांवाचा पुत्र झाला. जन्मल्याबरोबर तो म्हणाला, 'आई मला धू, न्हावयाला घाल, ह्या सगळ्या घाणीपासून मला मुक्त कर, म्हणजे मी तुझ्या उपयोगी पडेन.'

"ज्याप्रमाणें, अंबट्ठा, हल्लींचे लोक पिशाचास पिशाच म्हणून ओळखितात, तसें त्या वेळचे लोक पिशाचांना कण्ह म्हणून ओळखीत. ते असें म्हणूं लागले कीं, 'हा जन्मल्याबरोबर बोलूं लागला. हा कण्ह—पिशाच—जन्मास आला आहे.' तेव्हांपासून, अंबट्ठा, कण्हायन गोत्र उत्पन्न झालें, व तो त्यांचा मूळ पुरुष होय. अशा रितीनें, अंबट्ठा, तुझ्या मातापित्यांचें पुराणकालापासूनचें नांव व गोत्र पाहूं जाणाऱ्यास शाक्य हे धनी व तूं शाक्यांचा दासीपुत्र आहेस हें कळून येईल."

१७ असें भगवान् बोलल्यावर ते तरुण त्यांस म्हणाले, "गौतमा, अंबट्ठाला दासीपुत्र असें म्हणून त्याजवर भयंकर आरोप करूं नकोस. हा अंबट्ठ चांगल्या कुलांत उत्पन्न झालेला कुलपुत्र असून, बहुश्रुत, मधुर बोलणारा, पंडित आहे व या बाबतींत तुझ्याशीं बोलण्याची त्याला शक्ती आहे."

१८ तेव्हां भगवान् त्या तरुणांस म्हणाले, "हा अंबट्ठ वाईट कुलांत जन्मलेला आहे, कुलपुत्र नाहीं, शिकलेला नाहीं, मधुर बोलणारा नाहीं, मूर्ख आहे, व माझ्याशीं या बाबतींत बोलण्याची त्यास शक्ती नाहीं, असें तुम्हास वाटत असेल तर त्याला स्वस्थ बसूं द्या व तुम्हीं या बाबतींत माझ्याशीं वाद करण्यास या; परंतु जर तुम्हाला अंबट्ठ चांगल्या कुलांत उत्पन्न झालेला, कुलपुत्र, बहुश्रुत, मधुर बोलणारा व पंडित आहे, आणि माझ्याशीं या बाबतींत बोलण्याची त्याला शक्ती आहे असें वाटत असेल, तर तुम्हीं स्वस्थ बसा व अंबट्ठाला माझ्याशीं बोलूं द्या."

---

१. उदानं उदानेसि. २. सक्या (सक् = शकणें, समर्थ असणें) Rockhill. p. 12.

१९ " अंबट्ठ चांगल्या कुलांत जन्मलेला आहे, कुलपुत्र आहे, बहुश्रुत, मधुर बोलणारा व पंडित आहे, व या बाबतींत तुझ्याशीं वाद करण्यास समर्थ आहे. आम्ही स्वस्थ बसतों. अंबट्ठाला तुझ्याशीं बोलूं दे."

२० तेव्हां भगवान् अंबट्ठाला म्हणाले, " अंबट्ठा, हा मी तुला योग्य प्रश्न विचारितों, तुझी इच्छा नसली तरी तुला या प्रश्नाचें उत्तर दिलें पाहिजे. जर तूं उत्तर देणार नाहींस किंवा दुसरेंच कांहीं तरी बोलशील अथवा स्वस्थ बसशील अथवा येथून निघून जाशील, तर येथेंच तुझ्या डोक्याचे सात तुकडे होतील. तर तुला काय वाटतें, अंबट्ठा? वृद्ध व मोठे, ब्राह्मण आचार्य व त्यांचे आचार्य यांच्यापासून कण्हायन कोठून आले व त्यांचा मूळपुरुष कोण हें तूं ऐकिलें आहेस काय ? "

असें बोलल्यावर अंबट्ठ स्वस्थ राहिला.

दुसऱ्यांदा भगवान् अंबट्ठास म्हणाले, " तर तुला काय वाटतें, अंबट्ठा? वृद्ध व मोठे ब्राह्मण आचार्य व त्यांचे आचार्य यांच्यापासून कण्हायन कोठून आले, व त्यांचा मूळपुरुष कोण हें तूं ऐकिलें आहेस काय ? "

असें बोलल्यावर दुसऱ्यांदाही अंबट्ठ स्वस्थ राहिला. तेव्हां भगवान् अंबट्ठास म्हणाले, " सांग, अंबट्ठा, ही स्वस्थ रहाण्याची वेळ नव्हे. तथागतानें तीनदां योग्य प्रश्न विचारिल्यावर जो बोलणार नाहीं, त्याच्या डोक्याचे तेथेंच सात तुकडे होतील."

२१ त्यावेळीं वज्रपाणी यक्ष हातांत प्रदीप्त, प्रज्वलित, चकाकणारा असा एक मोठा लोखंडाचा सोटा घेऊन अंबट्ठाच्या वर आकाशांत उभा होता. एवढ्याचकरितां कीं, जर अंबट्ठ तथागतानें तीनदां विचारिलेल्या प्रश्नाचें उत्तर न देईल, तर तेथेंच त्याच्या डोक्याचे सात तुकडे करावे. तो वज्रपाणी यक्ष भगवान् व अंबट्ठ यांनाच फक्त दिसत होता.

---

१. मज्झिम ३५, अंगुत्तर ३·७४·३, सुत्तविभंग, पाराजिक १·१·२, निदानकथा ५४, जातक ५१३, ५१८, ५१९, ५३७, सुत्तनिपात ९८३, छांदोग्य० १·८·६·८; १·१०·९–११; १·११·४–९; बृहदारण्यक० १·३·२४; ३·६·१; ३·७·१; ३·९·२६ इत्यादि. २. शक्र देवराजा ( बुद्धघोष ).

तेव्हां अंबट्ठ त्याला पाहून भिऊन घाबरून गेला, त्याच्या उरांत धडकी भरली, व तो भगवंतांजवळ त्राण व रक्षण यांची याचना करून व त्यांस शरण जाऊन त्यांच्यापुढें नम्रपणें बसून म्हणाला, "गौतम, आपण काय म्हणालात? पुन्हां एकदां सांगा पाहूं."

"तर तुला काय वाटतें, अंबट्ठा? वृद्ध व मोठे ब्राह्मण आचार्य व त्यांचे आचार्य यांपासून कण्हायन कोठून आले व त्यांचा मूळपुरुष कोण हें तूं ऐकिलें आहेस काय?"

"होय, गौतम, आपण म्हणाला तसेंच मीं ऐकिलें आहे कीं, तेव्हांपासून कण्हायन गोत्र उत्पन्न झालें व तोच कण्हायनांचा मूळपुरुष होय."

२२ एवढें त्यानें म्हटल्यावर ते तरुण तारस्वरानें व मोठ्यानें म्हणाले, "अंबट्ठ हलक्या जातींत उत्पन्न झाला आहे, तो कुलपुत्र नाहीं, तो शाक्यांचा दासीपुत्र आहे, व शाक्य हे अंबट्ठाचे धनी आहेत. गौतम धर्मानें खरें बोलत असतां त्यांचा आम्ही अपमान करण्याचें मनांत आणिलें होतें."

२३ तेव्हां भगवंतांस वाटलें कीं, हे तरुण अंबट्ठाला दासीपुत्र म्हणून त्याजवर फारच जोराचा आरोप करीत आहेत, तर त्याला या आरोपांतून सोडवावें. असा विचार करून भगवान् त्या तरुणांस म्हणाले, "तरुणहो, अंबट्ठाला दासीपुत्र म्हणून त्याजवर जोराचा आरोप करूं नका. तो कण्ह मोठा ऋषि होता. दक्षिणजनपदास[1] जाऊन ब्रह्ममंत्रांचें[2] अध्ययन करून ओक्काक राजाजवळ जाऊन त्यानें त्याच्या मद्दरूपी[3] नांवाच्या कन्येस मागणी घातली. 'कोण रे हा दासीपुत्र असून माझ्या मद्दरूपी नांवाच्या मुलीस मागणी घालीत आहे?' असें ओक्काक राजा रागावून व चिडून जाऊन म्हणाला व त्यानें धनुष्यास बाण लाविला. पण त्याला तो बाण सोडतांही येईना व काढून घेतांही येईना. तेव्हां तरुण

१. गंगेच्या दक्षिणेकडील प्रदेश. यास दक्षिणापथ असेंही नांव आहे. तेथें एका तापसानें त्यास अंबट्ठ नांवाची विद्या शिकविली. तिच्या योगानें बाहुस्तंभन होऊन शस्त्र फेंकणारा मनुष्य निर्वीर्य होत असे. (बुद्धघोष). २. श्रेष्ठ मंत्र. वेदमंत्र (बुद्धघोष). ३. खुद्दरूपी असाही पाठ आहे.

अमात्य व सभासद कण्ह ऋषीजवळ जाऊन म्हणाले, "राजा सुखरूप असूं द्या. राजा सुखरूप असूं द्या."

"राजा सुखरूप राहील. पण जर राजानें खालीं बाण सोडला तर जेथपर्यंत त्याचें राज्य आहे तेथपर्यंत पृथ्वीचा नाश होईल."

"राजा व देश दोन्हीही सुखरूप असोत."

"राजा व देश दोन्हीही सुखरूप राहतील, पण जर राजानें वरती आकाशांत बाण सोडिला तर जेथपर्यंत त्याचें राज्य आहे तेथपर्यंत सात वर्षें पाऊस पडणार नाहीं."

"राजा व देश दोन्हीही सुखरूप असोत आणि पाऊसही पडो."

"राजा व देश दोन्हीही सुखरूप राहतील आणि पाऊसही पडेल. परंतु राजानें ज्येष्ठपुत्रावर बाण सोडावा. ज्येष्ठपुत्र सुखरूप राहील, निर्भय[1] राहील."

तेव्हां तरुण अमात्य ओक्काकास म्हणाले, "महाराजांनीं ज्येष्ठ-पुत्रावर बाण सोडावा. ज्येष्ठपुत्र सुखरूप राहील, निर्भय राहील." तेव्हां राजानें ज्येष्ठपुत्रावर बाण सोडला. ज्येष्ठपुत्र सुखरूप राहिला, निर्भय राहिला. तेव्हां ओक्काक राजा भिऊन ब्रह्मदंडानें घाबरून जाऊन त्याच्या उरांत धडकी भरून त्यानें आपली मद्दरूपी कन्या त्याला दिली. तेव्हां, तरुणांनो, तुम्ही अंबट्ठाला दासीपुत्र म्हणून त्याजवर जोराचा आरोप करूं नका. तो कण्ह मोठा ऋषी होता."

२४ नंतर भगवान अंबट्ठाला हाक मारून म्हणाले, "तर तुला काय वाटतें, अंबट्ठा? समज कीं एका क्षत्रियकुमाराचा ब्राह्मणकन्येशीं संवास घडला व त्यामुळें तिला पुत्र झाला. तर हा जो क्षत्रियकुमारापासून ब्राह्मणकन्येस झालेला पुत्र, त्याला ब्राह्मणांकडून उदक व आसन मिळेल काय?"

"होय, गौतम."

---

१. पल्लोमो भविस्सति. 'पन्नलोमो, लोमहंसनमत्तंऽपिऽस्स न भविस्सति' (बुद्धघोष).

"ब्राह्मण त्याला श्राद्धांत, स्थालीपाकांत[1], यज्ञांत किंवा पाहुणा म्हणून जेऊं घालतील काय?"

"होय, गौतम."

"ब्राह्मण त्याला मंत्र शिकवितील कीं नाहीं?"

"शिकवितील, गौतम."

"त्याला आपल्या स्त्रियांमध्यें वावरूं देतील कीं नाहीं?"

"देतील, गौतम."

"त्याला क्षत्रिय क्षत्रियाभिषेक करितील काय?"

"नाहीं, गौतम."

"तें कां?"

"आईच्या बाजूनें तो शुद्ध[2] नाहीं म्हणून, गौतम.'

२५ "तर तुला काय वाटतें, अंबट्ठा? समज कीं एका ब्राह्मणकुमाराचा क्षत्रियकन्येशीं संवास घडला व त्यामुळें तिला पुत्र झाला. तर हा जो ब्राह्मणकुमारापासून क्षत्रियकन्येस झालेला पुत्र, त्याला ब्राह्मणांकडून उदक व आसन मिळेल काय?"

"होय, गौतम."

"ब्राह्मण त्याला श्राद्धांत, स्थालीपाकांत, यज्ञांत किंवा पाहुणा म्हणून जेऊं घालतील काय?"

"होय, गौतम."

"ब्राह्मण त्याला मंत्र शिकवितील कीं नाहीं?"

"शिकवितील, गौतम."

"त्याला आपल्या स्त्रियांमध्यें वावरूं देतील कीं नाहीं?"

"देतील, गौतम."

---

१. A dish of rice or barley boiled in milk. गृह्याग्निमान पुरुषानें दर पर्वदिवशीं करावयाचें कर्म. यांत गृह्याग्नीवर स्थालीमध्यें चरूचा पाक करून (शिजवून) त्यानें होम करावयाचा असतो. आश्वलायनगृह्यसूत्र १·१०·१. 'सद्धेऽति मतके उद्दिस्स कतभत्ते, थालिपाकेऽति मंगलादिभत्ते' (बुद्धघोष). २. अनुपपन्नो. 'खत्तियभावं अप्पत्तो, अपरिसुद्धो' (बुद्धघोष).

" त्याला क्षत्रिय क्षत्रियाभिषेक करितील काय ? "

" नाहीं, गौतम. "

" तें का ?"

" बापाच्या बाजूनें तो शुद्ध नाहीं म्हणून, गौतम. "

२६ " याप्रमाणें, अंबट्ठा, स्त्रियांची स्त्रियांशीं अथवा पुरुषांची पुरुषांशीं तुलना केली तरी क्षत्रिय श्रेष्ठ ठरतात व ब्राह्मण हीन ठरतात. तर तुला काय वाटतें, अंबट्ठा ? ब्राह्मणांनीं एखाद्या ब्राह्मणाला कांहीं अपराधावरून त्याची हजामत करून व डोक्यावर राख घालून राष्ट्रांतून व नगरांतून हांकलून दिलें, तर त्याला ब्राह्मणांकडून उदक व आसन मिळेल काय ? "

" नाहीं, गौतम. "

" ब्राह्मण त्याला यज्ञांत, स्थालीपाकांत, यज्ञांत किंवा पाहुणा म्हणून जेऊं घालतील काय ? "

" नाहीं, गौतम. "

" ब्राह्मण त्याला मंत्र शिकवितील कीं नाहीं ? "

" नाहीं, गौतम. "

" त्याला आपल्या स्त्रियांमध्यें वावरूं देतील कीं नाहीं ? "

" नाहीं, गौतम. "

२७ "आतां तुला काय वाटतें, अंबट्ठा ? क्षत्रियांनीं एखाद्या क्षत्रियाला कांहीं अपराधावरून त्याची हजामत करून व डोक्यावर राख घालून राष्ट्रांतून व नगरांतून हांकलून दिलें, तर त्याला ब्राह्मणांकडून उदक व आसन मिळेल काय ? "

" मिळेल, गौतम. "

" ब्राह्मण त्याला यज्ञांत, स्थालीपाकांत, श्राद्धांत किंवा पाहुणा म्हणून जेऊं घालतील काय ?"

---

१. पकरणे. 'दोसे, ब्राह्मणानं अयुत्ते अकत्तब्बकरणे' (बुद्धघोष). २. 'अस्सपुटेन वधित्वा.' बुद्धघोष भस्सपुटेन असा पाठ घेतो. 'भस्सपुटेनाऽति भस्मपुटेन । सीसे छारिकं ओकिरित्वाऽति अत्थो.' अंगुत्तर ४.१९०, २४६ पहा.

" होय, गौतम."

" ब्राह्मण त्याला मंत्र शिकवितील कीं नाहीं?"

" शिकवितील, गौतम."

" त्याला आपल्या स्त्रियांमध्यें वावरूं देतील कीं नाहीं?"

" देतील, गौतम."

" तेव्हां, अंबट्ठा, क्षत्रियांनीं एखाद्या क्षत्रियाला कांहीं अपराधावरून त्याची हजामत करून व डोक्यावर राख घालून राष्ट्रांतून व नगरांतून हांकलून दिलें, म्हणजे तो क्षत्रिय अत्यंत हीन स्थितीस पोहोंचला असेंच म्हटलें पाहिजे. यावरून, अंबट्ठा, क्षत्रिय अत्यंत हीन स्थितीस पोहोंचला असला तरी क्षत्रियच श्रेष्ठ व ब्राह्मण हीन ठरतात.

२८ " सनत्कुमार ब्रह्मचानें देखील, अंबट्ठा, पुढील गाथा म्हटली आहे.

गोत्रावर भिस्त ठेवणाऱ्या लोकांमध्यें क्षत्रियच श्रेष्ठ होय.
[परंतु] विद्या व आचरण यांनीं संपन्न पुरुष देव व मनुष्य यांमध्यें श्रेष्ठ होय.

" अंबट्ठा, ही त्या सनत्कुमार ब्रह्मचानें म्हटलेली गाथा चांगली गाइली आहे, वाईट नव्हे, चांगली म्हटली आहे, वाईट नव्हे, अर्थयुक्त आहे, उगाच कांहीं तरी नाहीं, व मला ती पसंत आहे. म्हणून मीही म्हणतों कीं,

गोत्रावर भिस्त ठेवण्याऱ्या लोकांमध्यें क्षत्रियच श्रेष्ठ होय.
[परंतु] विद्या व आचरण यांनीं संपन्न पुरुष देव व मनुष्य यांमध्यें श्रेष्ठ होय."

पहिला भाग समाप्त.

---

१. या सूत्राच्या शेवटीं दिलेली टीप पहा. २. ये गोत्तपटिसारिनो. 'ये गोत्तं पटिसरन्ति अहं गोतमो अहं कस्सपोऽति' (बुद्धघोष). ३. 'जने तस्मिं'. पण बुद्धघोष त्याचा अर्थ जनितस्मिं (=प्रजाय) असा घेतो.

४. खत्तियो सेट्ठो जने तस्मिं ये गोत्तपटिसारिनो।
विज्जाचरणसंपन्नो सो सेट्ठो देवमानुसे।

१ " गौतमा, तें आचरण व ती विद्या कोणती ? "

" अंबट्ठा, श्रेष्ठ विद्या व आचरण यांमध्यें जातीचा, गोत्राचा, मानाचा अथवा तूं माझ्या बरोबरीचा आहेस, तूं माझ्या बरोबरीचा नाहींस अशाविषयींचा प्रश्नच येत नाहीं. जेथें मुलाचें अथवा मुलीचें लग्न[1] असतें तेथें हे प्रश्न उद्भवतात. जे जाती, गोत्र, मान, लग्नें या भानगडींत पडतात ते ही श्रेष्ठ विद्या व आचरण यांपासून दूरच राहतात. जेव्हां या भानगडी ते सोडून देतील, तेव्हांच त्यांस ही श्रेष्ठ विद्या व आचरण यांचा साक्षात्कार होईल. "

२ " पण, गौतम, तें आचरण व ती विद्या कोणती? "

" अंबट्ठा, अर्हत्, सम्यक्संबुद्ध [सामञ्ञफलसुत्त ४०-६३ प्रमाणें]. अशा रितीनें, अंबट्ठा, भिक्षु शीलसंपन्न होतो.

...[ ६४-८२ ]...चतुर्थध्यान संपादन करून घेऊन त्यांत विहार करितो. हें, अंबट्ठा, आचरण झालें.

...[ ८३-९८ ]...आतां यापुढें जन्मच नाहींत असें त्यास कळून येतें. ही, अंबट्ठा, विद्या झाली.

"अंबट्ठा, अशा भिक्षूस विद्यासंपन्न चरणसंपन्न, व विद्याचरणसंपन्न म्हणतात. आणि, अंबट्ठा, या विद्या व आचरण यांच्या संपत्तीहून वरची व अधिक चांगली अशी दुसरी विद्यासंपत्ती व आचरणसंपत्ती नाहीं.

३ " अंबट्ठा, या विद्याचरणसंपत्तीचीं चार विनाशमुखें[2] होतात. तीं कोणतीं ? एखादा श्रमण अथवा ब्राह्मण हीं श्रेष्ठ आचरण व विद्या प्राप्त करून न घेतां[3] झाडावरून पडलेलीं फळें खाऊन रहाण्याच्या उद्देशानें आपलें चंबूगबाळें[4] उचलून अरण्यांत जातो. पण तो खरोखर विद्याचरण-संपन्न पुरुषाचा सेवकच शोभतो. अंबट्ठा, या विद्याचरणसंपत्तीचें हें पाहिलें विनाशमुख होय.

---

१. आवाहो वा होति विवाहो वा होति आवाहविवाहो वा होति.　२. अपायमुखानि.
३. अनभिसंभुणमानो. ' असंपापुणन्तो, अविसहमानो वा ' ( बुद्धघोष ).　४. खारि-विधं आदाय. ' एत्थ खारी$\bar{}$ति अरणीकमंडलुसूचिचामरादयो ताव परिक्खारा, विधो$\bar{}$ति काजो, तस्मा खारीभरितकाजमादाया$\bar{}$ति अत्थो ' ( बुद्धघोष ).

"पुन्हां, अंबट्ठा, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण हीं श्रेष्ठ आचरण व विद्या प्राप्त करून न घेतां व झाडावरून पडलेलीं फळें खाऊन राहणेंही प्राप्त करून न घेतां कंदमूलफलें खाऊन राहण्याच्या उद्देशानें कुदळ व टोपली घेऊन अरण्यांत जातो. पण तो खरोखर विद्याचरणसंपन्न पुरुषाचा सेवकच शोभतो. अंबट्ठा, या विद्याचरणसंपत्तीचें हें दुसरें विनाशमुख होय.

"पुन्हां, अंबट्ठा, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण हीं श्रेष्ठ आचरण व विद्या प्राप्त करून न घेतां, झाडावरून पडलेलीं फळें खाऊन राहणेंही प्राप्त करून न घेतां व कंदमूलफलें खाऊन राहणेंही प्राप्त करून न घेतां गांव किंवा शहर यांच्याजवळ अग्निगृह करून त्यांत अग्नीची पूजा करीत राहतो. पण तो खरोखर विद्याचरणसंपन्न पुरुषाचा सेवकच शोभतो. अंबट्ठा, या विद्याचरणसंपत्तीचें हें तिसरें विनाशमुख होय.

"पुन्हां, अंबट्ठा, एखादा श्रमण अथवा ब्राह्मण हीं श्रेष्ठ विद्या व आचरण प्राप्त करून न घेतां, झाडावरून पडलेलीं फळें खाऊन राहणेंही प्राप्त करून न घेतां, कंदमूळफळें खाऊन राहणेंही प्राप्त करून न घेतां व अग्निपूजा करणेंही प्राप्त करून न घेतां एखाद्या चौकांत चार दारें असलेलें घर बांधून चारी दिशांपैकीं कोणत्याही दिशेहून श्रमण अथवा ब्राह्मण आला तर त्याची यथाशक्ति व यथाबल पूजा करावी म्हणून त्यांत राहतो. पण तो खरोखर विद्याचरणसंपन्न पुरुषाचा सेवकच शोभतो. अंबट्ठा, विद्याचरणसंपत्तीचें हें चवथें विनाशमुख होय.

"अंबट्ठा, या श्रेष्ठ विद्याचरणसंपत्तीचीं हीं चार विनाशमुखें होत.

४ "तर तुला काय वाटतें, अंबट्ठा? ही विद्याचरणसंपत्ती तूं व तुझा गुरु यांनीं प्राप्त करून घेतली आहे काय?"

"नाहीं, गौतम. मी व माझा गुरु कोणीकडे व ती श्रेष्ठ विद्या व आचरण कोणीकडे? या श्रेष्ठ विद्याचरणसंपत्तीपासून मी व माझा गुरु दूर आहोंत."

"तर तुला काय वाटतें, अंबट्ठा? ही विद्याचरणसंपत्ती प्राप्त करून

---

१. सन्दिस्सासि साचरियको.

न घेतां तूं आपल्या गुरूसह झाडावरून पडलेलीं फळें खाऊन रहाण्याच्या उद्देशानें आपलें चंबूगवाळें उचलून अरण्यांत जाऊन राहिला आहेस काय?"

" नाहीं, गौतम "

" तर तुला काय वाटतें, अंबट्ठा ? ही विद्याचरणसंपत्ती प्राप्त करून न घेतां व झाडावरून पडलेलीं फळें खाऊन राहणेंही प्राप्त करून न घेतां तूं आपल्या गुरूसह कन्दमूळफळें खाऊन रहाण्याच्या उद्देशानें कुदळ व टोपली घेऊन अरण्यांत जाऊन राहिला आहेस काय ? "

" नाहीं, गौतम. "

" तर तुला काय वाटतें, अंबट्ठा ? ही विद्याचरणसंपत्ती प्राप्त करून न घेतां, झाडावरून पडलेलीं फळें खाऊन राहणेंही प्राप्त करून न घेतां व कंदमूळफळें खाऊन राहणेंही प्राप्त करून न घेतां तूं आपल्या गुरूसह गांव किंवा शहर यांच्याजवळ अग्निगृह करून त्यांत अग्नीची पूजा करीत राहिला आहेस काय ?"

" नाहीं, गौतम. "

" तर तुला काय वाटतें, अंबट्ठा? ही विद्याचरणसंपत्ती प्राप्त करून न घेतां, झाडावरून पडलेलीं फळें खाऊन राहणेंही प्राप्त करून न घेतां, कंदमूळफळें खाऊन राहणेंही प्राप्त करून न घेतां आणि अग्निपूजाही प्राप्त करून न घेतां तूं आपल्या गुरूसह एखाद्या चौकांत चार दारें असलेलें घर बांधून चारी दिशांपैकीं कोणत्याही दिशेहून श्रमण अथवा ब्राह्मण आला तर त्याची यथाशक्ति व यथाबल पूजा करितां यावी म्हणून त्यांत राहिला आहेस काय ? "

" नाहीं, गौतम. "

५ "याप्रमाणें, अंबट्ठा, तूं व तुझा गुरु यांनीं ही विद्याचरणसंपत्ती प्राप्त करून घेतली नाहीं व विद्याचरणसंपत्तीचीं हीं जीं चार विनाशमुखें[1] तींही प्राप्त करून घेतलीं नाहींत आणि तुझ्या आचार्यानें स्वतः [ हीं विनाशमुखें देखील ] प्राप्त करून घेतलीं नसतांनां म्हटलें आहे कीं,

---

१. आपायिकोऽपि अपरिपूरमानो. 'अपाये विनासे नियुत्तो आपायिको ' ( टीका ).

' हे मुण्डित, क्षुद्र श्रमण, हलकट, काळे व ब्रह्मदेवाच्या पायापासून उत्पन्न झालेले कोणीकडे आणि त्रैविद्य ब्राह्मणांना झालेला साक्षात्कार कोणीकडे ? ' पहा, अंबट्ठा, हा तुझा आचार्य ब्राह्मण पोक्खरसाती याचा केवढा अपराध आहे तो ! "

६ " अंबट्ठा, पोक्खरसाती ब्राह्मणास कोसलदेशाच्या पसेनदी राजाकडून नेमणूक आहे. परंतु राजा त्याला आपल्या समोर देखील येऊं देत नाहीं. जेव्हां त्याच्याशीं बोलावयाचें असेल, तेव्हां पडद्याआडून बोलतो. अंबट्ठा, ज्याला राजा धार्मिक दान देतो, त्याला त्यानें आपल्या समोर सुद्धां येऊं देऊं नये ? पहा, अंबट्ठा, तुझा आचार्य ब्राह्मण पोक्खरसाती याचा केवढा अपराध आहे तो ![1]

७ " तर तुला काय वाटतें, अंबट्ठा ? कोसलदेशाच्या पसेनदी राजानें हत्तीच्या मानेवर अथवा घोड्याच्या पाठीवर अथवा रथामध्यें उभें राहून मोठमोठ्या अमात्यांशीं अथवा राजकुमारांशीं कांहीं खलबत करावें. नंतर तो तेथून निघून जाऊन एका बाजूस उभा राहिल्यावर एखादा शूद्र अथवा त्याचा दास यानें तेथें यावें व तेंच खलबत करावें कीं ' असें कोसलदेशाचा पसेनदी राजा बोलला. ' तर तो राजानें सांगितल्याप्रमाणें बोलला अथवा त्यानें राजासारखेंच खलबत केलें, एवढ्यावरून तो राजा किंवा अमात्य होईल काय ? "

" नाहीं, गोतम. "

८ " त्याप्रमाणें जे ब्राह्मणांचे पूर्वींचे ऋषी, मंत्रकर्ते व प्रवर्ते—ज्यांनीं गाइलेले, रचिलेले व ग्रथिलेले जुने मंत्र ब्राह्मण हल्लीं गातात, म्हणतात व जसे पूर्वी म्हटले गेले होते त्याप्रमाणें गातात व म्हणतात-ते ऋषी म्हणजे

१ बुद्धघोषानें याचीं दोन विलक्षण कारणें दिलीं आहेत. पोक्खरसातीस आवट्टनी नांवाची विद्या येत होती तिच्या योगानें तो राजाच्या मनावर ताबा बसवून त्यास रत्नें द्यावयास लावी. पुढें राजास हें कळून आलें म्हणजे तो अमात्यांस ' मीं त्यास रत्नें कशी दिलीं ' म्हणून विचारी. ते त्यास सांगत कीं, ' आपल्या समोर असतां तो आवट्टनी विद्येचा उपयोग करितो. ' म्हणून राजा त्याच्याशीं पडद्याआडून बोले. दुसरें कारण असें कीं, कांहीं अमात्यांनीं मत्सरानें राजास सांगितलें कीं, ' या ब्राह्मणाच्या अंगावर कोड उठलें आहे. तेव्हां आपण त्यास जवळ येऊं देऊं नये. '

अष्टक, वामक, वामदेव, विश्वामित्र, जमदग्नी, अंगीरस, भारद्वाज, वसिष्ठ, काश्यप व भृगु—त्यांचे मंत्र मी व माझा गुरु शिकलों आहों असें जरी तुला म्हणतां आलें तरी तूं ऋषी झालास अथवा त्या पदवीला पोहोंचलास असें केव्हांही होणार नाहीं.

९ "तर तुला काय वाटतें, अंबट्ठा? तूं वृद्ध व मोठे ब्राह्मण आचार्य व त्यांचे आचार्य यांजकडून काय ऐकिलें आहेस? जसा तूं व तुझा गुरु हल्लीं वागतां तसेच ते स्नान करून, अंगाला चंदन लावून, केस व दाढी कापून, मोत्यांच्या माळा घालून, पांढरीं वस्त्रें नेसून, पंचेन्द्रियांच्या सुखांचा यथेच्छ अनुभव घेत असत काय?"

"नाहीं, गौतम."

"तूं व तुझा गुरु यांप्रमाणें, ज्यांतून काळे खडे काढून टाकिले आहेत व ज्यांत पुष्कळ आमट्या व चटण्या आहेत असा साळीचा भात खात असत काय?"

"नाहीं, गौतम."

"तूं व तुझा गुरु यांप्रमाणें वेष्टनांनीं ज्यांची कंबर खचली आहे अशा स्त्रियांशीं क्रीडा करीत असत काय?"

"नाहीं, गौतम."

"तूं व तुझा गुरु यांप्रमाणें केस कापलेल्या घोड्यांच्या रथांतून चाबूक व काठ्या यांनीं त्यांस चोपीत हिंडत असत काय?"

"नाहीं, गौतम."

"तूं व तुझा गुरु यांप्रमाणें खंदक खणलेल्या, अडसर लाविलेल्या, सभोंवताली तट असलेल्या नगरांत लांब तलवारी कमरेस लटकाविलेल्या पुरुषांकडून आपलें रक्षण करवीत असत काय?"

"नाहीं, गौतम."

---

१. पाली 'अट्ठक, वामक, वामदेव, वेस्सामित्त, यमतग्गी, अंगीरस, भारद्वाज, वासेट्ठ, कस्सप व भगु.' ( महावग्ग ६.३५.२. ) यांतील अष्टक व वामक यांखेरीज बाकीचे ऋषी प्रसिद्धच आहेत. त्यांपैकीं अष्टक हा ऋग्वेद् १०.१०४ येथील ऋषी असावा. वामक हा ऋग्वेद् १०.९९ येथील वम्र आहे कीं काय? ( Rhys Davids ).

२. नगरूपकारिकासूऽति एत्थ उपकारिकाऽति परेसं आरोहणनिवारणत्थं समन्ता नगरपाकारस्स अधोभागे कतसुधाकम्मं वुच्चति। इध पन ताहि उपकारिकाहि युत्तानि नगरानेव नगरूपकारियोऽति अधिप्पेता ( बुद्धघोष ).

१० " याप्रमाणें तूं व तुझा गुरु ऋषींही नाहीं व त्यांच्या पदवीलाही पोहोंचलां नाहीं. परंतु, अंबट्ठा, जर तुला कांहीं शंका अथवा घोटाळा असेल तर मला विचार, मी त्याचें उत्तर देऊन तुझें समाधान करीनं."

११ असें म्हणून भगवान् विहारांतून उठून चंक्रमावर[2] फिरण्यास गेले. अंबट्ठानेंही तसेंच केलें. भगवंतांच्या मागोमाग जात असतां अंबट्ठानें त्यांच्या शरीरावर महापुरुषाचीं बत्तीस लक्षणें पाहिलीं. त्यांतील दोन खेरीज करून बाकीचीं सर्व त्यास दिसलीं. त्या दोहोंसंबंधीं—म्हणजे कोशानें झाकलेलें शिश्न व लांब जिव्हा यांविषयीं—अंबट्ठास शंका आली, त्याचें समाधान झालें नाहीं, खात्री पटली नाहीं.

१२ तेव्हां भगवंतास वाटलें कीं हा अंबट्ठ माझ्या शरीरावरील महापुरुषाचीं बत्तीस लक्षणें पहात आहे. त्यांतील दोन खेरीज करून बाकीचीं सर्व त्यास दिसत आहेत. त्या दोहोंसंबंधा—म्हणजे कोशानें झाकलेलें शिश्न व लांब जिव्हा यांविषयीं—त्यास शंका आली आहे, त्याचें समाधान होत नाहीं, खात्री पटत नाहीं. मग भगवंतांनीं अशा रितीनें आपल्या ऋद्धीचा उपयोग केला कीं अंबट्ठास भगवंतांचें कोशानें झाकलेलें शिश्न दिसलें.[3] नंतर भगवंतांनीं जीभ बाहेर काढून ती दोन्ही कानांच्या पाळ्यांस व नाकपुड्यांस इकडून तिकडे लाविली व सर्व कपाळ तिनें झांकून टाकिलें. तेव्हां भगवान् खरोखर सर्व बत्तीस लक्षणांनीं संपन्न आहेत असें अंबट्ठास कळून येऊन तो म्हणाला, " गौतम, जातों आतां मी. मला पुष्कळ कामें आहेत."

"जशी, अबट्ठा, तुझी मर्जी."

१. यस्स खो पन अंबट्ठ मयि कंखा वा विमति वा सो मं पञ्हेन, अहं वेय्याकरणेन सोभिस्सामि. २. चालण्याची जागा. बौद्धभिक्षु विहारामध्यें एकाग्रतेनें इकडून तिकडे फिरण्यासाठीं जी जागा तयार करितात तिला चंक्रम असें म्हणतात. ३. भगवंतांस शिश्न दाखवितांना लज्जा कशी वाटली नाहीं ? यावर बुद्धघोषानें मिलिंद राजास नागसेनाकडून मिळालेलेंच उत्तर दिलें आहे कीं, ' भगवंतांनीं आपलें शिश्न दाखविलें नाहीं, तर नुसती छाया ( म्हणजे प्रतिबिंब ) दाखविली. ' मज्झिम ९२, सुत्तनिपात, सेलसुत्त ( ३३ ) व मिलिंदपञ्हो ४·३·११ पहा.

तेव्हां अंबट्ठ घोड्यांच्या रथांत बसून निघून गेला.

१३ त्यावेळीं पोक्खरसाती ब्राह्मण उक्कट्ठेंतून निघून पुष्कळ ब्राह्मणांच्या समुदायासहित आपल्या आरामांत अंबट्ठाची वाट पहात बसला होता. इकडे अंबट्ठ आरामाकडे जाण्यास निघाला. जेथपर्यंत रथ जाणें शक्य होतें तेथपर्यंत रथांतून जाऊन नंतर पायींच तो पोक्खरसातीजवळ गेला व त्यास नमस्कार करून एके बाजूस बसला. तो बसल्यानंतर त्याला पोक्खरसाती म्हणाला,

१४ "काय, अंबट्ठा, भगवान् गौतमाचें दर्शन झालें का?"

"होय."

"काय, अंबट्ठा, भगवान् गौतम तसाच असून त्याची कीर्ति पसरली आहे का? भगवान् गौतम तसाच आहे कीं नाहीं?"

"होय, भगवान् गौतम तसाच असून त्याची कीर्ति पसरली आहे. भगवान् गौतम तसाच आहे, त्याहून निराळा नाहीं. भगवान् गौतम सर्व बत्तीस लक्षणांनीं संपन्न आहे. त्यांमध्यें एकही कमी नाहीं."

"पण, अंबट्ठा, तुझें श्रमण गौतमाशीं कांहीं बोलणें झालें काय?"

"होय."

"तें कसें काय झालें?"

तेव्हां अंबट्ठानें भगवंतांशीं झालेलें सर्व भाषण पोक्खरसाती ब्राह्मणास सांगितलें.

१५ नंतर पोक्खरसाती ब्राह्मण अंबट्ठास म्हणाला, "अरे वारे आमचा पण्डित! वारे आमचा विद्वान्! वारे आमचा तिन्ही विद्यांत प्रवीण! अशा तऱ्हेचें काम करणारा मनुष्य मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर अपायास, दुर्गतीस, नरकास जातो. अंबट्ठा, तूं भगवान् गौतमास इतकें टाकून[1] बोललास, त्यामुळेंच तो माझा एवढा पाणउतारा[2] करीत

---

१. आसज्ज आसज्ज. 'घट्टेत्वा घट्टेत्वा' (बुद्धघोष). २. उपनीय उपनीय 'पटिच्छन्नं कारणं आविकरित्वा, सुद्ध दासादिभावं आरोपेत्वा. (बुद्धघोष).

बोलला. वारे आमचा पण्डित! वारे आमचा विद्वान्! वारे आमचा तिन्ही विद्यांत प्रवीण! अशा तऱ्हेचें......जातो." असें म्हणून, रागावून संतापून त्यानें अंबट्ठाला पायानें ढकलून दिलें व ताबडतोब भगवंतांस भेटण्यास जाण्याची त्यास इच्छा झाली.

१६ तेव्हां इतर ब्राह्मण पोक्खरसातीला म्हणाले, "आतां श्रमण गौतमास भेटण्यास जाण्यास फार उशीर झाला. तेव्हां आपण उद्यां त्याच्या दर्शनास जावें."

"बरें आहे," असें म्हणून पोक्खरसाती ब्राह्मण आपल्या घरीं उत्तम उत्तम पक्वान्नें तयार करवून, तीं रथांत चढवून, मशालीच्या उजेडांत उक्कट्ठेस जाण्यास निघाला व इच्छानंगलाकडे जाण्यास वळला. जेथपर्यंत रथ जाणें शक्य होतें तेथपर्यंत रथांत जाऊन नंतर पायींच तो भगवंतांकडे गेला, व त्यांस नमस्कार करून एके बाजूस बसून म्हणाला,

१७ "गौतमा, माझा शिष्य अंबट्ठ येथें आला होता काय?"

"होय, ब्राह्मणा."

"गौतमा, त्याचें तुझ्याशीं बोलणें झालें काय?"

"होय, ब्राह्मणा."

"तें कसें, गौतम?"

तेव्हां भगवंतांनीं अंबट्ठाशीं झालेलें सर्व भाषण पोक्खरसाती ब्राह्मणास सांगितलें. एवढें बोलल्यावर पोक्खरसाती भगवंतांस म्हणाला, "गौतमा, अंबट्ठ मूर्ख आहे, त्याच्या त्या मूर्खपणाबद्दल आपण क्षमा करावी!"

"अंबट्ठ सुखी राहो, ब्राह्मणा."

१८ नंतर पोक्खरसाती ब्राह्मणानें भगवंतांच्या अंगावर बत्तीस महापुरुषलक्षणें पाहिलीं. त्यांतील दोन खेरीज करून बाकीचीं सर्व त्यास दिसलीं. त्या दोहोंविषयीं—म्हणजे कोशानें झांकलेलें शिश्न व लांब जिव्हा यांविषयीं—त्यास शंका आली, त्याचें समाधान झालें नाहीं.

१९ तेव्हां भगवंतांस वाटलें कीं हा पोक्खरसाती ब्राह्मण माझ्या शरीरावरील बत्तीस लक्षणें पहात आहे. दोन खेरीज करून बाकीचीं

सर्व त्यास दिसत आहेत. त्या दोहोंविषयीं—म्हणजे कोशानें झांकलेलें शिश्न व लांब जिव्हा यांविषयीं—त्यास शंका आली आहे, त्याचें समाधान होत नाहीं, खात्री पटत नाहीं. मग भगवंतांनीं अशा रितीनें आपल्या ऋद्धीचा उपयोग केला कीं पोक्खरसाती ब्राह्मणास भगवंतांचें कोशानें झांकलेलें शिश्न दिसलें. नंतर भगवंतांनीं जीभ बाहेर काढून ती दोन्ही कानांच्या पाळ्यांस व नाकपुड्यांस इकडून तिकडे लाविली व सर्व कपाळ तिनें झांकून टाकिलें. तेव्हां भगवान् गौतम खरोखरीच बत्तीस लक्षणांनीं संपन्न आहे, त्यामध्यें एकही कमी नाहीं. असें पोक्खरसाती ब्राह्मणास कळून येऊन तो भगवंतांस म्हणाला,

"भगवान् गौतमानें आज भिक्षुसंघासह माझ्या येथें भोजनास यावें."

भगवंतांनीं स्तब्ध राहून आपली संमती दर्शविली.

२० तेव्हां भगवंतांची संमती आहे हें जाणून पोक्खरसाती ब्राह्मणानें त्यांस वेळ कळविली कीं, 'गौतम, वेळ झाली, जेवण तयार आहे.' नंतर भगवान् सकाळींच वस्त्रपरिधान करून पात्र व चीवर घेऊन भिक्षुसंघासहित पोक्खरसाती ब्राह्मणाच्या घरीं गेले व त्यांच्याकरितां घातलेल्या आसनावर बसले. नंतर पोक्खरसाती ब्राह्मणानें भगवंतांस आपल्या हातानें उत्तम उत्तम खाद्यभोज्य पदार्थ आग्रह करकरून[1] वाढले व तरुण ब्राह्मणांनीं भिक्षुसंघास वाढले. भगवंतांचें जेवण होऊन त्यांनीं हात धुतल्यावर[2] पोक्खरसाती ब्राह्मण एके बाजूस लहानशा आसनावर बसला.

२१ अशा रितीनें बसलेल्या पोक्खरसाती ब्राह्मणाला भगवंतांनीं

---

१. सन्तप्पेसि संपवारेसि. 'संपवारेसीऽति सुट्ठु पवारेसि, अलं अलंऽति हत्थसञ्ञाय पटिक्खिपापेसि (बुद्धघोष). २. ओनीतपत्तपाणिं. 'पत्ततो ओनीतपाणिं, अपनीतहत्थंऽति वुत्तं होति । ओनित्तपत्तपाणिंऽतिऽपि पाठो । तस्सत्थो—ओनित्तं नानाभूतं विनाभूतं पत्तं पाणितो अस्साऽति । हत्थे च पत्तं च धोवित्वा एकमन्ते पत्तं निक्खिपित्वा निसिन्नं' (बुद्धघोष). यावर Oldenberg (S. B. E. xiii, 83) यांचें असें म्हणणें आहे कीं, ओनीत (सं० अवनीत,) याचा अपनीत असा अर्थ होणें अशक्य आहे. The end of a dinner was marked not by the Bhikkhu's removing his hand from the bowl, but by washing the bowl and hands. अवनी is to pour (water upon) something. 'भुत्तवन्तं विदित्वा धौतहस्तं अपनीतपात्रं.' (दिव्यावदान २, ७).

ओळीनें पुढील गोष्टी सांगितल्या. त्या येणेंप्रमाणें—दान, शील, स्वर्ग यांच्याविषयीं कथा, कामांमधील भय, तुच्छता, व संक्लेश व नैष्काम्यांतील फायदाही सांगितला.[1] जेव्हां भगवंतांनीं जाणिलें कीं पोक्खरसाती ब्राह्मणाचें चित्त तयार झालें आहे, मृदु झालें आहे, त्यावरील पडदा दूर सरला आहे व तो आनंदित व प्रसन्न झाला आहे, तेव्हां बुद्धांचा श्रेष्ठ[2] उपदशे—दुःख, त्याचें कारण, त्याचा विनाश, व त्याच्या विनाशाचा मार्ग—त्यांनीं त्यास सांगितला. ज्यावर एकही काळा डाग नाहीं अशा वस्त्रावर ज्याप्रमाणें ताबडतोब रंग बसूं शकतो, त्याप्रमाणें पोक्खरसाती ब्राह्मणाला त्याच आसनावर शुद्ध, मलविरहित अशा धर्मचक्षूचा लाभ झाला, व जें जें उत्पन्न झालें आहे त्याला त्याला विनाश आहे हें त्याला कळलें.

२२ तेव्हां पोक्खरसाती ब्राह्मणास धर्म दिसला, मिळाला, कळला, पूर्ण समजला, सर्व शंका नाहींशी झाली, घोंटाळा नाहींसा झाला, पूर्ण समजूत पटली, व दुसऱ्या कोणावरही विश्वास ठेवण्याची जरूर राहिली नाहीं.[3] तो भगवंतांस म्हणाला, "वाहवा, गौतम, वाहवा! ज्याप्रमाणें, गौतम, एखाद्यानें उपडें झालेलें सुलटें ठेवावें, अथवा झांकलेलें उघडें करावें, अथवा वाट चुकलेल्यास मार्ग सांगावा, अथवा डोळस मनुष्यांना वस्तू दिसाव्या म्हणून अंधारांत तेलाचा दिवा दाखवावा, त्याप्रमाणें आपण अनेक तऱ्हांनीं धर्माचा उपदेश केलेला आहे. तर मी पुत्र, भार्या, परिजन व मित्र यांसहित आपणांस, धर्मास व भिक्षुसंघास

---

१. 'नेक्खम्म.' Burnouf ( Lotus 334 ) नैष्कर्म्य. Childers (Dictionary) नैष्क्रम्य. परंतु नैष्काम्य हाच अर्थ खरा होय, कारण मज्झिम १९, अंगुत्तर ३·१३·२ वगैरे ठिकाणीं तो कामवितर्काच्या उलट म्हणून दिला आहे. २. सामुक्कंसिका 'अत्तना येव उद्धरित्वा गहिता सयंभूञाणेन दिट्ठा असाधारणा अञ्ञेसं' ( बुद्धघोष ). परंतु सामुत्कार्षिका ( उत्कृष्ट, इतर उपदेशाहून कांहीं तरी विशेष ) असाच अर्थ अधिक सयुक्तिक दिसतो. दिव्यावदान ३३ (पृ० ६१७ ) पहा. ३. अपरप्पच्चयो सत्थुसासने. 'नास्स परो पच्चयो, न परस्स सद्धाय एत्थ वत्तत्तीऽति' ( बुद्धघोष ). 'अत्तना पच्चक्खेता दिट्ठत्ता अधिगतत्ता न परं पच्चेति' ( टीका ).

शरण आलों आहे. शरण आलेल्या मला आजपासून मरेपर्यंत आपण उपासक म्हणून समजावें. ज्याप्रमाणें आपण उक्कट्ठेमध्यें दुसऱ्या उपासकांच्या कुलांत जातां त्याप्रमाणें पोक्खरसातीच्याही कुलांत यावें. तेथें जे तरुण व तरुणी असतील ते भगवंतांना नमस्कार करतील, उठून आदरसत्कार करतील, आसन व उदक देतील व चित्तास आनंद देतील-तें चिरकाल त्यांच्या हितास व सुखास कारण होईल."

"ठीक बोललास, ब्राह्मणा!"

**अंबट्ठसुत्त समाप्त.**

---

## परिशिष्ट.

प्रस्तुत सूत्राचा विषय जातिभेद हा आहे. अंबट्ठाला आपल्या ब्राह्मणजाती-विषयीं फार गर्व झाला होता. इतर जाती म्हणजे तुच्छ, त्यांनीं ब्राह्मणांचा नेहमीं मान ठेविला पाहिजे अशी त्याची समजूत होती. त्यामुळें चढून जाऊन त्यानें बुद्धाशीं कोणीही सभ्य मनुष्य करणार नाहीं असें अपमानकारक वर्तन केलें व शाक्यकुलास उघड उघड शिव्या दिल्या. त्याचा स्वतःच्या श्रेष्ठत्वा-विषयींचा गर्व घालविण्याच्या उद्देशानें भगवंतांनीं मागील इतिहास सांगून त्याच्याच कुलाचा हीनपणा दाखवून दिला, व त्यानंतर दासीपुत्र ठरल्यामुळें खट्टू झालेल्या अंबट्ठाचें समाधान करण्याकरितां त्याच्या कुलाचा मूळ पुरुष कण्ह ऋषी हा किती पराक्रमी होता व ओक्काक राजालाही त्यानें कसें खालीं पहावयास लाविलें तीही कथा सांगितली. या एकंदर कथेंत ऐतिहासिक सत्य किती आहे हें सांगणें फार कठीण आहे. परंतु एवढें खरें कीं ओक्काक ( अथवा इक्ष्वाकु ) राजा हा शाक्यकुलाचा मूळपुरुष होता अशी बौद्धांची त्यावेळींही समजूत होती ( सुत्तनिपात ९९१, अपदान इत्यादि पहा ).

यापुढें भगवंतांनीं अंबट्ठाला असें सिद्ध करून दिलें कीं ब्राह्मण व क्षत्रिय यांपासून मिश्रजातीचा मुलगा झाला तर ब्राह्मण त्याला कमी समजत नाहींत परंतु क्षत्रिय मात्र त्याला शुद्ध मानीत नाहींत. याहूनही विशेष म्हणजे ब्राह्मण अपराधी ब्राह्मणाला आपणामध्यें वावरूं देत नाहींत, पण अपराधी क्षत्रियास मात्र घेण्यास त्यांस कांहींही हरकत वाटत नाहीं. यावरून क्षत्रिय ब्राह्मणांपेक्षां अधिक शुद्ध व श्रेष्ठ आहेत असेंच ठरतें. हा बुद्धकालीन वस्तुस्थितीचा एक मासला झाला. दुसरी गोष्ट अशी कीं, अंबट्ठाचा गुरु पोक्खरसाति यासारखे कांहीं धनाढ्य ब्राह्मण आपलें कर्तव्य जें अध्ययन व अध्यापन तें न करितां व आपलें आचरणही शुद्ध न ठेवितां—निदान झाडावरून पडलेलीं फळें खाऊन रहाणें, कंदमूलफलें खाऊन रहाणें, अग्निपूजा करणें किंवा श्रमणब्राह्मणांची पूजा करणें यांपैकीं कांहींही न करितां—निव्वळ चैनींत काळ घालवीत असत. तेव्हां असे ब्राह्मण विद्याचरणसंपन्न क्षत्रियापेक्षां श्रेष्ठ कसे ठरणार ?

या ठिकाणीं भगवान् बुद्धाचे वर्णव्यवस्थेविषयीं काय विचार होते याचा खुलासा करणें जरूर आहे. भगवंतांचें मुख्य काम जगतांतील प्राणिमात्रास दुःखांतून सोडवून त्यांस निर्वाणप्राप्ति सुकर करून देणें हें होतें, व त्यास अनु-सरूनच त्यांचे विचार, उच्चार व आचार होते. या निर्वाणप्राप्तीच्या मार्गाचा

अवलंब करण्यास अर्थात् कोणासच प्रतिबंध नव्हता. ब्राह्मणधर्मामध्यें स्त्रिया व शूद्र यांस वेदपठनाची बंदी होती. त्यांनीं पाहिजे तर पुराणश्रवणानें आपली उन्नती करून घ्यावी. असा भेदभाव भगवंतांस पसंत नव्हता. त्यांचें अंतःकरण दयेनें भरलें होतें. त्यांच्या मतें निर्वाणप्राप्तीचे दरवाजे सर्वांना सारखेच मोकळे होते. त्यांच्या संघामध्यें प्रवेश करण्यास कोणासच अटकाव नव्हता. अनेक ब्राह्मण व क्षत्रिय जसे त्यांच्या संघांत होते, तसेंच उपाली नांवाचा न्हावी, सुनीत नांवाचा झाडूवाला इत्यादि हीनवर्णाचे लोकही होते. सोपाक हा तर चांडाल होता, स्वाती हा कोळी होता, नंद गुराखी होता. विमला, अंबपाली, पूर्णा, चापा इत्यादी भिक्षुणीही खालच्या जातींतूनच आलेल्या होत्या. संघांत आल्यावर सर्वच सारख्या दर्जाचे होत, त्यांच्यांत कांहींही भेद केला जात नसे. भगवान म्हणतात, " भिक्षूहो, ज्याप्रमाणें गंगा, यमुना, अचिरवती, सरभू, मही इत्यादी मोठमोठ्या नद्या समुद्राप्रत जाऊन पोहोंचल्यावर त्यांचें नांवगांव सर्व नाहींसें होऊन केवळ महासागर असें नांव त्यांस प्राप्त होतें, त्याप्रमाणें क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य व शूद्र या चारी वर्णांतील लोक जेव्हां घरदार सोडून देऊन भगवंतांनीं उपदेशिलेल्या धर्मविनयामध्यें प्रविष्ट होतात, तेव्हां त्यांचें जुनें नांवगांव नाहींसें होऊन केवळ ' शाक्यपुत्रीय श्रमण ' एवढेंच नांव त्यांस प्राप्त होतें. "

' बुद्धाच्या अंतःकरणांत ब्राह्मणांविषयीं तीव्र द्वेष वसत होता ' असें एक विधान करण्यांत येतें. तें कितपत खरें आहे याचा विचार करणें जरूर आहे. ब्राह्मणजात तेवढी वाईट असें बुद्धांनीं केव्हांही म्हटलें नाहीं. उलट ब्राह्मण या संज्ञेविषयीं त्यांस अत्यंत आदर वाटत होता, हें धम्मपद ( ब्राह्मणवग्ग ), सुत्त-निपात ( वासेट्ठसुत्त ) इत्यादि ग्रंथांवरून उघडउघड दिसून येतें. तेथें अर्हत्पदा-प्रत पोंचलेल्या श्रेष्ठ पुरुषास ब्राह्मण म्हणावें असें प्रतिपादन केलें आहे. परंतु केवळ जातीनें ब्राह्मण होत नाहीं, तर कर्मानें, आचरणानें होतो अशी त्यांची प्रामाणिक समजूत होती. त्यांचा कटाक्ष ब्राह्मणजातीवर नव्हता. पण जे केवळ नांवाचे ब्राह्मण होते, ज्यांच्या अंगीं खऱ्या ब्राह्मण्याचा लवलेशही नव्हता, अशा ब्राह्मणांविषयीं मात्र त्यांस तिटकारा होता.

ब्राह्मणांचें म्हणणें असें होतें कीं, ' ब्राह्मणच श्रेष्ठ वर्ण, दुसरे वर्ण हीन होत. ब्राह्मणच शुक्ल वर्ण, दुसरे वर्ण कृष्ण होत. ब्राह्मणांनाच शुद्धी मिळते, अब्राह्म-णांना नाहीं. ब्राह्मणच ब्रह्मदेवाच्या मुखापासून झालेले त्याचे औरस पुत्र होत. ते ब्रह्म्यापासून उत्पन्न झालेले, ब्रह्म्यानें निर्माण केले असल्याकारणानें त्याचे

दायाद होत.' हें म्हणणें खोडून काढण्याकरितां भगवान बुद्धांनीं जीं प्रमाणें पुढें आणिलीं आहेत त्यांवरून त्यांचे विचार या बाबतींत किती पुढे गेले होते याची चांगली कल्पना होईल, म्हणून त्यांतील कांहीं पुढे देतों.

१ वनस्पती, किडे, चतुष्पाद, सर्प, मत्स्य, पक्षी यांमध्यें ज्याप्रमाणें निरनिराळ्या जाती दृष्टीस पडतात, तसें मनुष्यांचें नाहीं. केस, डोकें, कान, नाक, तोंड, डोळे इत्यादि अवयव सर्व मनुष्यांत सारखेच आहेत. त्यांच्यामध्यें जाती अशा मुळींच नाहींत. उच्च व नीच या केवळ व्यवहारांतील बोलण्याच्या तऱ्हा होत ( मज्झिम ९८ = सुत्तनिपात, वासेट्ठसुत्त ). ज्याप्रमाणें घोडी व गाढव यांच्या संयोगापासून खेचर अशी तिसरीच जात उत्पन्न होते, तसें मनुष्यांमध्यें होत नाहीं. ब्राह्मण पिता व क्षत्रिय माता अथवा क्षत्रिय पिता व ब्राह्मण माता यांच्या संयोगामुळें उत्पन्न झालेल्या संततीस ब्राह्मणही म्हणतां येईल, किंवा क्षत्रियही म्हणतां येईल. अर्थात् ती संतती मनुष्यप्राणीच असणार (मज्झिम ९३).

२ ब्राह्मणांच्या बायका ऋतुमती होतात, गरोदर होतात, प्रसूत होतात, आणि मुलांना पाजतात. यावरून हें उघड आहे कीं ब्राह्मण हे इतर लोकांप्रमाणेंच योनिज आहेत. ते ब्रह्म्याच्या मुखापासून उत्पन्न झालेले नव्हत. ( मज्झिम ९३ . दीघ २७ ).

३ शारीरिक शुद्धताशुद्धतेविषयीं पाहिलें तर असें दिसून येईल कीं ब्राह्मण व शूद्र नदींत स्नान केलें असतां सारखेच स्वच्छ व शुद्ध होऊं शकतील (मज्झिम ९३,९६ ). त्याचप्रमाणें एखाद्या क्षत्रियानें अथवा ब्राह्मणानें चंदनाचे तुकडे एकमेकांवर घासून उत्पन्न केलेला अग्नी व एखाद्या चांडाळानें एरंडाच्या काठ्या घांसून उत्पन्न केलेला अग्नी हे दोन्हीही सारखेच भास्वर व तेजस्वी होतील ( मज्झिम ९३, ९६ ).

४ चारी जातींना पैसे खर्चिले असतां चारी जातीचे नोकर मिळूं शकतील. तेव्हां जातीमुळें उच्चनीचता उत्पन्न होते हें म्हणणें चुकीचें आहे (मज्झिम८४).

५ चारी जातींतील मनुष्य प्राणातिपातादि पापकर्में करूं शकतील अथवा त्यापासून विरत राहून पुण्यकर्में करूं शकतील व त्यामुळें त्या सर्वांना नरक किंवा स्वर्ग सारखाच प्राप्त होईल. त्यामध्यें जातीमुळें यत्किंचितही फरक होणार नाहीं. त्याचप्रमाणें इहलोकांतील कायद्याप्रमाणेंही एका अपराधाबद्दल चारी वर्णांच्या

---

१ Herein Gotama was in accord with the conclusion of modern biologists that 'the Anthropidæ are represented by the single genus and species, Man.' Chalmers. J.R.A.S. 1894. p. 346.

मनुष्यांस सारखीच शिक्षा मिळेल (दीघ. २७, मज्झिम ८४, ९०, ९३, ९६). उलटपक्षीं चारी जातींतून कोणीही घरांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतली तर त्यास लोकांकडून सारखाच मान मिळेल. ( मज्झिम ८४ ). परंतु एवढें मात्र खरें कीं, समाजांत क्षत्रिय व ब्राह्मण यांना विशेष मान दिला जातो ( मज्झिम ९० ).

६ श्रेष्ठ आचारविचार प्राप्त करून घेण्याच्या सामर्थ्याविषयीं पाहिलें तरी हें उघड आहे कीं सर्वांसही मैत्रीभावना प्राप्त करून घेतां येईल (मज्झिम ९३,९६).

७ ब्राह्मण म्हणतात कीं ब्राह्मणाचें धन भिक्षाचर्या, क्षत्रियाचें धन धनुर्विद्या, वैश्याचें धन गोरक्षा व शूद्राचें धन सेवा हें होय. परंतु खरोखर पाहिलें तर मनुष्यप्राण्याचें श्रेष्ठ धन म्हणजे आर्य लोकोत्तर धर्म होय. ( मज्झिम ९६ ).

८ दोघां भावांपैकीं एक वेदपठन केलेला चांगला सुशिक्षित असेल व दुसरा अशिक्षित असेल, तर जो सुशिक्षित असेल तो जरी वयानें लहान असला तरी त्यालाच ब्राह्मण अधिक मान देतील. त्याचप्रमाणें त्या दोघां भावांपैकीं एकजण विद्वान् असून दुराचारी असला, व दुसरा विद्वान् नसून सुशील असला तर त्या दुसऱ्या भावासच अधिक मान दिला जाईल. यावरून विद्या व आचरण यामुळेंच मनुष्य उच्च किंवा नीच होतो, जन्मामुळें नव्हे हें उघड दिसून येईल. ( मज्झिम ९३ ).

९ ब्राह्मण म्हणतात कीं, खालील जातींनीं वरील जातींची सेवा करावी पण वरिष्ठ जातींनीं नीच जातींची करूं नये. परंतु तत्त्वतः या म्हणण्यांत, कांहीं अर्थ नाहीं. ज्याची सेवा केल्यानें आपलें हित होईल, अनहित होणार नाहीं, त्याचीच सेवा करणें उचित होय. ( मज्झिम ९६ ).

१० जाती अनादिकालापासून चालत आल्या आहेत, त्या सर्व जगतावर आहेत, व न बदलणाऱ्या आहेत हें म्हणणें खोटें आहे. योन, कंबोज व इतर सरहद्दीवरील प्रदेशांत आर्य व दास असे दोनच वर्ग असून कधीं कधीं आर्याचा दास होतो व दासाचा आर्य होतो. ( मज्झिम ९३ ).

१ ऋग्वेदांतील अगदीं जुन्या भागांत कोठेंही चार वर्णांचा उल्लेख नाहीं. तेथें जागोजागीं फक्त आर्य व दास ( अथवा दस्यु ) असे दोनच वर्ग आढळतात. ( ऋ० २·१२·४; ३·३४·९ वगैरे ). चार वर्णांचा उल्लेख प्रथम दहाव्या मंडलांतील पुरुषसूक्तांत आलेला आहे. ( ऋ० १०. ९०. १२=अथर्व १९. ६. ६ वगैरे ). हें मंडल बरच मागाहून रचिलें गेलें आहे हें आतां सिद्ध झालेलें आहे. Vedic Index. ii. 247-271 पहा.

ब्राह्मणांनीं आपलें श्रेष्ठत्व स्थापित करण्याच्या उद्देशानें ब्रह्मदेवापासून जी आपली उत्पत्ती लाविली होती, तिचें खंडन करण्याच्या हेतूनेंच कीं काय बुद्धांनीं अग्गञ्ञसुत्तांत ( दीघ २७ ) मनुष्यप्राण्यांची उत्पत्ती कशी झाली, त्यांच्यामध्यें तृष्णेचा प्रादुर्भाव कसा झाला, त्यामुळें त्यांचें तेज नाहींसें होऊन सूर्यचंद्रादिक कसे उत्पन्न झाले, चौर्यकर्म, मृषावाद इत्यादि पापधर्मांचें आचरण मनुष्यें कशीं करूं लागलीं व त्यापासून सर्वांचें रक्षण करण्याकरितां त्यांनीं आपणापैकीं एकास कसें राजा म्हणून ठरविलें व त्यानंतर क्रमानें चारी वर्णांची उत्पत्ती कशी झाली इत्यादि पौराणिक कथा सांगितली आहे. तींत अर्थातच ऐतिहासिक सत्य मुळींच नाहीं.

दिव्यावदान नामक संस्कृतग्रंथांत शार्दूलकर्णावदान म्हणून एक अवदान आहे. त्यामध्यें जतिभेदासंबंधीं एक ब्राह्मण व एक मातंग यांमध्यें झालेला मनोरंजक वादविवाद दिला आहे. त्याचा जरी अर्थातच भगवान बुद्धाशीं संबंध लावितां येत नाहीं, तरी त्यावरून बौद्धांचे जातिभेदाविषयीं काय विचार होते हें कळण्यास मदत होईल, म्हणून त्याचा सारांश पुढें देतों.

प्रकृती नांवाच्या एका चांडालकन्यकेचें आनंदावर मन बसलें. तेव्हां तिनें आपल्या आईस सांगितलें कीं, कसेंही करून आनंदाशीं माझा संगम होईल असें कर. त्याप्रमाणें तिच्या आईनें मंत्र जपण्यास सुरुवात केली, त्याबरोबर आनंद तिजकडे ओढला जाऊं लागला. तेव्हां त्यानें भगवंतांचें स्मरण केलें व भगवंतांनीं मंत्र जपून त्यास परत आणिलें. दुसऱ्या दिवशीं प्रकृती आनंदाच्या मागोमाग फिरूं लागली. तेव्हां त्रासून तो बुद्धाकडे गेला. त्यांनीं उपदेश करून तिला भिक्षुणीसंघांत घेतलें. ही गोष्ट ऐकून लोकांस फार आश्चर्य वाटलें. तेव्हां भगवंतांनीं तिची पूर्वजन्मींची हकीकत सांगितली. ती अशी—

पूर्वी त्रिशंकु नांवाचा एक मातंगराजा होता. त्यास शार्दूलकर्ण नांवाचा सर्वांगसुंदर सर्वगुणसंपन्न असा एक पुत्र होता. त्याकरितां त्रिशंकुराजा पुष्करसारी ब्राह्मणाकडे त्याची मुलगी प्रकृती हिला मागणी घालण्यास गेला. तेव्हां तो ब्राह्मण संतापून म्हणाला, ‘ तूं हीन जातीचा आहेस. श्रेष्ठ हीनांशीं कधींही संबंध करीत नसतात!’

त्रिशंकु—ब्राह्मण व इतर वर्ण यांमध्यें कांहींही भेद नाहीं. जसे इतर वर्ण योनिज आहेत, तसे ब्राह्मणही योनिजच. शिवाय खरें पाहिलें तर ब्राह्मणांनींच वाईट कर्में केलीं आहेत. मांस खाण्याच्या इच्छेनें त्यांनींच यज्ञ सुरू केले. मंत्रांनीं प्रोक्षण केलेले पशु जर स्वर्गास जात असतील, तर ब्राह्मण आपल्या

आईबापांसच कां बळी देत नाहींत? नाहींतर स्वतःचाच कां यज्ञ करीत नाहींत? म्हणजे चटकन् स्वर्गास जावयास मिळेल! हा कांहीं स्वर्गाचा मार्ग नव्हे. ब्राह्मणग्रंथांत चार पातकें सांगितलीं आहेत. तीं चौर्य, मद्यपान, गुरुदारागमन व ब्रह्महत्या हीं होत. हीं जो करील तो अब्राह्मण होतो. परंतु व्रतें करून तो पुन्हा ब्राह्मण होऊं शकतो. तेव्हां खरोखर मानवजाती तेवढी एक असेंच म्हटलें पाहिजे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या केवळ संज्ञा आहेत. तेव्हां तुझी मुलगी माझ्या मुलास दे.

पुष्करसारी—चार वर्ण आहेत. त्यांतील वरिष्ठ वर्णांनीं खालच्या वर्णांतील भार्या करण्यास हरकत नाहीं परंतु याच्या उलट होऊं शकत नाहीं. ब्राह्मण हे ब्रह्मदेवाच्या मुखापासून, क्षत्रिय उरापासून, वैश्य नाभीपासून व शूद्र पायापासून असे हे चार वर्ण उत्पन्न झालेले आहेत. तेव्हां आम्ही श्रेष्ठ व तूं कनिष्ठ. तुमचा आमचा संबंध कसा होऊं शकणार?

त्रिशंकु—हात, पाय, केस, नखें, पोट, पाठ, नाक, कान, डोळे यांमध्यें चारी वर्णांच्या लोकांत काय फरक आहे? पोरें खेळतांना वेगवेगळे मातीचे ढीग करून त्यांस जशीं निरनिराळीं नांवें देतात, तसे हे चार वर्ण संज्ञामात्रक आहेत. वास्तविक पाहतां त्यांच्यांत काडीमात्र फरक नाहीं. जर ब्रह्म्यानेंच सर्व प्राणी उत्पन्न केलेले असतील, तर चार वर्ण आहेत हें म्हणणेंच चुकीचें होईल. प्राणी व वनस्पती यांमध्यें जशा निरनिराळ्या जाती आहेत, तशा मनुष्यांत मुळींच नाहींत. जर ब्राह्मणच तेवढे स्वर्गास जाणार असें असतें, तर ते व इतर लोक यांमध्यें भेद काढणें बरोबर झालें असतें. जाती या केवळ संज्ञा होत. नीच कुलाशीं आपण संबंध करितों असें वाटण्याचें तुला कांहीं कारण नाहीं. कारण माझा पुत्र प्रमाण, श्रुति, शील, प्रज्ञा इत्यादि श्रेष्ठ गुणांनीं संपन्न आहे. आणि ब्रह्मदेवानें जर हे चार वर्ण उत्पन्न केले असतील, तर ब्राह्मणी ही ब्राह्मणाची बहीण होईल. मग तुम्ही आपल्या बहिणीशीं लग्न कसें लावितां? एकंदरींत जाती संज्ञामात्रक होत. तर तूं आपली मुलगी माझ्या मुलास दे.

तदनंतर पुष्करसारी ब्राह्मणानें आपली मुलगी प्रकृती त्रिशंकु राजाचा मुलगा शार्दूलकर्ण यास दिली. तीच ही या जन्मांत चांडालकुलांत उत्पन्न झाली. (दिव्यावदान ३३).

---

# ओक्काक व शाक्यकुल.

प्रथम कल्पांतील राजा महासम्मत[1] याच्यानंतर रोज, वररोज, कल्याण, वरकल्याण, मंधाता, वरमंधाता, उपोसथ, चर, उपचर[2], मखादेव अशा परंपरेनें चौऱ्यायशी हजार क्षत्रिय झाले[3]. त्यानंतर तीन ओक्काककुलें झालीं. त्यांपैकीं शेवटच्या ओक्काकाला[4] भत्ता, चित्ता, जालिनी व विसाखा अशा पांच राण्या होत्या. त्यांतील थोरलीपासून त्यास ओक्कामुख, करकण्डु, हत्थिनिक व सिनीसुर[5] असे चार पुत्र व पिया, सुप्पिया, आनंदा, विजाता व विजितसेना अशा पांच कन्या अशीं नऊ मुलें झालीं. थोरल्या राणीच्या मरणानंतर त्यानें दुसऱ्या एका राजकन्येशीं लग्न करून तिला पट्टराणी केली. तिला जन्तु[6] नांवाचा एक मुलगा झाला. थोरले मुलगे वगळून आपल्या मुलास राज्य द्यावें असा ती हट्ट धरून बसली. तेव्हां त्यानें थोरल्या मुलांस अरण्यांत जाऊन आपल्या मरणानंतर परत येण्यास सांगितलें. आपल्या बहिणींसह ते हिमालयांत गेले व तेथें कपिलवस्तु नांवाची नगरी स्थापून राहिले. दुसऱ्या कुलांतील स्त्रियांशीं लग्न केलें तर आपल्या कुलाचें शुद्धत्व बिघडेल या भयानें थोरल्या बहिणीला मातेसमान मानून बाकीं-च्याशीं त्या चौघांनीं विवाह लाविले[7].

कांहीं दिवसांनीं प्रियेला कुष्टरोग जडला, म्हणून त्या भावांनीं अरण्यांत एक भुयार खणून त्यांत खाद्यसामुग्री ठेवून तेथें तिला नेऊन ठेविलें. इकडे वाराणसीचा राजा राम हाही कुष्टरोगानें पीडित घेऊन त्याच अरण्यांत येऊन राहिला. तेथें त्याचा तो रोग नाहींसा झाला. पुढें एकदां त्यानें जमिनीखालून येणारा प्रियेचा शब्द ऐकून तिला शोधून काढलें व तिचा रोग बरा करून तिच्याशीं

---

१. हा वैवस्वत मनूच्या वंशांतील होता. (महाबोधिवंस ९३). २. महाबोधिवंसाप्रमाणें उपचराच्या नंतर परंपरेनें सगर, सागर, भरत, भगीरथ इत्यादि व त्यानंतर महासुदस्सन व मखादेव, निमि, कुस, रघु, अज, दसरथ, राम असे राजे झाले. ३. जातक २५८ व ४२२ पहा. इतिहास व पुराणें यांतील परंपरा निराळ्या आहेत. महाभारत. ३·२०१; १३ २; १४·४; रामायण १·७०; २·११०; ७·७१; ब्रह्मपुराण ७, मत्स्यपुराण १२, पद्मपुराण ५, ८, वायुपुराण ८५ व त्यापुढील, विष्णुपुराण ४.१, हरिवंश १·११, भागवत ९·६ वगैरे. Rockhill pp. 9, 13. ४. त्याचें नांव इक्ष्वाकु विरूधक असें होतें. ( Rockhill p. 11 ). ५. उल्कामुख ( **Skar-mdah gdong** ), करकर्ण ( Lag rna ), हस्तिनाजक ( Glang-po tche hdul ) व नूपुर ( **Rkang-gdub-chan** ). Rockhill. ६. राज्यनंद (?) ( Rgyal-srid dgah ). **Rockbill.** ७. ‘ They took as their wives sisters *who were not of the same mother as themselves.* ’ **Rockhill p. 12.**

लग्न लाविलें. त्यांना बत्तीस मुलगे झाले व त्यांनीं ओक्काक राजाचे चार पुत्र (यांना शाक्य म्हणत ) यांच्या मुलींशीं लग्नें लाविलीं. राम परत वाराणसीस न जातां तेथेंच कोलनगर (उर्फ व्यग्घपज्ज) नांवाचें शहर वसवून राहिला(बुद्धघोष).

ओक्काक याचें मूळ संस्कृत रूप इक्ष्वाकु. त्याचा उल्लेख ऋग्वेदांत देखील ( १०·६०·४ ) आला आहे. इक्ष्वाकु हा वैवस्वत मनूचा मुलगा होता,[1] याविषयीं सर्व पुराणांचें एक मत आहे. पुढील परंपरांमधून मात्र थोडथोडा फरक आहे. सर्वसंमत परंपरा स्थूलमानानें पुढीलप्रमाणें आहे. ब्रह्मा, मरीचि, कश्यप, विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु, काक्ष, विकुक्षि, बाण, अनरण्य, पृथु, त्रिशंकु, धुंधुमार, युवनाश्व, मंधाता, सुसंधि, ध्रुवसंधि, भरत, असित वगैरे[2]. यापुढील परंपरा सांपडत नाहीं. परंतु पुढें बृहद्रथ अथवा बृहद्बल यांजपासून सुरवात करून अनेक राजांनंतर कृतंजय, रणंजय, संजय, शाक्य, शुद्धोदन, सिद्धार्थ, राहुल, प्रसेनजित्, भाव्य, क्षुद्रक, कुलक, सुरथ व शेवटला सुमित्र अशी परंपरा देण्यांत येते. येथें इक्ष्वाकुवंश संपला ( मत्स्य २७१, वायु ९९ ).

अपदान नामक ग्रंथांत पुढील उल्लेख आहे—

अपरिमेय्ये इतो कप्पे भूमिपालो महिद्धिको
ओक्काको नाम नामेन राजा रट्ठे भविस्सति ।
सोऽसितिथिसहस्सानं सब्बानं पवरा च या
अभिजाता खत्तियानी नव पुत्ते जनिस्सति ।
नव पुत्ते जनित्वान खत्तियानी मरिस्सति
तरुणाऽव पिया कञ्ञा महेसित्तं करिस्सति ।
ओक्काक तोसयित्वान वरं कञ्ञा लभिस्सति
वरं लद्धा च सा कञ्ञा पुत्ते पब्बाजयिस्सति ।
पब्बाजिता च ते सब्बे गमिस्सन्ति नगुत्तमं
जातिभेदभया सब्बे भगिनीहि संवसिस्सरे ।
एकाऽव कञ्ञा ब्याधीहि भाविस्सति पुरक्खता
मा नो जाति पभिज्जाऽति निखणीयन्ति खत्तिया ।
खत्तियो नीहरित्वान ताय सद्धिं वसिस्सति
भविस्सति तदा भेदो ओक्काककुलसंभवो ।
तेसं पजा भविस्सन्ति कोळिया नाम जातिया
तत्थ मानुसकं भोगं अनुभोस्सन्तऽनप्पकं ।

---

१. परंतु महाभारत १४. ४ येथें मनु, प्रसन्धि, क्षुप, इक्ष्वाकु, विंश, विविंश, खनीनेत्र, सुवर्चस्, कोरंधम व मरुत्त अशी परंपरा दिली आहे. २. महाभारत ३·२०१; मत्स्य १२; ब्रह्म ७; येथें शशाद, ककुत्स्थ, अनेनस्, पृथु, विश्वगश्व, अद्रि, युवनाश्व, श्राव, श्रावस्त, बृहदश्व, कुवलाश्व अथवा धुंधमार वगैरे अशी परंपरा आढळते.

# ४ सोणदण्डसुत्त.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके समयीं भगवान् [ बुद्ध ] अंगदेशांत[1] पांचशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित हिंडत असतां चंपानगरीस गेले. तेथें भगवान् चंपानगरींतील गग्गरा नांवाच्या पुष्करिणीच्या तीरावर रहात होते. त्यावेळीं सोणदण्ड नांवाचा ब्राह्मण चंपानगरींत रहात होता. ती नगरी माणसांनीं गजबजलेली, तृण, काष्ठ, उदक व धान्य यांनीं परिपूर्ण व राजभोग्य असून मगधदेशाचा राजा सेनिय[2] बिंबिसार यानें राजदाय म्हणून ब्राह्मणास दान दिली होती.

२ चंपानगरींतील ब्राह्मण व गृहस्थ यांनीं ऐकिलें कीं, ' शाक्यपुत्र श्रमण गौतम शाक्यकुलांतून प्रव्रज्या घेण्याकरितां बाहेर पडून अंगदेशांत पांचशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित हिंडत असतां चंपानगरींत येऊन तेथें गग्गरा नांवाच्या पुष्करिणीच्या तीरावर रहात आहे. त्या भगवान् गौतमाची अशी कीर्ति पसरली आहे, कीं अर्हत्, सम्यक्संबुद्ध, विद्या व आचरण यांनीं संपन्न, सुगत, सर्वलोक जाणणारा, सर्वश्रेष्ठ, दमन करण्यास योग्य अशा जनांचा मार्गदर्शक व देव आणि मनुष्य यांचा शास्ता असा भगवान् बुद्ध आहे. तो देवलोक, मारलोक

---

१ भागलपूरच्या सभोंवतालचा प्रदेश. हा मगधदेशाच्या पूर्वेस होता. अंगदेशाचें राज्य पूर्वीं स्वतंत्र होतें. गोपथब्राह्मणांत ( २.९ ) अंगमगधाः असा त्याचा उल्लेख आला आहे. परंतु पुढें मगधराज्यांत त्याचा समावेश झाला. त्याची राजधानी चंपानगरी ही चंपानदीच्या कांठींच होती. या नगरीजवळच अग्रमहिषी गग्गरा हिनें खोदविलेली एक पुष्करिणी होती. तिच्या तीरावर पंचवर्ण कुसुमांनीं युक्त असें एक मोठें चंपकवन होतें. त्यांमध्यें भगवान राहिले ( बुद्धघोष ). २ सं. श्रेणिक. हा मगधदेशाचा पांचवा राजा होता. त्यानें राजगृहाचा नवा भाग वसविला व अंगदेश हस्तगत करून घेतला. त्याच्या राण्यांपैकीं एक कोसल देशांतील व दुसरी वेसालीतील होती. या दुसऱ्या राणीचा मुलगा अजातशत्रु (मागें पृ०८७पहा.) बिंबिसारानें एकंदर अठ्ठावीस वर्षें राज्य करून पुढें आपल्या पुत्राच्या हातीं सर्व राज्यकारभार दिला. परंतु अजातशत्रूचें तेवढ्यानें समाधान न होऊन देवदत्ताच्या चिथावणीवरून त्यानें बापास हालहाल करून ठार मारिलें.

व ब्रह्मलोक यांसाहित हें जग व श्रमण आणि ब्राह्मण, देव आणि मनुष्य यांसहित ही प्रजा स्वतः जाणून व पूर्णपणें ओळखून तें ज्ञान इतरांसही देतो व आरंभीं, मध्यें व शेवटींही कल्याणप्रद, सार्थ व सव्यंजन असा धर्म व अगदीं पूर्ण व शुद्ध असें श्रेष्ठ आचरण हीं स्पष्टपणें दाखवितो. अशा अर्हन्तांचें दर्शन घेणें चांगलें.'

तेव्हां चंपानगरींतील ब्राह्मण व गृहस्थ नगरींतून निघून निरनिराळे जमाव करून गग्गरा पुष्करिणीकडे गेले.

२ त्यावेळीं सोणदण्ड ब्राह्मण दिवसा आपल्या वाड्याच्या गच्चीवर निजला होता. तेथून त्यानें चंपानगरींतील ब्राह्मण व गृहस्थ यांस नगरींतून निघून निरनिराळे जमाव करून गग्गरा पुष्करिणीकडे जातांना पाहिलें. तेव्हां त्यानें द्वारपालास बोलाविलें [व विचारिलें,] "द्वारपाला, हे चंपानगरींतील ब्राह्मण व गृहस्थ नगरींतून निघून निरनिराळे जमाव करून गग्गरा पुष्करिणीकडे कशाकरितां जात आहेत?"

"शाक्यपुत्र श्रमण गौतम शाक्यकुलांतून प्रव्रज्या घेण्याकरितां बाहेर पडून अंगदेशांत पांचशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित हिंडत असतां चंपानगरींत येऊन तेथें गग्गरा पुष्करिणीच्या तीरावर रहात आहे. त्या भगवान् गौतमाची अशी कीर्ति पसरली आहे कीं, अर्हत्, सम्यक्संबुद्ध, विद्या व आचरण यांनीं संपन्न, सुगत, सर्वलोक जाणणारा, सर्वश्रेष्ठ, दमन करण्यास योग्य अशा जनांचा मार्गदर्शक व देव आणि मनुष्य यांचा शास्ता असा भगवान् बुद्ध आहे. त्या भगवान् गौतमाचें दर्शन घेण्याकरितां हे जात आहेत."

"तर मग, द्वारपाला, त्या चंपानगरींतील ब्राह्मण व गृहस्थांकडे जाऊन त्यांस सांग कीं, 'सोणदण्ड ब्राह्मणानें तुम्हांस असा निरोप पाठविला आहे कीं, जरा थांबा, मी सुद्धां श्रमण गौतमाच्या दर्शनास येत आहें.'"

---

१. खत्तु (सं. क्षत्तृ) 'राजराजञ्ञादीनं भण्डधरा पुरिसा खत्ता, नेसं तायनतो खत्ता' (टीका). शतपथब्राह्मण ५·३·१·७ येथें सायणानें त्याचा अर्थ अन्तःपुराध्यक्ष (Chamberlain) व १३·४·२·५ येथें आयव्ययाध्यक्ष असा दिला आहे. इतर ठिकाणीं कोशाध्यक्ष, मंत्री, दूत, प्रतीहार इत्यादि अर्थ दिले आहेत. (Macdonell & Keith. Vedic Index i. 201).

"ठीक आहे," असें सोणदण्ड ब्राह्मणास उत्तर देऊन तो द्वारपाल चंपानगरींतील ब्राह्मण व गृहस्थ यांकडे गेला व त्यांस म्हणाला, "सोणदण्ड ब्राह्मणानें असें सांगितलें आहे कीं, जरा थांबा, मी सुद्धां श्रमण गौतमाच्या दर्शनास येत आहे."

४ त्यावेळीं चंपानगरींत निरनिराळ्या कामांमुळें नानादेशचे पांचशें ब्राह्मण रहात होते. त्या ब्राह्मणांनीं ऐकिलें कीं सोणदण्ड ब्राह्मण श्रमण गौतमाच्या दर्शनास जात आहे. तेव्हां ते ब्राह्मण सोणदण्ड ब्राह्मणाकडे जाऊन त्यास म्हणाले, "खरोखरीच आपण श्रमण गौतमाच्या दर्शनास जात आहां काय?"

"होय, मलाही श्रमण गौतमाच्या दर्शनास जावेसें वाटतें."

५ "आपण श्रमण गौतमाच्या दर्शनास जाऊं नये. त्याच्या दर्शनास जाणें आपणास योग्य नाहीं. जर आपण श्रमण गौतमाच्या दर्शनास गेलां, तर आपलें यश कमी होऊन श्रमण गौतमाचें यश वाढेल, आणि असें होईल म्हणूनच आपण श्रमण गौतमाच्या दर्शनास जाऊं नये. श्रमण गौतमानेंच आपल्या दर्शनास येणें योग्य आहे. आपण माता व पिता या दोहोंबाजूंनीं पूर्वींच्या सात पिढ्यांपर्यंत शुद्ध आहांत, व आपल्या जातीच्या शुद्धतेविषयीं कोणींही आक्षेप घेतला नाहीं किंवा निंदा केली नाहीं, आणि असें आहे म्हणूनच आपण श्रमण गौतमाच्या दर्शनास जाऊं नये, श्रमण गौतमानेंच आपल्या दर्शनास येणें योग्य आहे. आपण श्रीमान् आहांत व आपणांजवळ धनधान्यादि संपत्ति पुष्कळ आहे; आपण अध्ययन करणारे, मंत्र म्हणणारे, निघंटु, केटुभ व अक्षरप्रभेद यांसहित तिन्ही वेद व इतिहास पांचवा यांचें अध्ययन केलेले, पदें व व्याकरण जाणणारे, लोकायत व महापुरुषलक्षणें यांमध्यें निष्णात आहांत; आपण सुरूप, देखणे व गंभीर आहांत; आपल्या शरीराची कांति फार सुंदर आहे, आपला वर्ण फार सुरेख आहे, आपण तेजस्वी आहांत,

---

१. संसुद्धगहणिको. 'संसुद्धा ते मातुगहणी, कुच्छीति अत्थो' ( बुद्धघोष ).

२. महद्धनो महाभोगो. ३. ब्रह्मवण्णी. 'सेट्ठवण्णा' (बुद्धघोष). ४. ब्रह्मवच्चसी. 'महाब्रह्मुनो सरीरसदिसेनेव सरीरेन समन्नागतो' ( बुद्धघोष ). सं. ब्रह्मवर्चसिन् याचा अर्थ holy or sanctified by spiritual pre-eminence (Apte) असा आहे.

आपणाला पहाणाराचें भाग्यच समजलें पाहिंजे; आपण शीलयुक्त आहां व आपलें शील फार उच्च दर्जाचें आहे; आपली वाणी फार मधुर व भाषण गोड असून बोलणें प्रौढ, स्पष्ट व स्वच्छ आहे, त्यांत वेडगळ-पणा[2] मुळींच नाहीं; आपण पुष्कळांचे गुरु व गुरूंचे गुरु असून तीनशें विद्यार्थ्यांना मंत्र शिकवीत आहां, नाना देश व दिशा यांहून विद्यार्थी आपणाकडे मंत्र शिकण्याच्या इच्छेनें येतात; आपण म्हातारे, वृद्ध, मोठे आहांत, आपल्या वयास पुष्कळ वर्षें गेलीं आहेत, पण श्रमण गौतम तरुण असून त्यानें नुकतीच प्रव्रज्या घेतली आहे; मगधदेशाचा राजा सेनिय बिंबिसार आपला फार सत्कार करितो, आपला फार गौरव करितो, आपणास मान देतो, आपली पूजा करितो व आपली संभावना करितो; पोक्खरसाती ब्राह्मण आपला फार सत्कार करितो, आपला फार गौरव करितो, आपणास मान देतो, आपली पूजा करितो व आपली संभा-वना करितो; आपण चंपानगरींत रहात आहांत व ही नगरी माणसांनीं गजबलेली, तृण, काष्ठ, उदक व धान्य यांनीं परिपूर्ण व राजभोग्य असून मगधदेशाचा राजा सेनिय बिंबिसार यानें राजदाय म्हणून आप-णास दान दिली आहे. [या सर्व कारणांस्तव] आपण श्रमण गौतमाच्या दर्शनास जाऊं नये, श्रमण गौतमानेंच आपल्या दर्शनास येणें योग्य आहे."

६ असें ते ब्राह्मण बोलल्यावर सोणदण्ड ब्राह्मण त्यांस म्हणाला, "आतां माझेंही भाषण ऐकून घ्या व मींच श्रमण गौतमाच्या दर्शनास कां जावें, त्यानें माझ्या दर्शनास कां येऊं नये हें समजून घ्या. श्रमण गौतम माता व पिता या दोन्हीं बाजूंनीं पूर्वींच्या सात पिढ्यां-पर्यंत शुद्ध आहे व त्याच्या जातीच्या शुद्धतेविषयीं कोणीं आक्षेप घेतला नाहीं किंवा निंदा केली नाहीं, आणि असें आहे म्हणूनच श्रमण गौतमानें माझ्या दर्शनास येऊं नये, मीच त्याच्या दर्शनास जाणें योग्य आहे. श्रमण गौतमानें मोठा ज्ञातिसंघ सोडून प्रव्रज्या घेतली आहे, श्रमण

१. असुद्धावकासो दस्सनाय. २. अनेलगळाय. 'कांहींच्या तोंडांतून बोलतांना लाळ गळते, तसें नाहीं' (बुद्धघोष).

गौतमानें तळघरांत व खोल्यांत ठेविलेलें पुष्कळ सोनें व पैको सोडून देऊन प्रव्रज्या घेतली आहे; श्रमण गौतम लहान, शिशु, काळ्या केसांचा, सुंदर यौवनानें युक्त असून प्रथम वयांत असतांनाच त्यानें घरांतून बाहेर निघून प्रव्रज्या घेतली आहे; आईबापांची इच्छा नसतांना व ते रडत असतांना दाढी व केंस काढून टाकून काषायवस्त्रें परिधान करून श्रमण गौतमानें घरांतून बाहेर पडून गृहवियुक्त प्रव्रज्या घेतली आहे; श्रमण गौतम सुरूप, देखणा व गंभीर आहे, त्याच्या शरीराची कांति फार सुंदर आहे, त्याचा वर्ण फार सुरेख आहे, तो कांतिमान् व तेजस्वी आहे, त्याला पाहणाराचें भाग्यच समजलें पाहिजे; श्रमण गौतम शीलवान् असून आर्यशीलानें व कुशल शीलानें युक्त आहे; श्रमण गौतमाची वाणी फार मधुर व भाषण गोड असून बोलणें प्रौढ, स्वच्छ व स्पष्ट आहे, त्यांत वेडगळपणा मुळींच नाहीं; श्रमण गौतम पुष्कळांच्या गुरूंचा गुरु आहे; श्रमण गौतमाची कामवासना व चापल्य हीं नाहींशीं झालीं आहेत; श्रमण गौतम कर्मवादी व क्रियावादी[3] असून ब्राह्मणजातीला निष्पापत्व[4] मुख्यत्वेंकरून शिकवितो; श्रमण गौतमानें मोठ्या व अभिन्न[5]क्षत्रिय अशा कुलांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतली आहे; श्रमण गौतमानें श्रीमंत, पुष्कळ पैसा अडका असलेल्या कुलांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतली आहे; दुसरीं राष्ट्रें व देश यांमधून श्रमण गौतमास प्रश्न विचारण्यास लोक येतात; श्रमण गौतमास हजारों देवता शरण आल्या आहेत; श्रमण गौतमाची अशी कीर्ति पसरली आहे कीं, अर्हत्, सम्यक्संबुद्ध, विद्या व आचरण यांनीं संपन्न, सुगत, सर्वलोक जाणणारा, सर्वश्रेष्ठ, दमन करण्यास योग्य अशा जनांचा मार्गदर्शक व देव आणि मनुष्य यांचा शास्ता असा भगवान् बुद्ध आहे; श्रमण गौतम बत्तीस महापुरुषलक्ष-

---

१. भूमिगतं वेहासट्ठं च. २. हिरञ्ञसुवण्णं. सुवर्ण 'beautiful-coloured' is an epithet of gold (हिरण्य), and then comes to be used as a substantive denoting 'gold.' रजत as an adjective with हिरण्य denotes silver. Vedic Index ii. 197, 459. ३. मज्झिम ७१. ४. अपापपुरेक्खारो. ५. आदीनखत्तियकुला असाही पाठ आहे.

णांनीं युक्त आहे; श्रमण गौतम स्वागत करणारा, मधुर बोलणारा, आनंद देणारा, कपाळास आंठ्या न घालणारा, मोकळ्या मनानें सर्व सांगणारा व प्रथमतःच भाषणास सुरवात करणारा आहे; चारी परिषदा श्रमण गौतमाचा सत्कार करितात, त्याचा गौरव करितात, त्यास मान देतात, त्याची पूजा करितात व त्याची संभावना करितात; पुष्कळ देव व मनुष्य श्रमण गौतमावर प्रसन्न आहेत; ज्या गांवांत अथवा शहरांत श्रमण गौतम राहतो तेथें भुतेंखेतें मनुष्यांस त्रास देत नाहींत; श्रमण गौतम संघनायक, गणनायक, आचार्य व पुष्कळ तीर्थंकरांचा प्रमुख आहे. ज्याप्रमाणें कित्येक श्रमणब्राह्मणांचें यश कोणत्यातरी प्रकारानें वाढतें, तसें श्रमण गौतमाचें यश वाढत नाहीं, तर श्रेष्ठ विद्या व आचरण यांच्या योगानें त्याचें यश वाढतें; मगधदेशचा राजा सेनिय बिंबिसार हा पुत्र, भार्या, मंत्री व अमात्य यांसहित श्रमण गौतमाला शरण आला आहे; कोसलदेशचा राजा पसेनजि हा पुत्र, भार्या, मंत्री व अमात्य यांसहित श्रमण गौतमाला शरण आला आहे; पोक्खरसाती ब्राह्मण पुत्र, भार्या, मंत्री व अमात्य यांसहित श्रमण गौतमाला शरण आला आहे; मगधदेशचा राजा सेनिय बिंबिसार श्रमण गौतमाचा सत्कार करितो, त्याचा गौरव करितो, त्यास मान देतो, त्याची पूजा करितो व त्याची संभावना करितो; कोसलदेशचा राजा पसेनदि श्रमण गौतमाचा सत्कार करितो, त्याचा गौरव करितो, त्यास मान देतो, त्याची पूजा करितो व त्याची संभावना करितो; पोक्खरसाती ब्राह्मण श्रमण गौतमाचा सत्कार करितो, त्याचा गौरव करितो, त्यास मान देतो, त्याची पूजा करितो व त्याची संभावना करितो; श्रमण गौतम हल्लीं चंपानगरींत येऊन गग्गरा पुष्करिणीच्या तीरीं राहिला आहे. जे कोणी श्रमण व ब्राह्मण आमचे गांवांत येतात ते आमचे अतिथी होत, व अतिथींचा तर आम्हीं सत्कार केला पाहिजे, त्यांचा गौरव केला पाहिजे, त्यांस मान दिला पाहिजे, त्यांची पूजा केली पाहिजे व त्यांची संभावना केली

१. पुब्बभासी. २. भिक्षु, भिक्षुणी, उपासक व उपासिका यांच्या परिषदा. ३. असनुस्सा. ४. 'अचेलक असणें इत्यादि तऱ्हांनीं' (बुद्धघोष).

पाहिजे. ज्याअर्थीं श्रमण गौतम चंपानगरींत येऊन गग्गरा पुष्करिणीच्या तीरीं राहिला आहे, त्याअर्थीं तो आमचा अतिथी होय, आणि अतिथीचा तर आम्हीं सत्कार केला पाहिजे, त्याचा गौरव केला पाहिजे, त्यास मान दिला पाहिजे, त्याची पूजा केली पाहिजे व त्याची संभावना केली पाहिजे; आणि म्हणूनच श्रमण गौतमानें माझ्या दर्शनास येणें योग्य नाहीं, मींच त्याच्या दर्शनास जाणें योग्य होय. त्या भगवान् गौतमाचे इतके गुण मीं सांगितले, परंतु एवढेच त्याचे गुण नाहींत, भगवान् गौतमाचे गुण अपरिमित आहेत."

७ असें सोणदण्ड ब्राह्मण बोलल्यावर ते ब्राह्मण त्यास म्हणाले, "आपण म्हणतां तसे जर श्रमण गौतमाचे गुण असतील तर शंभर योजनें जरी तो दूर असला तरी खांद्यावर शिदोरी घेऊन श्रद्धावान् कुलपुत्रानें त्याच्या दर्शनास गेलें पाहिजे. तर चला, सर्वजण त्या श्रमण गौतमाच्या दर्शनास जाऊं या."

तेव्हां सोणदण्ड ब्राह्मण ब्राह्मणांच्या मोठ्या समुदायासहित गग्गरा पुष्करिणीकडे जाण्यास निघाला.

८ वनामध्यें गेल्यावर सोणदण्ड ब्राह्मणाच्या मनांत असा विचार आला कीं, "मीं श्रमण गौतमाला प्रश्न विचारिला असतां जर तो मला म्हणाला कीं, 'हे ब्राह्मणा, हा प्रश्न असा विचारावयाचा नाहीं, तर याप्रमाणें विचारावयाचा,' तर हे ब्राह्मण माझी अशी हेटाळणी करितील कीं, 'सोणदण्ड ब्राह्मण मूर्ख आहे, बावळट आहे. त्याला श्रमण गौतमाला नीट प्रश्न सुद्धां विचारितां येईना!' ज्याची हे लोक हेटाळणी करितील त्याचें यश कमी होईल. ज्याचें यश कमी होईल त्याची मिळकतही कमीच होणार, आणि माझी तर सर्व मिळकत यशावरच अवलंबून आहे. मला जर श्रमण गौतमानें प्रश्न विचारिला व माझ्या उत्तरानें त्याचें समाधान झालें नाहीं आणि तो मला

---

१. पुटंसेनाऽपि. पुटोसेनाऽपि असाही पाठ आहे. 'पुटोसं वुच्चाति पाथेय्यं तं गहेत्वा' किंवा 'पुटो अंसे अस्साऽति पुटंसो । अंसेन हि पाथेय्यपुटं वहन्तेनाऽतिपि वुत्तं' (बुद्धघोष). अंगुत्तर ४·१९० पहा.

म्हणाला कीं, ' हे ब्राह्मणा, या प्रश्नाचें उत्तर असें नाहीं द्यावयाचें, याप्रमाणें द्यावयाचें, ' तर हे ब्राह्मण माझी हेटाळणी करितील कीं, ' सोणदण्ड ब्राह्मण मूर्ख आहे, बावळट आहे. त्याला प्रश्नाचें नीट उत्तर देऊन श्रमण गौतमाचें समाधान सुद्धां करितां आलें नाहीं. ' ज्याची हे लोक हेटाळणी करितील त्याचें यश कमी होईल. ज्याचें यश कमी होईल त्याची मिळकतही कमीच होणार आणि माझी तर सर्व मिळकत यशावरच अवलंबून आहे. जर मी इतक्या जवळ येऊन श्रमण गौतमाचें दर्शन घेतल्याशिवाय परत फिरेन तर हे ब्राह्मण माझी अशी हेटाळणी करितील कीं, ' सोणदण्ड ब्राह्मण मूर्ख आहे, बावळट आहे. तो गर्वानें अगदीं फुगून गेला होता, पण आतां कसा घाबरला ! श्रमण गौतमाचें दर्शन घेण्याची देखील त्याला छाती झाली नाहीं ! इतक्या जवळ येऊन श्रमण गौतमाचें दर्शन घेतल्याशिवाय तो कसा परत फिरतो ! ' ज्याची हे लोक हेटाळणी करितील त्याचें यश कमी होईल, ज्याचें यश कमी होईल त्याची मिळकतही कमीच होणार, आणि माझी तर सर्व मिळकत यशावरच अवलंबून आहे. "

९ नंतर सोणदण्ड ब्राह्मण भगवंतांकडे गेला व कुशलप्रश्नादिक विचारून एके बाजूस बसला. चंपानगरींतील ब्राम्हण व गृहस्थ यांपैकीं कांहीं भगवंतांस नमस्कार करून एके बाजूस बसले, कांहीं त्यांस कुशलप्रश्नादिक विचारून एके बाजूस बसले, कांहीं त्यांच्यापुढें हात जोडून एके बाजूस बसले, कांहीं आपलें नांव व गोत्र सांगून एके बाजूस बसले व कांहीं मुळींच कांहीं न बोलतां एके बाजूस बसले.

१० तेथेंही सोणदण्ड ब्राह्मण पुष्कळ विचार करीत बसला कीं, " मीं श्रमण गौतमाला प्रश्न विचारला असतां जर तो मला म्हणाला कीं, ' हे ब्राह्मणा, हा प्रश्न असा विचारावयाचा नाहीं, तर याप्रमाणें विचारावयाचा, ' तर हे ब्राह्मण माझी अशी हेटाळणी करितील कीं, ' सोणदण्ड ब्राह्मण मूर्ख आहे, बावळट आहे. त्याला श्रमण गौतमाला नीट प्रश्न सुद्धां विचारतां येईना !' ज्याची हे लोक हेटाळणी करितील त्याचें यश कमी होईल. ज्याचें यश कमी होईल त्याची मिळकतही कमीच

होणार आणि माझी तर सर्व मिळकत यशावरच अवलंबून आहे. मला जर श्रमण गौतमानें प्रश्न विचारिला व माझ्या उत्तरानें त्याचें समाधान झालें नाहीं आणि तो मला म्हणाला कीं, ‘ हे ब्राह्मणा, या प्रश्नाचें उत्तर असें नाहीं द्यावयाचें, तर याप्रमाणें द्यावयाचें, ’ तर हे ब्राह्मण माझी हेटाळणी करतील कीं, ‘सोणदण्ड ब्राह्मण मूर्ख आहे, बावळट आहे. त्याला प्रश्नाचें उत्तर देऊन श्रमण गौतमाचें समाधान सुद्धां करितां आलें नाहीं!’ ज्याची हे लोक हेटाळणी करितील त्याचें यश कमी होईल. ज्याचें यश कमी होईल त्याची मिळकतही कमीच होणार आणि माझी तर सर्व मिळकत यशावरच अवलंबून आहे. जर श्रमण गौतम मला आचार्यानें शिकविलेल्या तीन विद्यांमधील प्रश्न विचारील तर किती चांगलें होईल! म्हणजे मी प्रश्नाचें उत्तर देऊन खात्रीनें त्याचें समाधान करीन ! ”

११ सोणदण्ड ब्राह्मणाच्या मनांतील हा विचार आपल्या मनानें जाणून भगवंतांनीं विचार केला कीं, “ सोणदण्ड ब्राह्मणाच्या मनांत बराच घोटाळा उडाला आहे. तर मी त्याच्या आचार्यानें शिकविलेल्या तीन विद्यांमधीलच प्रश्न त्यास विचारीन. ”

नंतर भगवान् सोणदण्ड ब्राह्मणास म्हणाले, “ हे ब्राह्मणा, मनुष्य कोणत्या अंगांनीं युक्त असावा म्हणजे ब्राह्मण त्यास ब्राह्मण म्हणतील व मी ब्राह्मण आहें असें जर तो म्हणेल तर त्याचें तें भाषण खरें होईल व त्याजवर खोटेपणाचा आरोप येणार नाहीं ? ”

१२ तेव्हां सोणदण्ड ब्राह्मणाला वाटलें कीं, “आचार्यानें शिकविलेल्या तीन विद्यांतील प्रश्न जर श्रमण गौतम मला विचारील तर किती चांगलें होईल, म्हणजे मी प्रश्नाचें उत्तर देऊन खात्रीनें त्याचें समाधान करीन, अशी जी मीं इच्छा केली होती, ज्याची मला आकांक्षा होती, जें मला पाहिजें होतें, जें माझ्या मनांत होतें, त्याच आचार्यानें शिकविलेल्या तीन विद्यांतील प्रश्न श्रमण गौतम विचारीत आहे. तेव्हां आतां प्रश्नाचें उत्तर देऊन मी खात्रीनें त्याचें समाधान करीन ! ”

१३ नंतर सोणदण्ड ब्राह्मण शरीर तांठ करून सर्व मंडळीकडे पाहून भगवंतांस म्हणाला, “ गौतमा, ब्राह्मण पांच अंगांनीं युक्त असलेल्या

मनुष्यास ब्राह्मण असें म्हणतील व मी ब्राह्मण आहें असें जर तो म्हणेल तर त्याचें तें भाषण खरें होईल व त्यावर खोटेपणाचा आरोप येणार नाहीं. तीं पांच अंगें कोणतीं ? तो ब्राह्मण माता व पिता या दोहोंबाजूंनीं पूर्वींच्या सात पिढ्यांपर्यंत शुद्ध असावा व त्याच्या 'जातीच्या शुद्धतेविषयीं कोणासही आक्षेप घेण्यास अथवा निंदा करण्यास जागा राहूं नये. तो अध्ययन करणारा, मंत्र म्हणणारा, निघंटु, केटुभ व अक्षरप्रभेद यांसहित तिन्ही वेद व इतिहास पांचवा यांचे अध्ययन केलेला, पदें व व्याकरण जाणणारा व लोकायत आणि महापुरुषलक्षणें यांमध्यें निष्णात असावा. तो सुरूप, देखणा, गंभीर असावा, त्याच्या शरीराची कांति फार सुंदर असावी, त्याचा वर्ण फार सुरेख असावा, तो तेजस्वी असावा, त्याजकडे पाहणारास आपण भाग्यवान आहोंत असें वाटावें. तो शीलयुक्त असावा, त्याचें शील फार उच्च दर्जाचें असावें. तो विद्वान, शहाणा व यज्ञ करणाऱ्यांमध्यें पहिला किंवा दुसरा असावा."

१४ "हे ब्राह्मणा, या पांच अंगांपैकीं एक अंग खेरीज करून बाकीच्या चार अंगांनीं युक्त असलेल्या मनुष्यास ब्राह्मण असें म्हणणें शक्य आहे कीं नाहीं व मी ब्राह्मण आहें असें जर तो म्हणेल तर तें खरें होईल, त्याजवर खोटेपणाचा आरोप येणार नाहीं, असें होईल कीं नाहीं ?"

"होय, गौतम, शक्य आहे. या पांच अंगांपैकीं वर्ण आपण बाजूस ठेवूं. कारण वर्णाचें काय काम ? जर तो ब्राह्मण माता व पिता या दोहोंबाजूंनीं पूर्वींच्या सात पिढ्यांपर्यंत शुद्ध असला व त्याच्या जातीच्या शुद्धतेविषयीं कोणासही आक्षेप घेण्यास अथवा निंदा करण्यास जागा नसली; जर तो अध्ययन करणारा, मंत्र म्हणणारा, निघंटु, कैटुभ व अक्षरप्रभेद यांसाहित तिन्ही वेद व इतिहास पांचवा यांचें अध्ययन

---

१ सुजं पग्गण्हन्तानं. 'यज्ञामध्यें पळीनें आहुती देणारे.'

२. हा शब्द नेहमीं जात या अर्थी वापरण्यांत येतो. ( दीघ ३·१·१५ पहा. ) परंतु येथें त्याचा अर्थ रंग ह्मणजे सौंदर्य असाच घेतला पाहिजे. जातींची उत्पत्तीही रंगवैचित्र्यापासूनच आहे हें स्पष्टच आहे. Vedic Index ii 247-270 येथील वर्णासंबंधीं विवेचन पहा.

केलेला, व्याकरण जाणणारा व लोकायत आणि महापुरुषलक्षणें यांमध्यें निष्णात असला; जर तो शीलयुक्त असला, त्याचें शील फार उच्च दर्जाचें असलें; जर तो विद्वान, शहाणा व यज्ञ करणाऱ्यांमध्यें पहिला किंवा दुसरा असला—या चार अंगांनीं जर तो युक्त असला तर ब्राह्मण त्याला ब्राह्मण असें म्हणतील व मी ब्राह्मण आहें असें जर तो म्हणेल तर तें खरें होईल, त्याजवर खोटेपणाचा आरोप येणार नाहीं."

१५ "पण, हे ब्राह्मणा, या चार अंगांपैकीं एक अंग खेरीज करून बाकीच्या तीन अंगांनीं युक्त असलेल्या मनुष्यास ब्राह्मण असें म्हणणें शक्य आहे कीं नाहीं व मी ब्राह्मण आहें असें जर तो म्हणेल तर तें खरें होईल, त्याजवर खोटेपणाचा आरोप येणार नाहीं असें होईल कीं नाहीं?"

"होय, गौतम, शक्य आहे. या चार अंगांपैकीं मंत्र आपण बाजूस ठेवूं. कारण मंत्रांचें काय काम? जर तो ब्राह्मण माता व पिता या दोहों-बाजूंनीं पूर्वीच्या सात पिढ्यांपर्यंत शुद्ध असल व त्याच्या जातीच्या शुद्धतेविषयीं कोणासही आक्षेप घेण्यास अथवा निंदा करण्यास जागा नसली; जर तो शीलयुक्त असला, त्याचें शील फार उच्च दर्जाचें असलें; जर तो विद्वान, शहाणा व यज्ञ करणाऱ्यांमध्यें पहिला किंवा दुसरा असला—या तीन अंगांनीं जर तो युक्त असला तर ब्राह्मण त्यास ब्राह्मण असें म्हणतील व मी ब्राह्मण आहें असें जर तो म्हणेल तर तें खरें होईल, त्याजवर खोटेपणाचा आरोप येणार नाहीं."

१६ "पण, हे ब्राह्मणा, या तीन अंगांपैकीं एक अंग खेरीज करून बाकीच्या दोन अंगांनीं युक्त असलेल्या मनुष्यास ब्राह्मण असें म्हणणें शक्य आहे कीं नाहीं व मी ब्राह्मण आहें असें जर तो म्हणेल तर तें खरें होईल, त्याजवर खोटेपणाचा आरोप येणार नाहीं असें होईल कीं नाहीं?"

"होय, गौतम. या तीन अंगांपैकीं जात आपण बाजूस ठेवूं. कारण जातीचें काय काम? जर तो ब्राह्मण शीलयुक्त असला, त्याचें शील फार उच्च दर्जाचें असलें व जर तो विद्वान, शहाणा व यज्ञ करणाऱ्यांमध्यें पहिला किंवा दुसरा असला—या दोन अंगांनीं जर तो युक्त असला

तर ब्राह्मण त्यास ब्राह्मण असें म्हणतील व मी ब्राह्मण आहें असें जर तो म्हणेल तर ते खरें होईल, त्याजवर खोटेपणाचा आरोप येणार नाहीं."

१७ असें सोणदण्ड ब्राह्मण बोलल्यावर ते ब्राह्मण त्यास म्हणाले, "सोणदण्डा, असें बोलूं नकोस! असें बोलूं नकोस! तूं केवळ वर्णाचीच हेटाळणी करीत आहेस असें नाहीं, तर त्याबरोबरच मंत्र व जात यांचीही हेटाळणी करीत आहेस. खरोखर तूं श्रमण गोतमाच्याच मताला दुजोरा देत आहेस."

१८ तेव्हां भगवान त्या ब्राह्मणांना म्हणाले, "ब्राह्मणांनों, जर तुम्हांस असें वाटत असेल कीं सोणदण्ड ब्राह्मण थोडें शिकलेला, वाईट बोलणारा, मूर्ख असून श्रमण गोतमाशीं या बाबतींत वादविवाद करण्यास योग्य नाहीं, तर त्याला स्वस्थ बसूं द्या व तुम्ही माझ्याशीं बोलावयास या. पण जर तुम्हांस असें वाटत असेल कीं सोणदण्ड ब्राह्मण पुष्कळ शिकलेला, चांगलें बोलणारा व शहाणा असून श्रमण गोतमाशीं या बाबतींत वादविवाद करण्यास योग्य आहे, तर तुम्ही स्वस्थ बसा व सोणदण्ड ब्राह्मणास माझ्याशीं बोलूं द्या."

१९ असें भगवान बोलल्यावर सोणदण्ड ब्राह्मण त्यांस म्हणाला, "गोतमा, थांब, स्वस्थ रहा. मीच नीट कारणें दाखवून त्यांचें समाधान करितों." असें बोलून त्या ब्राह्मणांकडे वळून सोणदण्ड ब्राह्मण म्हणाला, "आपण असें बोलूं नका, आपण असें म्हणूं नका कीं, 'सोणदण्ड ब्राह्मण केवळ वर्णाचीच हेटाळणी करीत आहे असें नाहीं, तर त्याबरोबरच मंत्र व जात यांचीही हेटाळणी करीत आहे व खरोखर श्रमण गोतमाच्याच मताला दुजोरा देत आहे.' मी वर्ण किंवा जात यांची हेटाळणी मुळींच करीत नाहीं."

२० त्यावेळीं सोणदण्ड ब्राह्मणाचा अंगक नांवाचा भाचा त्या मंडळींत बसला होता. तेव्हां सोणदण्ड ब्राह्मण त्या ब्राह्मणांस म्हणाला, "आपल्याला हा माझा भाचा अंगक दिसतो आहे ना?"

"होय."

" हा अंगक सुरूप, देखणा, गंभीर आहे, त्याच्या शरीराची कांती फार सुंदर आहे, त्याचा वर्ण फार सुरेख आहे, तो तेजस्वी आहे, त्याजकडे पाहणाऱ्यास आपण भाग्यवान आहों असेंच वाटेल. या मंडळींत श्रमण गौतमाशिवाय वर्णांत याची बरोबरी करणारा दुसरा कोणीही नाहीं. हा अंगक अध्ययन करणारा, मंत्र म्हणणारा, निघंटु, कैटुभ व अक्षरप्रभेद यांसहित तिन्ही वेद व इतिहास पांचवा यांचें अध्ययन केलेला, पदें व व्याकरण जाणणारा. व लोकायत आणि महापुरुषलक्षणें यांमध्यें निष्णात आहे. मीच याला मंत्र शिकवितों. हा अंगक माता व पिता या दोहोंबाजूंनीं पूर्वींच्या सात पिढ्यांपर्यंत शुद्ध आहे व त्याच्या जातीच्या शुद्धतेविषयीं कोणासही आक्षेप घेण्यास अथवा निंदा करण्यास जागा नाहीं. मला याचीं मातापितरें ठाऊक आहेत. जर हा अंगक प्राणघात करील अथवा चोरी करील अथवा परदारागमन करील अथवा खोटें बोलेल अथवा मद्य पिईल, तर तेथें वर्ण, मंत्र, जात काय करणार? ब्राह्मण जर शीलयुक्त असेल, त्याचें शील फार उच्च दर्जाचें असेल व जर तो विद्वान्, शहाणा व यज्ञ करणाऱ्यांमध्यें पहिला किंवा दुसरा असेल—या दोन अंगांनीं जर तो युक्त असेल तर ब्राम्हण त्याला ब्राह्मण असें म्हणतील व मी ब्राह्मण आहे असें जर तो म्हणेल तर तें खरें होईल, त्याजवर खोटेपणाचा आरोप येणार नाहीं."

२१ "पण, हे ब्राह्मणा, या दोन अंगांपैकीं एक अंग बाजूस ठेवून उरलेल्या एका अंगानें युक्त असलेल्या मनुष्यास ब्राह्मण असें म्हणणें शक्य आहे कीं नाहीं व मी ब्राह्मण आहें असें जर तो म्हणेल तर तें खरें होईल, त्याजवर खोटेपणाचा आरोप येणार नाहीं असें होईल कीं नाहीं?"

" नाहीं, गौतम. शीलानें प्रज्ञा परिशुद्ध होते व प्रज्ञेनें शील परिशुद्ध होतें. जेथें शील तेथें प्रज्ञा व जेथें प्रज्ञा तेथें शील. शीलवान पुरुषालाच प्रज्ञा प्राप्त होते व प्रज्ञावान पुरुषालाच शील प्राप्त होतें. शील व प्रज्ञा हींच या जगामध्यें श्रेष्ठ होत. ज्याप्रमाणें, गौतम, एका हातानें दुसरा हात किंवा एका पायानें दुसरा पाय धुवावा, त्याचप्रमाणें शीलानें प्रज्ञा परिशुद्ध

होते व प्रज्ञेनें शील परिशुद्ध होतें. जेथें शील तेथें प्रज्ञा व जेथें प्रज्ञा तेथें शील. शीलवान पुरुषालाच प्रज्ञा प्राप्त होते व प्रज्ञावान पुरुषालाच शील प्राप्त होतें. शील व प्रज्ञा हींच या जगामध्यें श्रेष्ठ होत. ''

२२ '' होय, ब्राह्मणा, असेंच आहे. शीलानें प्रज्ञा परिशुद्ध होते व प्रज्ञेनें शील परिशुद्ध होतें. जेथें शील तेथें प्रज्ञा व जेथें प्रज्ञा तेथें शील. शीलवान पुरुषालाच प्रज्ञा प्राप्त होते व प्रज्ञावान पुरुषाच शील प्राप्त होतें. शील व प्रज्ञा हींच या जगामध्यें श्रेष्ठ होत. परंतु, ब्राह्मणा, तें शील कोणतें व ती प्रज्ञा कोणती ? ''

'' गौतम, आम्हांला या बाबतींत एवढेंच माहिती आहे. आपणच या भाषणाचा अर्थ आम्हांस स्पष्ट करून सांगावा.''

२३ '' तर मग, ब्राह्मणा, ऐक. नीट श्रवण कर. [ सामञ्ञफलसुत्त ४०—६३ ]... हें शील होय. [ सामञ्ञफलसुत्त ७५—९८ ]...... ही प्रज्ञा होय. ''

२४ असें भगवान बोलल्यावर सोणदण्ड ब्राह्मण त्यांस म्हणाला, ''वाहवा, गौतम, वाहवा ! ज्याप्रमाणें, गौतम, एखाद्यानें उपडें झालेलें सुलटें ठेवावें, अथवा झांकलेलें उघडें करावें, अथवा वाट चुकलेल्यास मार्ग सांगावा, अथवा डोळस मनुष्यांना वस्तू दिसाव्या म्हणून अंधारांत तेलाचा दिवा दाखवावा, त्याप्रमाणें आपण अनेक तऱ्हांनीं धर्माचा उपदेश केलेला आहे. तर हा मी आपणास, धर्मास व भिक्षुसंघास शरण आलों आहें. शरण आलेल्या मला आजपासून मरेपर्यंत आपण उपासक समजावें, आणि उद्यां आपण भिक्षुसंघासह माझ्या येथें भोजनास यावें.''

भगवंतांनीं स्तब्ध राहून संमती दर्शविली. भगवंतांची संमती जाणून सोणदण्ड ब्राह्मण आसनावरून उठून प्रदक्षिणा करून निघून गेला व ती रात्र सरल्यावर घरीं उत्तम उत्तम खाद्यभोज्य पदार्थ तयार करून भगवंतांस बोलवावयास गेला व म्हणाला, '' गौतम, वेळ झाली, जेवण तयार आहे. ''

२५ नंतर भगवान सकाळींच वस्त्रपरिधान करून पात्र व चीवर घेऊन भिक्षुसंघासहित सोणदण्ड ब्राह्मणाच्या घरीं गेले व त्याज-

करितां घातलेल्या आसनावर बसले. नंतर सोणदण्ड ब्राह्मणानें भगवान बुद्ध व भिक्षुसंघ यांस उत्तम उत्तम खाद्यभोज्य पदार्थ आपल्या हातानें आग्रह करकरून वाढिले. भगवंतांचें जेवण होऊन त्यांनीं हात धुतल्यावर सोणदण्ड ब्राह्मण एके बाजूस लहानशा आसनावर बसून भगवंतांस म्हणाला,

२६ "गौतम, जर मी मंडळींत बसलों असतांना आसनावरून उठून आपणास वंदन करीन तर हे लोक माझी हेटाळणी करितील.[१] ज्याची हे लोक हेटाळणी करितील त्याचें यश कमी होणार, ज्याचें यश कमी होईल त्याची मिळकतही कमी होणार आणि माझी तर सर्व मिळकत यशावरच अवलंबून आहे. जर मी मंडळींत बसलों असतां आपणापुढें हात जोडिले, तर आसनावरून उठून आपणास वंदन केल्यासारखेंच आपण समजावें. जर मी मंडळींत बसलों असतां पागोटें काढलें, तर तें मीं डोकें वांकवून नमन केल्यासारखेंच आपण समजावें. जर मी रथांत बसलों असतां रथांतून उतरून आपणास वंदन करीन, तर हे लोक माझी हेटाळणी करितील. ज्याची हे लोक हेटाळणी करितील त्याचें यश कमी होणार, ज्याचें यश कमी होईल त्याची मिळकतही कमीच होणार आणि माझी तर सर्व मिळकत यशावरच अवलंबून आहे. तेव्हां रथांत बसलों असतां जर मीं चाबकाची काठी खालीं वांकविली, तर तें आपण मी खालीं उतरून आपणांस वंदन केल्यासारखेंच समजावें. जर मी रथांत बसलों असतां हात हालविला, तर तें आपण मी आपणापुढें डोकें वाकवून वंदन केल्यासारखेंच समजावें."

२७ नंतर भगवान सोणदण्ड ब्राह्मणाला धार्मिक उपदेशानें मार्ग दाखवून [ कुशल धर्म ], घेण्यास लावून, उत्साह आणून, आनंद देऊन आसनावरून उठून तेथून निघून गेले.

---

१. 'सोणदण्ड वृद्ध होता, परंतु गौतम अगदीं तरुण होता. तेव्हां नातवाप्रमाणें शोभणाऱ्या पोरास वंदन करणें म्हणजे आपली अगदींच मानहानी करून घेणें होतें' ( बुद्धघोष ).

# परिशिष्ट.

'ब्राह्मण कोणास म्हणावें' याविषयीं या सुत्तांत विचार केला आहे. सोणदण्डाच्या मतें जाति, मंत्र, वर्ण, शील व प्रज्ञा हीं पांच अंगें ब्राह्मण्यास आवश्यक आहेत. या पांच गोष्टींनीं युक्त असल्याशिवाय कोणासही ब्राह्मण म्हणतां यावयाचें नाहीं. यावर बुद्धांनीं आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें यांतील कोणतीं अंगें सोडून दिलीं असतां चालेल असे प्रश्न करून सोणदण्डाकडून असें कबूल करून घेतलें कीं वर्ण, मंत्र व जाति हीं तीन अंगें अगदीं आवश्यकच आहेत असें नाहीं. तीं असतील तर चांगलेंच, पण नसतील तर त्यांवांचून नडावयाचें नाहीं. याप्रमाणे हळूं हळूं एक एक स्वतःसिद्ध प्रमेय एकापुढें एक मांडून सोणदण्डाकडून हीं तीन अंगें अनवश्यक आहेत हें कबूल करून घेतल्यावर शील व प्रज्ञा यांनीं युक्त असलेल्या कोणाही मनुष्यास ब्राह्मण म्हणावें ही गोष्ट उघडच झाली व सोणदण्डाबरोबर आलेल्या ब्राह्मणांच्या मनांतील जात्यभिमानास जागा उरली नाहीं.

मनुष्य आपल्या कर्मानें ब्राह्मण होतो, जन्मानें नव्हें, हेंच बुद्धांस लोकांच्या मनांत ठसवावयाचें होतें. यासाठींच त्यांनीं ब्राह्मण ही संज्ञा अर्हत्पद प्राप्त करून

अंगुत्तर ३. ५८, ५९ येथें तिकण्ण व जानुस्सोणि या ब्राह्मणांनीं जाति व मंत्र हींच त्रैविद्य ब्राह्मणांचीं आवश्यक अंगें आहेत असें म्हटलें आहे. त्यावर बुद्धांनीं सांगितलें आहे कीं तीन विद्यांच्या योगेंच मनुष्य त्रैविद्य ब्राह्मण होतो.

अंगुत्तर ५. १९२ येथें दोण ब्राह्मण म्हणाला, 'गोतमा, तूं ब्राह्मणांना मान देत नाहींस हे खरें आहे काय ?' बुद्ध म्हणाले, 'तूं कोणास ब्राह्मण म्हणतोस ?' दोणानें उत्तर केलें, 'जाति व मंत्र यांनीं युक्त असलेल्या पुरुषास.' बुद्ध म्हणाले, 'माझ्या मतें ब्राह्मणांचे पांच भेद करितां येतील. १ ब्राह्मणसम—हा चांगल्या कुळांत जन्मलेला असून अठ्ठेचाळीस वर्षें कौमारब्रह्मचर्यानें राहून मंत्र शिकतो व तदनंतर प्रव्रज्या घेऊन ध्यानें व ब्रह्मविहार यांची भावना करितो. २ देवसम—हा पूर्वीच्या सारखाच असतो, परंतु फक्त ध्यानेंच प्राप्त करून घेतो. ३ मरियाद-हा मंत्र शिकल्यानंतर प्रव्रज्या न घेतां लग्न करून कुटुंबपोषण करितो. ४ संभिन्नमरियाद-हा मंत्र शिकल्यावर प्रव्रज्या न घेतां वाईट आचरणांत काल घालवितो. ५ ब्राह्मणचंडाल—हा मंत्र शिकल्यावर अधर्मानें गुरुदक्षणा देतो व वाईट आचरणांत काल घालवितो.

२ न जच्चा ब्राह्मणो होति न जच्चा होति अब्राह्मणो
कम्मुना ब्राह्मणो होति कम्मुना होति अब्राह्मणो । सुत्तनिपात ६५०
तपेन ब्रह्मचरियेन संयमेन दमेन च
एतेन ब्राह्मणा होति एतं ब्राह्मणमुत्तमं । सुत्तनिपात ६५५

घेतलेल्या श्रेष्ठ पुरुषास लाविली होती. खरा ब्राह्मण होण्यास कोणते गुण अंगीं आले पाहिजेत हें त्यांनीं सुत्तनिपातांतील वासेट्ठसुत्तांत ( = धम्मपद. ब्राह्मणवग्ग ३९६–४२३ ) सांगितलें आहे. त्याचप्रमाणें पूर्वी ब्राह्मण शुद्ध राहून आपलीं कर्मे योग्य रितीनें कशीं करीत असत, परंतु पुढें त्यांचा ऱ्हास होत जाऊन कामाच्या पाशांत सांपडल्यामुळें ते केवळ नांवाचे ब्राह्मण कसे राहिले हें त्यांनीं ब्राह्मणधम्मिकसुत्तांत दाखविलें आहे. यावरून हें उघड दिसून येईल कीं भगवंतांचा कटाक्ष ब्राह्मणजातीविरुद्ध नसून त्यांच्यांतील जे कोणी केवळ नांवाचे ब्राह्मण असून दुराचरणामध्यें काल घालवीत त्यांविरुद्ध होता.

वज्रसूचि या नांवाचें एक उपनिषद् आहे, त्यामध्यें ब्राह्मणाचें खरें लक्षण काय या प्रश्नाचा फार चांगल्या रितीनें विचार केला आहे. म्हणून त्यांतील मुद्दे पुढे देतों म्हणजे त्यांतील विचारसरणी व बुद्धाची विचारसरणी यांमध्यें किती विलक्षण साम्य आहे हें दिसून येईल.

'कशावरून ब्राह्मण ठरवावें? जीवावरून कीं देहावरून कीं जातीवरून कीं ज्ञानावरून कीं धार्मिक आचरणावरून? जीवावरून असेल तर सर्व जीव एकच आहे. केवळ कर्मानें त्यास निरनिराळे देह प्राप्त होतात; देहावरून म्हणावें तर सर्वांचे देह सारखेच पंचभूतांचे बनलेले आहेत व जरामरणही सर्वांच्या सारखेंच पाठीस लागलेलें आहे. शिवाय देह हाच मनुष्य समजला तर मृत पित्याचें शरीर दहन करणारा पुत्रही खुनी ठरेल. जर जातीवरून ठरवावें तर असें दिसून येईल कीं कित्येक ऋषींची उत्पत्ती निराळ्याच तऱ्हेनें झालेली आहे. उदाहरणार्थ, ऋष्यशृंग हा मृग होता, वाल्मीकि वल्मीकापासून उत्पन्न झाला होता, वसिष्ठ ऊर्वशीपासून झाला होता, अगस्त्याची उत्पत्ती तर कलशापासून झाली हें सर्वश्रुतच आहे. ज्ञानावरून ब्राह्मण्य ठरवावें तर क्षत्रियादि इतर जातींना परमार्थाचें ज्ञान होतें. कर्मामुळें ब्राह्मण होतो असें म्हणावें तर प्रारब्धसंचितादि गोष्टींमुळेंच जन कर्में करीत असतात. धार्मिक आचरणावरून म्हणावें तर क्षत्रियादिक हिरण्यदानें देणारे कित्येक तरी दृष्टीस पडतात. मग कोणास ब्राह्मण म्हणावें? तर सत्यज्ञानानन्दस्वरूप आत्म्याचा साक्षात्कार करून घेऊन जो कामरागादि दोषांपासून मुक्त व शमदमादींनीं संपन्न असा राहतो त्यासच ब्राह्मण ही संज्ञा योग्य होय. (यः कश्चिदात्मानमद्वितीयं जातिगुणक्रियाहीनं ...... सत्यज्ञानानन्दस्वरूपं ...... करतलामलकवत्साक्षादपरोक्षीकृत्य कृतार्थतया कामरागादिदोषरहितः शमदमादिसंपन्नो भावमात्सर्यतृष्णाशामोहादिरहितो दंभाहंकारादिभिरसस्पृष्टचेता वर्तत एवमुक्तलक्षणो यः स एव ब्राह्मणः ).

# ५ कूटदन्तसुत्त.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके समयीं भगवान [ बुद्ध ] पांचशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित मगध देशांत हिंडत असतां खाणुमत नांवाचें मगध देशांतील ब्राह्मणांचें गांव होतें तिकडे गेले व तेथें अंबलट्ठिका नांवाच्या उद्यानांत राहिले. त्या वेळीं कूटदन्त नांवाचा ब्राह्मण खाणुमतांत रहात होता. तें गांव माणसांनीं गजबजलेलें, तृण, काष्ठ, उदक व धान्य यांनीं परिपूर्ण व राजभोग्य असून मगध देशाचा राजा सेनिय बिंबिसार यानें राजदाय म्हणून ब्राह्मणास दान दिलें होतें. त्यावेळीं कूटदन्त ब्राह्मणाच्या येथें महायज्ञाची तयारी चालली होती व सातशें बैल, सातशें गोऱ्हे, सातशें कालवडी, सातशें बोकड व सातशें मेंढे यज्ञाकरितां खांबाशीं बांधून ठेविले होते.

२ खाणुमतांतील ब्राह्मण व गृहस्थ यांनीं ऐकिलें कीं, ' शाक्यपुत्र श्रमण गौतम शाक्यकुलांतून प्रव्रज्या घेण्याकरितां बाहेर पडून मगधदेशांत पांचशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित हिंडत असतां खाणुमतांत येऊन तेथें अंबलट्ठिका नांवाच्या उद्यानांत राहिला आहे. त्या भगवान् गौतमाची अशी कीर्ति पसरली आहे कीं अर्हत्, सम्यक्संबुद्ध, विद्या व आचरण यांनीं संपन्न, सुगत, सर्व लोक जाणणारा, सर्वश्रेष्ठ, दमन करण्यास योग्य अशा जनांचा मार्गदर्शक व देव आणि मनुष्य यांचा शास्ता असा भगवान् बुद्ध आहे. तो देवलोक, मारलोक व ब्रह्मलोक यांसहित हें जग व श्रमण आणि ब्राह्मण, देव आणि मनुष्य, यांसहित ही प्रजा स्वतः जाणून व पूर्णपणें ओळखून तें ज्ञान इतरांसही देतो व आरंभीं, मध्यें व शेवटींही कल्याणप्रद, सार्थ व सव्यंजन असा धर्म व अगदीं पूर्ण व शुद्ध असें श्रेष्ठ आचरण हीं स्पष्टपणें दाखवितो. अशा अर्हन्तांचें दर्शन घेणें चांगलें. ' तेव्हां ते खाणुमतांतील ब्राह्मण व गृहस्थ गांवांतून निघून निरनिराळे जमाव करून अंबलट्ठिका उद्यानाकडे गेले.

३ त्यावेळीं कूटदन्त ब्राह्मण दिवसा आपल्या वाड्याच्या गच्चीवर निजला होता. तेथून त्यानें खाणुमतांतील ब्राह्मण व गृहस्थ यांस गांवां-

तून निघून निरनिराळे जमाव करून अंबलट्ठिका उद्यानाकडे जातांना पाहिलें. तेव्हां त्यानें द्वारपालास बोलाविलें, [व विचारिलें] कीं, " द्वारपाला, हे खाणुमतांतील ब्राह्मण व गृहस्थ गांवांतून निघून निरनिराळे जमाव करून अंबलट्ठिका उद्यानाकडे कशाकरितां जात आहेत ? "

" शाक्यपुत्र श्रमण गौतम शाक्यकुलांतून प्रव्रज्या घेण्याकरितां बाहेर पडून मगधदेशांत पांचशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासहित हिंडत असतां खाणुमतांत येऊन तेथें अंबलट्ठिका उद्यानांत रहात आहे. त्या भगवान् गौतमाची अशी कीर्ति पसरली आहे कीं अर्हत्, सम्यक्संबुद्ध, विद्या व आचरण यांनीं संपन्न, सुगत, सर्व लोक जाणणारा, सर्वश्रेष्ठ, दमन करण्यास योग्य अशा जनांचा मार्गदर्शक व देव आणि मनुष्य यांचा शास्ता असा भगवान् बुद्ध आहे. त्या भगवान् गौतमाचें दर्शन घेण्याकरितां हे जात आहेत. "

४ तेव्हां कूटदन्त ब्राह्मणानें असा विचार केला कीं, 'मीं असें ऐकिलें आहे कीं श्रमण गौतमाला षोडषपरिष्कारयुक्त असे तीन प्रकारचे यज्ञ माहीत आहेत. मला ते माहीत नाहींत, परंतु महायज्ञ करण्याची तर मला फार इच्छा आहे. तर षोडषपरिष्कारयुक्त अशा तीन प्रकारच्या यज्ञांविषयीं श्रमण गौतमाला विचारावें.'

तेव्हां त्यानें द्वारपालास हाक मारून सांगितलें कीं, "तर मग, द्वारपाला, त्या खाणुमतांतील ब्राह्मण व गृहस्थांकडे जाऊन त्यांस सांग कीं कूटदन्त ब्राह्मणानें तुम्हांस असा निरोप पाठविला आहे कीं, जरा थांबा, मी सुद्धां श्रमण गौतमाच्या दर्शनास येत आहे. "

" ठीक आहे, " असें कूटदन्त ब्राह्मणास उत्तर देऊन तो द्वारपाल ते खाणुमतांतील ब्राह्मण व गृहस्थ यांजकडे गेला, व त्यांस म्हणाला, " कूटदन्त ब्राह्मणानें असें सांगितलें आहे कीं, जरा थांबा, मी सुद्धां श्रमण गौतमाच्या दर्शनास येत आहें. "

५ त्यावेळीं कूटदन्त ब्राह्मणाचा महायज्ञ पाहण्यासाठीं शेंकडों ब्राह्मण खाणुमतांत रहात होते. त्या ब्राह्मणांनीं ऐकिलें कीं, कूटदन्त ब्राह्मण

श्रमण गौतमाच्या दर्शनास जात आहे. तेव्हां ते ब्राह्मण कूटदन्त ब्राह्म-णाकडे जाऊन त्यास म्हणाले, " खरोखरीच आपण श्रमण गौतमाच्या दर्शनास जात आहां काय ? "

" होय, मलाही श्रमण गौतमाच्या दर्शनास जावेंसें वाटतें. "

६ " आपण श्रमण गौतमाच्या दर्शनास जाऊं नये. त्याच्या दर्शनास जाणें आपणास योग्य नाहीं. जर आपण श्रमण गौतमाच्या दर्शनास गेलां तर आपलें यश कमी होऊन श्रमण गौतमाचें यश वाढेल, आणि असें होईल म्हणूनच आपण श्रमण गौतमाच्या दर्शनास जाऊं नये. [ वगैरे सोणदण्डसुत्त ५ याप्रमाणें ]. श्रमण गौतमानेंच आपल्या दर्श-नास येणें योग्य आहे. "

७ असें ते ब्राह्मण बोलल्यावर कूटदन्त ब्राह्मण त्यांस म्हणाला, " आतां माझेंही भाषण ऐकून घ्या व मींच श्रमण गौतमाच्या दर्शनास कां जावें व त्यानें माझ्या दर्शनास कां येऊं नये हें समजून घ्या. [ सोण-दण्डसुत्त ६ याप्रमाणें ]. भगवान गौतमाचे गुण अपरिमित आहेत. "

८ असें कूटदन्त ब्राह्मण बोलल्यावर ते ब्राह्मण त्यास म्हणाले, " आपण म्हणतां तसे जर श्रमण गौतमाचे गुण असतील तर शंभर यो-जनें जरी तो दूर असला तरी खांद्यावर शिदोरी घेऊन श्रद्धावान् कुलपुत्रानें त्याच्या दर्शनास गेलें पाहिजे. तर चला, सर्वजण त्या श्रमण गौतमाच्या दर्शनास जाऊं या. "

तेव्हां कूटदन्त ब्राह्मण ब्राह्मणांच्या मोठ्या समुदायासहित अंबल-ट्ठिका उद्यानांत भगवंतांकडे गेला व त्यांस कुशलप्रश्न विचारून एका बाजूस बसला खाणुमतांतील ब्राह्मण व गृहस्थ यांपैकीं कांहीं भगवंतांस नमस्कार करून एके बाजूस बसले, कांहीं त्यांस कुशल प्रश्नादिक वि-चारून एके बाजूस बसले, कांहीं आपलें नांव व गोत्र सांगून त्यांच्यापुढें बसले, व कांहीं मुळींच न बोलतां एक बाजूस बसले.

९ एका बाजूस बसून कूटदन्त ब्राह्मण भगवंतांस म्हणाला, " गौतम, मीं असें ऐकिलें आहे कीं, आपणास षोडशपरिष्कारयुक्त असे तीन प्रका-

रचे यज्ञ माहीत आहेत. मला ते माहीत नाहींत, परंतु महायज्ञ करण्याची तर मला फार इच्छा आहे. तर षोडशपरिष्कारयुक्त असे हे तीन यज्ञ आपण मला सांगावे. "

१० " हे ब्राह्मणा, प्राचीनकालीं महाविजित नांवाचा एक राजा होऊन गेला. तो श्रीमान् असून त्याजजवळ धनसंपत्ति, सोनेंरुपें, हिरेमाणेकं, धनधान्य, यांची समृद्धि होती व त्याच्या तिजोऱ्या व कोठारें नेहमीं भरलेलीं असत. तो महाविजित राजा एकदां एकांतांत असतां त्याच्या मनांत असा विचार आला कीं, ' मी पुष्कळ मनुष्यभोग्य सुखांचा उपभोग घेतला आहे व ही मोठी पृथ्वी सर्व जिंकून राहिलों आहें. तर आतां महायज्ञ करावा म्हणजे तें चिरकाल माझ्या हितास व सुखास कारण होईल. '

"तेव्हां, हे ब्राह्मणा, त्या महाविजित राजानें आपल्या पुरोहित ब्राह्मणास बोलावून त्यास म्हटलें, 'हे ब्राह्मणा, मी एकांतांत असतां माझ्या मनांत असा विचार आला कीं, ' मीं पुष्कळ मनुष्यभोग्य सुखांचा उपभोग घेतला आहे व ही मोठी पृथ्वी सर्व जिंकून राहिलों आहें. तर आतां महायज्ञ करावा म्हणजे तें चिरकाल माझ्या हितास व सुखास कारण होईल. ' हे ब्राह्मणा, महायज्ञ करण्याची माझी इच्छा आहे. तो कोणत्या रितीनें केला असतां चिरकाल माझ्या हितास व सुखास कारण होईल तें सांगा. '

११ " असें महाविजित राजा बोलल्यावर पुरोहित ब्राह्मण त्यास म्हणाला. 'महाराजांच्या राज्यांत अद्याप चोऱ्यामाऱ्या व उपद्रव आहे. गांवांवर, नगरांवर व रस्त्यांवर अद्याप दरवडे पडतात. अशा तऱ्हेचा उपद्रव असतां महाराज जर कर बसवितील तर महाराजांनीं त्यांचें अहित केल्यासारखें होईल. कदाचित् महाराजांच्या मनांत येईल कीं, वध, बंधन, हानि, निंदा, हकालपट्टी वगैरे उपायांनीं त्या चोरांचा हा उपद्रव बंद

---

१. पहूतवित्तूपकरणो. ' पहूतं नानाविधालंकारसुवण्णरजतभाजनादिभेदं वित्तूपकरणं अस्स ' ( बुद्धघोष ). वित्तूपकरण म्हणजे वित्त उत्पन्न करण्याचीं साधनें असाही अर्थ घेतां येईल. २. दस्सुखीलो.

पाडतां येईल. परंतु अशा रितीनें या उपद्रवाचा बंदोबस्त व्हावयाचा नाहीं. या शिक्षेंतून जे सुटतील, ते नंतर महाराजांच्या प्रजेस त्रास देतील. हा उपद्रव बंद करण्याचा खरा उपाय म्हटला म्हणजे महाराजांच्या राज्यांत शेती व गोरक्षा करणारे जे लोक आहेत त्यांना महाराजांनीं बीं व अन्न पुरवावें, जे व्यापार करूं इच्छितील त्यांस भांडवल द्यावें, जे महाराजांची नोकरी करूं इच्छितील त्यांस अन्न व वेतन द्यावें, म्हणजे ते ते लोक आपलीं कर्मे करीत राहून राज्यास त्रास देणार नाहींत. महाराजांचा वसूलही पुष्कळ वाढेल, राज्यांत शांतता होऊन चोऱ्यामाऱ्या इत्यादि त्रास नाहींसा होईल व सर्व लोक आनंदांत राहून छातींवर मुलें खेळवीत दरवाजे [ निर्भयपणें ] उघडे ठेवून कालक्रमणा कारितील.[1]'

" 'ठीक आहे,' असें पुरोहित ब्राह्मणास उत्तर देऊन महाविजित राजानें शेती व गोरक्षा करणाऱ्यांस बीं व अन्न पुरविलें, व्यापार करूं इच्छिणाऱ्यांस भांडवल दिलें, नोकरी करूं इच्छिणाऱ्यांस अन्न व वेतन दिलें. तेव्हां ते ते आपआपलीं कर्मे करीत राहून राज्यास त्रास देईनासे झाले, राज्याचा वसूलही पुष्कळ वाढला व राज्यांत शांतता होऊन चोऱ्यामाऱ्या इत्यादि त्रास नाहींसा होऊन सर्व लोक आनंदांत राहून छातीवर मुलें खेळवीत दरवाजे [ निर्भयपणें ] उघडे ठेवून कालक्रमणा करूं लागले.

१२ " तेव्हां, हे ब्राह्मणा, महाविजित राजानें पुरोहित ब्राह्मणास बोलावून त्यास म्हटलें, ' चोरांचा सर्व त्रास नाहींसा झाला आहे, तुमच्या म्हणण्याप्रमाणें वसूलही पुष्कळ वाढला आहे व राज्यांत शांतता होऊन चोऱ्यामाऱ्या इत्यादि त्रास नाहींसा होऊन सर्व लोक आनंदांत राहून छातीवर मुलें खेळवीत दरवाजे [ निर्भयपणें ] उघडे ठेवून कालक्रमणा करीत आहेत. तेव्हां आतां महायज्ञ करण्याची माझी इच्छा आहे. तो कोणत्या रितीनें केला असतां चिरकाल माझ्या हितास व सुखास कारण होईल तें सांगा. '

" ' तर मग, महाराज, आपल्या राज्यांत जे शहरांतील व प्रांतांतील नेमिलेले क्षत्रिय अधिकारी, परिषदेंतील अमात्य, श्रीमंत ब्राह्मण आणि

१ उरे पुत्ते नच्चेन्ता अपारुतघरा मञ्ञे विहरिस्सन्ति.

धनाढ्य सावकार रहात असतील त्यांना बोलावून सांगावें कीं, महायज्ञ करण्याची माझी इच्छा आहे. तो कोणत्या रितीनें केला असतां चिरकाल माझ्या हितास व सुखास कारण होईल, तें सांगा. '

" ' ठीक आहे, ' असें पुरोहित ब्राह्मणास उत्तर देऊन महाविजित राजानें त्या सर्वांस बोलावून आणून त्यांस आपला विचार कळविला. तेव्हां ते म्हणाले, ' महाराजांनीं यज्ञ करावा. हा यज्ञाला योग्य काळ आहे. ' याप्रमाणें हे चार प्रकारचे राजास अनुमती देणारे लोक त्या यज्ञाचे परिष्कार होत.

१३ " महाविजित राजा आठ अंगांनीं संपन्न होता. तो माता व पिता या दोहों बाजूंनीं पूर्वींच्या सात पिढ्यांपर्यंत शुद्ध होता व त्याच्या जातीच्या शुद्धतेविषयीं कोणींही आक्षेप घेतला नव्हता किंवा निंदा केली नव्हती. तो सुरूप, देखणा व गंभीर होता, त्याच्या शरीराची कांति फार सुंदर होती, त्याचा वर्ण फार सुरेख होता, तो तेजस्वी होता. त्याला पहाणाराचें खरोखरीच भाग्य होतें. तो श्रीमान् असून त्याच्याजवळ धनसंपत्ती, सोनेंरुपें, हिरेमाणकें, धनधान्य, यांची समृद्धि होती व त्याच्या तिजोऱ्या व कोठारें नेहमीं भरलेलीं असत. तो बलवान् असून आज्ञाधारक व सांगितलेलें ऐकणाऱ्या चतुरंगिनी सेनेनें युक्त होता व शत्रूंना आपल्या तेजानें जणू कायं जाळीत होता. तो श्रद्धायुक्त, दायक, दानपति असून त्याच्या घराचीं दारें नेहमी उघडीं असत व श्रमण, ब्राह्मण, गरीब, वाटसरू, भिकारी व याचक यांना तो एका झऱ्याच होता. अशा तऱ्हेनें तो पुण्यकर्मे करीत असे. तो प्रत्येक विद्येंत पारंगत होता. ' या भाषणाचा अर्थ हा, या भाषणाचा हा, ' अशा तऱ्हेनें त्यास प्रत्येक भाषणाचा अर्थ कळत असे. तो विद्वान्, तीक्ष्ण बुद्धीचा व शहाणा असून त्यास भूत, भविष्य व हल्लींच्या सर्व गोष्टी कळत असत. या आठ अंगांनीं महाविजित राजा युक्त होता. तेव्हां हीं आठ अंगें त्या यज्ञाचे परिष्कार होत.

१. पतपति मञ्ञे पच्चत्थिके यससा. २. ओपानभूतो, ' उदपानभूतो, सब्बेसं साधारणपरिभोगो, चतुमहापथे खनितपोक्खरणी विय हुत्वा ' ( बुद्धघोष ).

१४ " पुरोहित ब्राह्मण चार अंगांनीं युक्त होता. तो माता व पिता या दोहों बाजूंनीं पूर्वींच्या सात पिढ्यांपर्यंत शुद्ध होता व त्याच्या जातीच्या शुद्धतेविषयीं कोणींही आक्षेप घेतला नव्हता किंवा निंदा केली नव्हती. तो अध्ययन करणारा, मंत्र म्हणणारा, निघंटु, कैटुभ व अक्षरप्रभेद यांसहित तिन्ही वेद व इतिहास पांचवा यांचें अध्ययन केलेला, पदें व व्याकरण जाणणारा व लोकायत आणि महापुरुषलक्षणें यांमध्यें निष्णात होता. तो शीलयुक्त होता, त्याचें शील फार उच्च दर्जाचें होतें. तो विद्वान्, तीक्ष्ण बुद्धीचा, शहाणा व यज्ञ करणाऱ्यांमध्यें पहिला किंवा दुसरा होता. या चार अंगांनीं पुरोहित ब्राह्मण युक्त होता. तेव्हां हीं चार अंगें त्या यज्ञाचे परिष्कार होत.

१५ " नंतर, ब्राह्मणा, पुरोहित ब्राह्मणानें महाविजित राजास यज्ञाच्या पूर्वीं तीन तऱ्हा[1] समजावून सांगितल्या. 'कदाचित् महायज्ञ करण्यापूर्वीं महाराजांच्या मनांत असा विचार येईल कीं, माझें पुष्कळ धन या यज्ञांत जाईल. अशा तऱ्हेचा विचार महाराजांनीं मनांत आणूं नये. कदाचित् महायज्ञ करितांना महाराजांच्या मनांत असा विचार येईल कीं, माझें पुष्कळ धन या यज्ञांत जात आहे. असा विचार महाराजांनीं मनांत आणूं नये. कदाचित् महायज्ञ संपल्यावर महाराजांच्या मनांत असा विचार येईल कीं, माझें पुष्कळ धन या यज्ञांत गेलें. अशा तऱ्हेचा पश्चात्ताप महाराजांनीं करूं नये. अशा रीतीनें पुरोहित ब्राह्मणानें महाविजित राजास यज्ञाच्या पूर्वीं तीन तऱ्हा समजावून सांगितल्या.

---

१ सुत्तनिपात ( माघसुत ) येथें बुद्धांनीं माघ ब्राह्मणास पुढील उत्तर दिलें आहे.

यो यजति तिविधं यञ्ञसंपदं
माघाऽति भगवा
आराधये दक्खिणेय्येहि तादि
एवं यजित्वा सम्मा याचयोगो
उपपज्जति ब्रह्मलोकंऽति ब्रूमि । ५०९

त्यापूर्वींच्या गाथांवरून ( ५०६–७ ) राग व द्वेष सोडून देणें व मैत्रीभावना करणें या यज्ञाच्या तीन तऱ्हा तेथें मानिल्या असाव्या असें दिसतें.

१६ " नंतर पुरोहित ब्राह्मण महाविजित राजाच्या मनांत यज्ञाच्या पूर्वीं यज्ञांत काम करणाऱ्यांविषयीं उत्पन्न होणारा पश्चात्ताप घालविण्याकरितां म्हणाला, ' यज्ञांत प्राणातिपात करणारे व त्यापासून विरत असणारे, चोरी करणारे व त्यापासून विरत असणारे, व्यभिचारी व व्यभिचारापासून विरत असणारे, असत्यभाषण करणारे व त्यापासून विरत असणारे, चहाडी करणारे व त्यापासून विरत असणारे, कठोर भाषण करणारे व त्यापासून विरत असणारे, व्यर्थ बडबड करणारे व त्यापासून विरत असणारे, लोभी व लोभापासून विरत असणारे, रागीट व क्रोधापासून विरत असणारे, मिथ्यादृष्टिक व सम्यग्दृष्टिक असे [ दोन्ही प्रकारचे लोक ] येतील. त्यांत जे प्राणातिपात वगैरे वाईट कर्मांपासून विरत झालेले असतील, त्यांजकरितां यज्ञ करून महाराजांनीं आनंद मानावा म्हणजे महाराजांच्या हृदयास शांति मिळेल. '

या दहा प्रकारांनीं पुरोहित ब्राह्मणानें यज्ञाच्या पूर्वीं महाविजित राजाच्या मनांतील यज्ञांत काम करणाऱ्यांविषयीं उत्पन्न होणारा पश्चात्ताप घालविला.

१७ " नंतर, हे ब्राह्मणा, यज्ञ चालू असतां पुरोहित ब्राह्मणानें महाविजित राजाच्या चित्तास पुढील सोळा प्रकारांनीं उपदेश केला, वळण लाविलें, उत्तेजन दिलें, आनंद दिला. ' महाराज यज्ञ करीत असतां कोणी असें म्हणेल कीं, ' महाविजित राजा महायज्ञ करितो आहे, परंतु त्यानें नगरांतील व प्रांतांतील नेमिलेले क्षत्रिय अधिकारी, परिषदेंतील श्रीमंत अमात्य, ब्राह्मण व धनाढ्य सावकार यांना बोलाविलें नाहीं; तो जातीनें शुद्ध, सुंदर, श्रीमान, बलवान, श्रद्धायुक्त, बहुश्रुत, भाषणाचा अर्थ जाणणारा व शहाणा नाहीं; त्याचा ब्राह्मण पुरोहित जातीनें शुद्ध, मंत्र म्हणणारा, शीलवान् व पण्डित नाहीं; आणि तरी हा राजा यज्ञ करितोच आहे. ' परंतु असें बोलणाऱ्याचें भाषण खरें असणार नाहीं. कारण महाराजांनीं चारी तऱ्हेच्या लोकांस बोलाविलें आहे, महाराजांच्या अंगीं आठ गुण आहेत, पुरोहित ब्राह्मणाच्या ठिकाणींही चार गुण आहेत. तेव्हां महाराजांनीं यज्ञ करून आनंद मानावा, म्हणजे महाराजांच्या हृदयास

शांती मिळेल.' या सोळा प्रकारांनीं पुरोहित ब्राह्मणानें यज्ञ चालू असतां महाविजित राजाच्या चित्तास उपदेश केला, वळण लाविलें, उत्तेजन दिलें, आनंद दिला.

१८ "हे ब्राह्मणा, त्या यज्ञांत गाई, बकरे, मेंढे, कोंबडीं, डुकरें व इतर कोणत्याही प्रकारचे प्राणी मारण्यांत आले नाहींत, यूपांकरितां झाडें तोडण्यांत आलीं नाहींत, बर्हिसांकरितां[1] दर्भ तोडण्यांत आले नाहींत. जे दास, मजूर, नोकर होते, त्यांना दंड, भय वगैरे कांहीं झालें नाहीं. त्यांनीं आपलीं कामें अश्रू गाळीत, रडत केलीं नाहींत. ज्यांना वाटलें त्यांनीं कामें केलीं, ज्यांना करूं नये तें वाटलें त्यांनीं केलीं नाहींत, जीं वाटलीं तीं केलीं, जीं करूं नयेशीं वाटलीं तीं केलीं नाहींत. तूप, तेल, लोणी, दहीं, मध आणि गूळ एवढ्या पदार्थांनींच तो यज्ञ परिपूर्ण करण्यांत आला.

१९ "तेव्हां, ब्राह्मणा, नगरांत व राज्यांत नेमिलेले क्षत्रिय, अमात्य व सभासद, मोठमोठे ब्राह्मण व धनाढ्य गृहस्थ पुष्कळ धन बरोबर घेऊन महाविजित राजाकडे येऊन त्यास म्हणाले, 'हें सर्व धन[2] आपणाकरितांच आणिलें आहे, तें आपण घ्यावें.' 'नको. माझें हें धनही योग्य मार्गानें कराच्या रूपानें सांठलें आहे. तुमचें तुम्हांलाच असूंद्या व आणखीही पाहिजे तर घेऊन जा.' याप्रमाणें राजानें नाहीं म्हटल्यावर त्यांनीं एका बाजूस जाऊन आपसांत ठरविलें कीं, 'हें धन आपण परत घरीं न्यावें हें योग्य नाहीं. महाविजित राजा महायज्ञ करीत आहे, तर आपणही याच्यामागून यज्ञ करूं.'

२० "नंतर, हे ब्राह्मणा, यज्ञकुंडाच्या पूर्वेस नगरांत व राज्यांत नेमिलेल्या क्षत्रियांनीं, दक्षिणेस अमात्य व सभासद यांनीं, पश्चिमेस मोठमोठ्या ब्राह्मणांनीं व उत्तरेस धनाढ्य गृहस्थांनीं अशीं दानें स्थापिलीं. त्यांच्याही यज्ञांत गाई, बकरे, मेंढे, कोंबडीं, डुकरें व इतर कोणत्याही प्रकारचे प्राणी मारण्यांत आले नाहींत, यूपांकरितां झाडें तोडण्यांत आलीं नाहींत, बर्हिसांकरितां दर्भ तोडण्यांत आले नाहींत. जे दास, मजूर,

---

१. वेदीवर पसरलेलें कुश गवत. २. सापतेय्य.

नोकर होते त्यांना दंड, भय वगैरे कांहीं झालें नाहीं. त्यांनीं आपलीं कामें अश्रू गाळीत, रडत केलीं नाहींत. ज्यांना वाटलें त्यांनीं कामें केलीं, ज्यांना करूं नयेसें वाटलें त्यांनीं केलीं नाहींत, जीं वाटलीं तीं केलीं, जीं करूं नयेशीं वाटलीं तीं केलीं नाहींत. तूप, तेल, लोणी, दहीं, मध आणि गूळ एवढ्या पदार्थांनींच तो यज्ञ परिपूर्ण करण्यांत आला.

" याप्रमाणें राजास अनुमती देणारे चार प्रकारचे लोक होते, महाविजित राजा आठ अंगांनीं युक्त होता, त्याचा पुरोहित ब्राह्मण चार अंगांनीं युक्त होता, आणि यज्ञाचे तीन प्रकार होते. हे ब्राह्मणा, अशा प्रकारच्या यज्ञास त्रिविध षोडषपरिष्कारयुक्त यज्ञ असें म्हणतात. "

२१ असें [ भगवान् ] बोलल्यावर ते ब्राह्मण आनंदानें उच्च स्वरानें उद्गारले, ' वा ! किती चांगला यज्ञ ! काय ही यज्ञसंपदा ! ' परंतु कूटदन्त ब्राह्मण स्तब्धच बसला होता. तेव्हां ते ब्राह्मण कूटदन्त ब्राह्मणाला म्हणाले, "आपण कां श्रमण गौतमाच्या म्हणण्यास अनुमोदन देत नाहीं?"

"मी अनुमोदन देत नाहीं असें नाहीं. जो श्रमण गौतमाच्या म्हणण्यास अनुमोदन देणार नाहीं त्याच्या डोक्याचे तुकडे होतील. परंतु माझ्या मनांत असा विचार आला कीं, श्रमण गौतम ' मीं असें ऐकिलें, ' किंवा ' असें असलें पाहिजे, ' वगैरे कांहीं न म्हणतां ' असें त्या वेळीं घडलें, ' ' याप्रमाणें त्यावेळीं घडलें, ' असें म्हणतो. तेव्हां मला असें वाटलें कीं श्रमण गौतम त्यावेळीं यज्ञाचा स्वामी महाविजित राजा अथवा यज्ञ चालविणारा त्याचा पुरोहित ब्राह्मण असावा. तर अशा तऱ्हेचा यज्ञ करून किंवा करवून मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर मनुष्य सुगतीस, स्वर्गलोकास जातो असें आपलें म्हणणें आहे काय ? "

" होय, ब्राह्मणा, अशा तऱ्हेचा यज्ञ करून किंवा करवून मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर मनुष्य सुगतीस, स्वर्गलोकास जातो असें माझें म्हणणें आहे. त्यावेळीं मी यज्ञ चालविणारा पुरोहित ब्राह्मण होतों. "

२२ " गौतम, या त्रिविध षोडषपरिष्कारयुक्त यज्ञसंपदेहून अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा, अधिक फायदेशीर असा एखादा यज्ञ आहे काय ? "

" होय, ब्राह्मणा. "

" तो कोणता, गौतम ? "

" प्रत्येक कुलामध्यें जीं नित्यदानें शीलवान् प्रव्रजितांना उद्देशून दिलीं जातात तीं. हा यज्ञ, ब्राह्मणा, त्रिविध षोडषपरिष्कारयुक्त यज्ञ-संपदेहून अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा, अधिक फायदेशीर आहे. "

२३ " याचा हेतु, याचें कारण काय, गौतम ? "

" ब्राह्मणा, अशा यज्ञाला अर्हन्त किंवा अर्हन्मार्गातील पुरुष येत नाहींत. कारण तेथें ब्राह्मण काठ्यांनीं मारामाऱ्या करितांना व एकमेकांचे गळे दाबतांना आढळून येतात. म्हणून ते अशा यज्ञाला येत नाहींत. परंतु जेथें नित्यदानें शीलवान् प्रव्रजितांना उद्देशून दिलीं जातात तेथें ते येतात, कारण तेथें ब्राह्मण काठ्यांनीं मारामाऱ्या करितांना व एकमेकांचे गळे दाबतांना आढळून येत नाहींत. म्हणून अशा प्रकारच्या यज्ञास ते येतात, आणि म्हणून हा यज्ञ पूर्वींच्या पेक्षां अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा व अधिक फायदेशीर होय. "

२४ " परंतु, गौतम, त्रिविध व षोडषपरिष्कारयुक्त यज्ञसंपदा व नित्यदानरूपी यज्ञ यांहून अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा व अधिक फायदेशीर असा एखादा यज्ञ आहे काय ? "

" होय, ब्राह्मणा. "

" तो कोणता, गौतम ? "

" चारी दिशांहून येणाऱ्या भिक्षुसंघाकरितां विहार बांधणें, ब्राह्मणा. हा यज्ञ त्रिविध व षोडषपरिष्कारयुक्त यज्ञसंपदा व नित्यदानरूपी यज्ञ यांहून अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा व अधिक फायदेशीर आहे "

---

१ संयुत्त ३·१·९ यावरील बुद्धघोषाचार्यांची टीका. 'अनुकुलेसु यजन्ति । यं निच्चभत्तादिं पुब्बपुरिसेहि पट्ठपितं अपरापरं अनुपच्छिन्नत्ता मनुस्सा ददन्तीऽति अत्थो.' अंगुत्तर ४. ३९, ४० यावरही अशीच टीका आहे. Rhys Davids ही kept up in a family असाच अर्थ करितात. परंतु प्रत्येक ठिकाणीं पाठ 'अनुकूलयञ्ञानि' असा आहे. त्यावरून 'यज्ञास अनुकूल' असा अर्थ करावा असें वाटतें.

२५ " परंतु, गौतम, त्रिविध व षोडषपरिष्कारयुक्त यज्ञ, नित्यदानें व विहार बांधणें यांहून अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा व आधिक फायदेशीर असा एखादा यज्ञ आहे काय ? "

" होय, ब्राह्मणा. "

" तो कोणता, गौतम ? "

" प्रसन्न चित्तानें बुद्ध, धर्म व संघ यांस शरण जाणें, ब्राह्मणा. हा यज्ञ त्रिविध व षोडषरिष्कारयुक्त यज्ञसंपदा, नित्यदानरूपी यज्ञ व विहारदान यांहून अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा, अधिक फायदेशीर आहे. "

२६ " परंतु, गौतम, त्रिविध व षोडषपरिष्कारयुक्त यज्ञ, नित्यदानरूपी यज्ञ, विहारदान व [ बुद्ध, धर्म आणि संघ यांस ] शरण जाणें यांहून अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा, अधिक फायदेशीर असा एखादा यज्ञ आहे काय ? "

" होय, ब्राह्मणा. "

" तो कोणता, गौतम ? "

" प्रसन्न चित्तानें शिक्षापदें पाळणें. [तीं शिक्षापदें म्हणजे] प्राणघातापासून विरति, चौर्यकर्मापासून विरति, व्यभिचारापासून विरति, असत्यभाषणापासून विरति, व सुरा, मैरेय, मद्य या प्रमादस्थानांपासून विरति. ब्राह्मणा, हा यज्ञ त्रिविध व षोडषपरिष्कारयुक्त यज्ञसंपदा, नित्यदानरूपी यज्ञ, विहारदान [ व बुद्ध, धर्म आणि संघ यांस ] शरण जाणें यांहून अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा, अधिक फायदेशीर आहे."

२७ " परंतु, गौतम, त्रिविध व षोडषपरिष्कारयुक्त यज्ञ, नित्यदानरूपी यज्ञ, विहारदान, [बुद्ध, धर्म आणि संघ यांस] शरण जाणें व शिक्षापदें पाळणें यांहून अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा, अधिक फायदेशीर असा एखादा यज्ञ आहे काय ? "

" होय, ब्राह्मणा. "

" तो कोणता, गौतम ? "

" ब्राह्मणा, अर्हत्, सम्यक्संबुद्ध ........[ सामञ्ञफलसुत्त ४०-९८ याप्रमाणें ]. ब्राह्मणा, हा यज्ञ पूर्वीच्या यज्ञांपेक्षां अधिक सोपा, कमी त्रासदायक, अधिक फल देणारा, अधिक फायदेशीर होय. या यज्ञसंपदेहून अधिक चांगली व श्रेष्ठ अशी यज्ञसंपदा नाहीं. "

२८ असें भगवान् बोलल्यावर कूटदन्त ब्राह्मण त्यांस म्हणाला, " वाहवा ! गौतम, वाहवा ! ज्याप्रमाणें, गौतम, एखाद्यानें उपडें झालेलें सुलटें करावें अथवा झांकलेलें उघडें करावें, अथवा वाट चुकलेल्यास मार्ग सांगावा अथवा डोळस मनुष्यांना वस्तू दिसाव्या म्हणूनं अंधारांत तेलाचा दिवा दाखवावा, त्याप्रमाणें आपण अनेक प्रकारांनीं धर्माचा उपदेश केला आहे. तर हा मी आपणास, धर्मास व भिक्षुसंघास शरण जातों. शरण आलेल्या मला आपण आजपासून मरेपर्यंत उपासक समजावें. गौतम, हे सातशें बैल, सातशें गोऱ्हे, सातशें कालवडी, सातशें बकरे व सातशें मेंढे यांस मी मोकळे सोडतों. त्यांना जीवदान देतों. हिरवें गवत खाऊन व थंडगार पाणी पिऊन शीतल हवेमध्यें ते आनंदानें विहार करोत. "

२९ नंतर भगवंतांनीं कूटदन्त ब्राह्मणाला ओळीनें पुढील गोष्टी सांगितल्या, त्या येणेंप्रमाणें:—दान, शील, स्वर्ग यांविषयींच्या कथा, कामांमधील भय, तुच्छता, संक्लेष व नैष्काम्यांतील फायदाही सांगितला. जेव्हां भगवतांनीं जाणिलें कीं कूटदन्त ब्राह्मणाचें चित्त तयार झालें आहे, मृदु झालें आहे, त्यावरील पडदा दूर सरला आहे व तो आनंदित व प्रसन्न झाला आहे, तेव्हां बुद्धांचा उपदेश—दुःख, त्याचें कारण, त्याचा विनाश व त्याच्या विनाशाचा मार्ग—त्यांनीं त्यास सांगितला. ज्यावर एकही काळा डाग नाहीं अशा वस्त्रावर ज्याप्रमाणें ताबडतोब रंग बसूं शकतो, त्याप्रमाणें कूटदन्त ब्राह्मणाला त्याच आसनावर शुद्ध, मलविरहित अशा धर्मचक्षूचा लाभ झाला व जें जें उत्पन्न झालें आहे त्याला त्याला विनाश आहे हें त्यास कळलें.

३० तेव्हां कूटदन्त ब्राह्मणाला धर्म दिसला, मिळाला, कळला, पूर्ण समजला, सर्व शंका नाहींशी झाली, घोटाळा नाहींसा झाला, पूर्ण समजूत पटली व हें सर्व गुरूकडून मिळालेलें ज्ञान दुसऱ्या कोणामुळेंही झालें नाहीं. तो भगवंतांस म्हणाला, ' आपण उद्यां भिक्षुसंघासहित माझ्या येथें भोजनास यावें. ' भगवंतांनीं स्तब्ध राहून संमती दर्शविली. भगवं-

तांची संमती जाणून कूटदन्त ब्राह्मण आसनावरून उठून भगवंतांस नमस्कार करून प्रदक्षिणा करून निघून गेला. नंतर कूटदन्त ब्राह्मणानें ती रात्र सरल्यावर आपल्या यज्ञशाळेंत उत्तम उत्तम खाद्यभोज्य पदार्थ तयार करवून भगवंतांस सांगितलें कीं, ' गौतम, वेळ झाली, भोजन तयार आहे. '

नंतर भगवान् सकाळींच वस्त्रपरिधान करून पात्र व चीवर बरोबर घेऊन कूटदन्ताच्या यज्ञशालेकडे गेले व त्यांजकरितां घातलेल्या आसनावर बसले. नंतर कूटदन्त ब्राह्मणानें बुद्धप्रमुख भिक्षुसंघाला उत्तम उत्तम खाद्यभोज्य पदार्थ आपल्या हातानें आग्रह करकरून वाढिले. भगवंतांचें भोजन होऊन त्यांनीं हात धुतल्यावर कूटदन्त ब्राह्मण एके बाजूस लहानशा आसनावर बसला. तेव्हां त्यास धार्मिक उपदेशानें मार्ग दाखवून, [ कुशल धर्म ] घेण्यास लावून, उत्साह आणून, आनंद देऊन भगवान् आसनावरून उठून तेथून निघून गेले.

कूटदन्तसुत्त समाप्त.

---

# परिशिष्ट.

जुन्या शब्दांमध्यें नवीन अर्थ बसविण्याची भगवान् बुद्धांची पद्धती याही सूत्रांत चांगल्या रितीनें दिसून येते. वेदकालांत यज्ञयागांवरच सर्वस्वी भर असे. यज्ञ हे मनुष्यांना देवांशीं संबंध जोडण्याचें साधन आहे अशी त्यावेळीं समजूत असे[1]. स्वर्गलोकाप्रत जाऊन पोहोंचावयाचें असेल, तर यज्ञावांचून दुसरें साधन नाहीं. खुद्द देवही यज्ञामुळेंच स्वर्गलोकांत जाऊन पोहोंचले, यज्ञ हेंच देवांचें अन्न, यज्ञ हाच देवांचा आत्मा[2]. तेव्हां देवांना संतुष्ट ठेविण्याचें, त्यांजपासून आपलीं कामें करून घेण्याचें साधन यज्ञच होय. पण हें सर्व साध्य करून घेण्यास यज्ञाचा एकंदर विधि बारीकसारीक गोष्टींत सुद्धां यथायोग्य झाला पाहिजे. तो थोडासुद्धां चुकतां कामा नये. आणि त्या सर्व विधींची माहिती फक्त ब्राह्मणांसच; अर्थात् त्यांच्या सहकारित्वाशिवाय यज्ञ करणें अशक्य होतें. त्यामुळें ब्राह्मणांचें स्तोम अत्यंत वाढलें. कांहीं कालपर्यंत हें ठीक चाललें. परंतु पुढें जसजशी विचाराची प्रगति होऊं लागली तसतशी यज्ञाच्या कार्यसाधकत्वाविषयीं लोकांची श्रद्धा कमी कमी होऊं लागली. शिवाय यज्ञ करण्यास खर्चही बराच लागत असे. त्यामुळें यज्ञ करण्याचा प्रघात मागें पडत चालला. बुद्धाच्या कालीं थोडे यज्ञ होत असत.

यज्ञांमध्यें पशुहिंसा हा एक आवश्यक भाग होता. शिवाय यज्ञविधि चालला असतां अनेक तंटेबखेडे उत्पन्न होत. हें भगवंतांस पसंत नव्हतें. अंतःकरण शुद्ध नसतां केवळ बडबड व बाह्यकर्में करण्यापासून यत्किंचितही उपयोग नाहीं, त्यामुळें उलट नुकसान होतें हें ते ओळखून होते. अंतःकरणाची शुद्धता हाच श्रेष्ठ यज्ञ होय अशी त्यांची खात्री होती. म्हणून कूटदन्तानें त्रिविध व षोडषपरिष्कारयुक्त यज्ञाविषयीं विचारिल्यावर त्यांनीं आपल्या नव्या तऱ्हेनें तीन प्रकार व

---

१. ‘Le sacrifice qui règle les rapports de l’homme avec les divinités est une opération mécanique qui agit par son énergie intime ; caché au sein de la nature, it ne s’en dégage que sous l’action magique du prêtre.’ Sylvain Lévi. La doctrine du sacrifice dans les Brâhmaṇas. p. ५.

२ यज्ञेन वै देवा ऊर्ध्वाः स्वर्गं लोकमायन्. ऐतरेयब्राह्मण ६.१.१. यज्ञ उ देवानां अन्नं. शतपथ ८.१.२.१०. यज्ञ उ देवानां आत्मा. शतपथ ८.६.१.१०.

सोळा परिष्कार त्यास समजावून सांगितले, आणि तेही नुसते न सांगतां पूर्वी जणूं काय ती गोष्ट घडलीच होती अशा मजेदार व बोधप्रद कथेच्या रूपानें सांगितले.

हे सोळा परिष्कार म्हणजे पूर्वीच्या यज्ञविधींतील उपकरणादिक नसून यज्ञास अनुमति देणाऱ्या लोकांचे चार प्रकार, राजाच्या अंगचे आठ गुण व पुरोहिताच्या अंगचे चार गुण होत, आणि तीन प्रकार म्हणजे यज्ञाच्या पूर्वी, यज्ञ चालू असतां व यज्ञानंतर राजास धन खर्चिल्याबद्दल वाईट न वाटणें होय[2]. याशिवाय यज्ञांत धन खर्चिण्यापूर्वी राज्यांत जिकडेतिकडे शांतता व स्वस्थता आहे कीं नाहीं हें पहावयास पाहिजे. त्यावांचून तो यज्ञ धार्मिक व्हावयाचा नाहीं. हें सांगतांना पुरोहितानें राजास जो उपाय सुचविला आहे तो केवळ अमोलिक आहे, व हल्लींच्या काळींदेखील त्यावरून बोध घेतां येण्याजोगा आहे. चोऱ्यामाऱ्या इत्यादि त्रासाचा बंदोबस्त वधबंधनादि शिक्षांच्या

१. संयुत्त ३·१·९ येथें पसेनदि कोसल राजानें हिंसायुक्त यज्ञ करविला असत बुद्धांनीं पुढील गाथा म्हटल्या.

अस्समेधं पुरिसमेधं सम्मापासं वाजपेय्यं
निरग्गलं महारंभा न ते होन्ति महप्फला ।
अजेळका च गावो च विविधा यत्थ हञ्ञरे
न तं सम्मग्गता यञ्ञं उपयन्ति महेसिनो ।
ये च यञ्ञा निरारंभा यजन्ति अनुकूलं सदा
अजेळका च गावो च विविधा नेत्थ हञ्ञरे ।
एतं सम्मग्गता यञ्ञं उपयन्ति महेसिनो
एतं यजेथ मेधावी एसो यञ्ञो महप्फलो ।
एतं हि यजमानस्स सेय्यो होति न पापियो
यञ्ञो च विपुलो होति पसीदन्ति च देवता ।

अंगुत्तर ४·३९·४० येथेंही बुद्धांनीं हिंसायुक्त यज्ञ आपणास पसंत नाहीं असें सांगुन याच गाथा म्हटल्या आहेत. दीघ २३·३१ व सुत्तनिपात( ब्राह्मणधम्मिकसुत्त )ही पहा.

२ अंगुत्तर ७. ४४ येथें उग्गतसरीर ब्राह्मणानें यज्ञाविषयीं प्रश्न केला असतां बुद्धांनीं पुढीलप्रमाणें उत्तर दिलें–यज्ञामध्यें लोक काया, वाचा व मन या तिही प्रकारांनीं कुशल करण्याच्या इच्छेनें अकुशलच करितात व अशा रीतीनें आपणाविरुद्ध तीन प्रकारचीं शस्त्रेंच उपसतात. त्याचप्रमाणें राग, द्वेष व मोह हे तीन टाकाऊ अग्नि होत, व आहुनेय्यग्गि ( म्हणजे मातापितरें ) गहपतग्गि ( म्हणजे पुत्र, दारा, दास, कर्मकार वगैरे ) आणि दक्खिणेय्यग्गि ( म्हणजे श्रमणब्राह्मण ) हे तीन अग्नि स्वीकारण्यासारखे होत.

योगें व्हावयाचा नाहीं. कारण शिक्षेतून सुटल्यावर चोर पुन्हां प्रजेस त्रास देऊं लागतील. म्हणून चोर चोरी कां करितात हें पाहून त्या कारणाचा खरोखर बंदोबस्त करावयास पाहिजे. कोणीही चोऱ्यामाऱ्या केवळ मौज म्हणून करीत नाहीं. तो पुष्कळांच्या उपजीविकेचाच एक भाग असतो. म्हणून राज्यांतील प्रत्येक मनुष्यास त्याच्या योग्यतेचें काम देऊन त्यास नेहमीं त्यांत गुंतवून ठेवणें हेंच राष्ट्राचें कर्तव्य होय. अशा रितीनें राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीचें चित्त गुंतलेलें राहिलें म्हणजे त्यांस वाईट गोष्टींचा विचार करण्याची फुरसत व जरूर राहणार नाहीं, व राष्ट्रांमध्यें धनधान्यादि समृद्धी होईल.

त्याशिवाय यज्ञांत जी पशुहत्या होते ती बंद केली पाहिजे. कोणासहीं जबरीनें काम करावयास लावितां कामा नये. ज्यानें त्यानें आपल्या हौशी-प्रमाणें, आणि तेंही वाटल्यास, काम करावें. कोणालाही थोडासुद्धां त्रास होणार नाहीं, सर्वांस आनंद व उत्साह वाटेल आणि पूर्णपणें समाधान होईल, अशा रीतीनें यज्ञ चालविला तरच तो महत्फलदायक होईल. नाहींतर दुसऱ्या कित्येक ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें राजे लोक हाताखालच्या लोकांना त्रास देऊन व त्यांजकडून जबरीनें काम करून घेऊन आपल्याला व दुसऱ्यांना व्यर्थ त्रास देतात, अशा तऱ्हेच्या यज्ञानें उत्तम फलाची प्राप्ति तर होत नाहींच, उलट लोकांचे शिव्याश्राप मात्र घ्यावे लागतात.

पण असा सर्वथैव श्लाघ्य यज्ञ जरी केला तरी तो कांहीं श्रेष्ठ यज्ञ नव्हे. त्याहून श्रेष्ठतर यज्ञ म्हटले म्हणजे नित्यदानें देणें, विहार बांधणें, बुद्ध, धर्म व संघ यांस शरण जाणें व पंचशीलांनीं युक्त असणें हे होत. परंतु सर्वांत श्रेष्ठ यज्ञ म्हटला म्हणजे शील, समाधी व प्रज्ञा यांच्या योगानें अंतःकरणाची शुद्धी करणें हा होय. याहून श्रेष्ठतर असें कांहीं नाहीं.

आतां या सूत्राच्या पद्धतीकडे पाहिलें असतां असें दिसून येईल कीं, हें एक जातकच आहे. जातककथेचे एकंदर पांच विभाग असतात. (१) पच्चुप्पन्नवत्थु. ज्या प्रसंगावरून बुद्धानें भूतकालीन गोष्ट सांगितली तो प्रसंग. (२) अतीतवत्थु. भूतकालची कथा. हा जातकाचा मुख्य भाग होय. (३) गाथा. या जातकाच्या शेवटीं किंवा मध्यें येऊं शकतात व त्यास अनुसरूनच मागील कथा सांगितलेली असते. (४) वेय्याकरण. गाथांतील शब्दांवर टीका. (५) समोधान म्हणजे उपसंहार. यांमध्यें भूतकालीन कथेंतील व सांप्रतकालीन प्रसंगांतील

---

१. मज्झिम ५१, ६०, ९४. अंगुत्तर ४.१९८. हें अत्तंतप व परंतप मनुष्याचें उदाहरण म्हणून दिलें आहे.

मनुष्यें अथवा प्राणी यांचा संबंध दाखविलेला असतो. येथें बुद्ध गोष्ट सांगण्यास सुरुवात करण्याच्या पूर्वीची हकीकत ही पच्चुप्पन्नवत्थु होय. महाविजित राजाची गोष्ट ही अतीतवत्थु. गाथा मात्र यांत कोठें आढळत नाहींत. म्हणूनच कदाचित् जातकग्रंथांत याचा समावेश झाला नसावा, गाथा नसल्याकारणानें अर्थातच वेय्याकरणही येथें नाहीं. ' मी पूर्वीं राजाचा पुरोहित होतों ' असें जें बुद्धानें शेवटीं सांगितलें तें समोधान होय.

---

१. संयुत्त ३·१·९ येथें पसेनदि कोसल राजानें यज्ञ केला असतां बुद्धानें म्हटलेल्या कांहीं गाथा ( पृ० १६८ टीप १ ) दिल्या आहेत, त्या येथें घेतल्या असतां हें सर्वांगपरिपूर्ण जातक होईल. त्या गाथा येथील प्रसंगास तंतोतंत शोभतील अशाच आहेत.

# ६ महालिसुत्त.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके समयीं भगवान [बुद्ध] वेसालीनगरींत महावनांत कूटागारशालेंत रहात होते. त्यावेळीं कोसल व मगध देशांतील पुष्कळ ब्राह्मणदूत कांहीं कामामुळें वेसालीनगरींत येऊन राहिले होते. त्यांनीं ऐकिलें कीं, 'शाक्यपुत्र श्रमण गौतम शाक्यकुलांतून बाहेर पडून वेसालीनगरींत महावनांत कूटागारशालेंत रहात आहे. त्या भगवान गौतमाची अशी कीर्ति पसरली आहे कीं, अर्हत्, सम्यक्संबुद्ध, विद्या व आचरण यांनीं संपन्न, सुगत, सर्वलोक जाणणारा, सर्वश्रेष्ठ, दमन करण्यास योग्य अशा जनांचा मार्गदर्शक व देव आणि मनुष्य यांचा शास्ता असा भगवान बुद्ध आहे. तो देवलोक, मारलोक व ब्रह्मलोक यांसहित हें जग, व श्रमण आणि ब्राह्मण, देव आणि मनुष्य यांसहित ही प्रजा स्वतः जाणून व पूर्णपणें ओळखून तें ज्ञान इतरांसही देतो, व आरंभीं, मध्यें व शेवटींही कल्याणप्रद, सार्थ व सव्यंजन असा धर्म व अगदीं पूर्ण व शुद्ध असें श्रेष्ठ आचरण हीं स्पष्टपणें दाखवितो. अशा अर्हन्तांचें दर्शन घेणें चांगलें.'

२ तेव्हां कोसल व मगध देशांतील ते ब्राह्मणदूत महावनांतील कूटागारशालेकडे गेले. त्यावेळीं आयुष्मान नागित भगवंतांचा उपस्थायक[3] होता, त्याजकडे जाऊन ते म्हणाले, "नागिता, यावेळीं तो पूज्य गौतम कोठें आहे? त्याचें दर्शन घेण्याची आमची इच्छा आहे."

"भगवंतांचें दर्शन घेण्यास ही वेळ योग्य नाहीं. ते यावेळीं एकांतांत ध्यानस्थ आहेत."

---

१. या नगरीची बरोबर जागा अद्याप सांपडली नाहीं. परंतु धम्मपालाच्या सुत्तनिपातावरील अट्ठकथेवरून ( सुत्तनिपात २. १ ) असें दिसतें कीं ती तिर्हुत (Tirhut) प्रांतांत गंगानदीच्या उत्तरेस २५ मैलांवर व राजगृहापासून ३८ मैलांवर असावी तेथून हिमालयापर्यंत महावन पसरलें होतें. त्यामध्यें बौद्ध भिक्षूंकरितां एक विहार बांधला होता. जातक १४९ पहा. Rhys Davids. Buddhist India p. 49. पण v. v. A. Smith यांचा J. R. A. S. 1902 p. 267 येथील लेख पहा. त्यांच्या मतें वेसाली म्हणजे पाटणाच्या वायव्येस सत्तावीस मैल असलेलें बसार होय. २. दुपाखी घर. ३. संबोधीपासून वीस वर्षें भगवंतांचा ठराविक उपस्थायक नव्हता. जातक ४५६.

हें ऐकून ते ब्राह्मणदूत भगवंतांचें दर्शन घेऊन मग जाऊं असा विचार करून तेथेंच बसले.

२ ओट्ठद्ध नांवाचा एक लिच्छवीही लिच्छवींच्या मोठ्या समुदाया-सह महावनांत कूटागारशालेंत नागिताजवळ जाऊन त्यास वंदन करून एके बाजूस उभा राहिला व त्यास म्हणाला, " पूज्य नागित, अर्हत् सम्यक्संबुद्ध यावेळीं कोठें आहेत ? त्यांचें दर्शन घेण्याची माझी इच्छा आहे. "

" महालि भगवंतांचें दर्शन घेण्यास ही वेळ योग्य नाहीं. ते यावेळीं एकांतांत ध्यानस्थ आहेत. "

हें ऐकून ओट्ठद्ध लिच्छवी भगवंतांचें दर्शन घेऊन मग जावें असा विचार करून तेथेंच बसला.

---

१. याचें मूळ नांव महाली, परंतु वरचा ओठ फाटून गेल्यामुळें त्याचें ओट्ठद्ध (अर्धोष्ठ) असें नांव पडलें होतें. २. भगवान बुद्धाच्या काळीं वज्जी नांवाच्या लोकांचें एक प्रजासत्ताक राज्य होतें. या राज्याचे आठ लहान लहान भाग होते. त्यांपैकीं लिच्छवींचें राज्य हें मुख्य होय. त्याची राजधानी वेसाली नगरी होती. (Rhys Davids, Buddhist India p. 26) परंतु बुद्धघोषाचार्यांच्या महासीहनादसुत्तावरील (मज्झिम १२) अट्ठकथेवरून लिच्छवी व वज्जी हीं दोन्हीं एकाच लोकांचीं नांवें असावींत असें दिसतें. ती कथा अशी—वाराणसीराजाच्या अग्रमहिषीच्या कुक्षींत गर्भ राहिला व ती एक मांसाचा गोळा प्रसवली. तेव्हां तिनें तो नदींत टाकून दिला. तो एका तापसास सांपडला. कांहीं दिवसांनीं त्यांतून एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन मुलें निघालीं. त्यांचें त्यानें यथायोग्य पालन केलें. पुढें कांहीं गवळी त्यांस तापसापासून घेऊन गेले. तेथें तीं गवळ्यांच्या पोरांस रडवूं लागलीं म्हणून ते म्हणूं लागले कीं या मुलांस घालवून द्यावयास पाहिजे ( वज्जितब्बा इमे ). यावरून त्यांचें नांव वज्जी असें पडलें. त्यांचीं उदरें पारदर्शक होतीं, त्यांत काय आहे तें स्पष्ट दिसे, म्हणून तीं निच्छवी आहेत असें म्हणत. त्यांची छवी एकमेकांस चिकटलेली होती म्हणून त्यांस लीनच्छवी म्हणत. अशा रितीनें लिच्छवी असें त्यांचें नांव पडलें. पुढें त्यांनीं वेसाली नगरी वसवून तेथें राज्य स्थापिलें.

४ नंतर सीह[1] नांवाचा श्रामणेर[2] नागितजवळ जाऊन त्यास वंदन करून एके बाजूस उभा राहिला व त्यास म्हणाला, "काश्यपा,[3] हे कोसल व मगध देशांतील पुष्कळसे ब्राह्मणदूत भगवंतांच्या दर्शनासाठीं आले आहेत व हा ओट्ठद्ध नांवाचा लिच्छवीही लिच्छवींच्या मोठ्या समुदायासह भगवंतांच्या दर्शनासाठीं आला आहे. तेव्हां, हे काश्यप, या सर्व जनांना भगवंतांचें दर्शन व्हावें हें बरें."

"तर मग, सीहा, तूंच भगवंतांस जाऊन सांग."

"ठीक आहे," असें नागितास उत्तर देऊन सीह श्रामणेर भगवंतांजवळ जाऊन त्यांस वंदन करून एके बाजूस उभा राहिला व त्यांस म्हणाला, "भगवन्, हे कोसल व मगध देशांतील पुष्कळसे ब्राह्मणदूत आपल्या दर्शनासाठीं आले आहेत व ओट्ठद्ध नांवाचा लिच्छवीही लिच्छवींच्या मोठ्या समुदायासह आपल्या दर्शनासाठीं आला आहे. तेव्हां या सर्व जनांना भगवंतांनीं दर्शन द्यावें हें बरें."

"तर मग, सीहा, विहाराच्या छायेंत आसन घाल."

"ठीक आहे," असें भगवंतांस उत्तर देऊन सीह श्रामणेरानें विहाराच्या छायेंत आसन घातलें व भगवान विहारांतून बाहेर येऊन त्या पसरलेल्या आसनावर बसले.

५ ते कोसल व मगध देशांतील ब्राह्मणदूतही भगवंतांजवळ जाऊन कुशलप्रश्न विचारून एका बाजूस बसले. ओट्ठद्ध लिच्छवीही लिच्छवींच्या मोठ्या समुदायासह भगवंतांजवळ जाऊन कुशलप्रश्न विचारून एका

---

१. हा नागिताचा भाचा असून यानें आपल्या वयाच्या सातव्या वर्षींच प्रव्रज्या घेतली होती. २. ज्यांच्या वयास वीस वर्षें पूर्ण झालीं आहेत अशांसच भिक्षुसंघांत घ्यावयाचें असा नियम होता. त्याहून कमी वयाच्या मनुष्यास संघांत राहून भिक्षूंची सेवा करण्याची परवानगी असे, व भिक्षूही त्यास थोडेंफार शिकवीत. यांना श्रामणेर अशी संज्ञा असे. ३. हें नागिताचें गोत्र होय. प्राचीन काळच्या नांवें ठेवण्याच्या पद्धतीविषयीं Rhys Davids यांची या सूत्रावरील प्रस्तावना पहा. Dialogues of the Buddha, vol. 1. pp. 193-196.

बाजूस बसला व म्हणाला, " भगवन्, पुष्कळ दिवसांमागें सुनक्खत्त लिच्छवीपुत्र मजजवळ येऊन म्हणाला, ' महालि, मला भगवंतांजवळ येऊन तीन वर्षें झालीं. तेव्हांपासून मला सुंदर, मोहक व काम्य अशीं दिव्य रूपें दिसतात, परंतु मधुर, मोहक व काम्य असे दिव्य शब्द मला ऐकूं येत नाहींत. ' तर, भगवन्, त्याला ऐकूं येईनात असे दिव्य शब्द खरोखर आहेत कीं मुळींच नाहींत ? "

" महालि, मधुर, मोहक, काम्य असे दिव्य शब्द खरोखर आहेत, नाहींत असें नाहीं. पण त्याला ते ऐकूं आले नाहींत. "

६ " भगवन्, असे दिव्य शब्द जर खरोखर आहेत, नाहींत असें नाहीं, तर सुनक्खत्त लिच्छवीला ते ऐकूं येत नाहींत याचा हेतु काय, कारण काय ? "

७ " महालि, पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, वरची, खालची यांपैकीं कोणत्या तरी दिशेस अथवा सर्व बाजूंस असणारीं सुंदर, मोहक, काम्य अशीं दिव्य रूपें पहाण्याकरितां—दिव्य शब्द ऐकण्याकरितां नव्हे—एखादा भिक्षू तेवढ्यापुरतीच समाधी लावितो त्यामुळें दिव्य रूपें पहाण्याकरितां तेवढ्यापुरतीच समाधी त्यानें लाविली असल्याकारणानें सुंदर, मोहक, काम्य अशीं दिव्य रूपें तेवढीं त्यास दिसतात, पण मधुर, मोहक, काम्य असे दिव्य शब्द त्यास ऐकूं येत नाहींत. याचें कारण काय ? तर त्या भिक्षूनें दिव्य रूपें पाहण्याकरितांच—दिव्य शब्द ऐकण्याकरितां नव्हे—समाधी लाविली होती.

८—९ " महालि, कोणत्या तरी दिशेस अथवा सर्व बाजूंस असणारे मधुर, मोहक, काम्य असे दिव्य शब्द ऐकण्याकरितां—दिव्य रूपें पाहण्याकरितां नव्हे—एखादा भिक्षू तेवढ्यापुरतीच समाधी लावितो. त्यामुळें दिव्य शब्द ऐकण्याकरितां तेवढ्यापुरतीच समाधी त्यानें लाविली अस-

---

१. हा पुढें भगवंतांचा तीन वर्षें उपस्थायक होता. परंतु भगवंतांचें म्हातारपण झाल्यावर तो त्यांस सोडून कोर नांवाच्या क्षत्रियाच्या संघांत गेला. ( मज्झिम १२, जातक ९४ ).

त्याकारणानें दिव्य शब्दच फक्त त्यास ऐकूं येतात, पण दिव्य रूपें दिसत नाहींत. याचें कारण काय? तर त्या भिक्षूनें दिव्य शब्द ऐकण्याकरितांच—दिव्य रूपें पहाण्याकरितां नव्हे—समाधी लाविली होती.

१०—११ "महालि, कोणत्या तरी दिशेस अथवा सर्व बाजूंस असणारीं सुंदर, मोहक, काम्य अशीं दिव्य रूपें पाहण्याकरितां व त्याप्रमाणेंच मधुर, मोहक, काम्य असे दिव्य शब्द एकण्याकीरतां अशा दुहेरी हेतूनें एखादा भिक्षू समाधी लावितो. त्यामुळें दिव्य रूपें पाहण्याकरितां व दिव्य शब्द ऐकण्याकरितां अशा दुहेरी हेतूनें त्यानें समाधी लाविली असल्याकारणानें त्यास दिव्य रूपें दिसतात व दिव्य शब्दही ऐकूं येतात. याचें कारण काय? तर त्या भिक्षूनें दिव्य रूपें पाहण्याकरितां व दिव्य शब्द ऐकण्याकरितां अशा दुहेरी हेतूनें समाधी लाविली होती.

"तेव्हां, महालि, दिव्य शब्द खरोखर असतांना सुनक्खत्त लिच्छवीला ते ऐकूं येत नाहींत याचा हेतु, याचें कारण हें होय."

१२ "तर मग, भगवन्, अशा समाधिभावनेकरितां भिक्षू आपल्याजवळ ब्रह्मचर्य पाळतात काय?"

"नाहीं, महालि, यांहून चांगल्या व श्रेष्ठ अशा दुसऱ्या गोष्टी आहेत, त्याचा साक्षात्कार करून घेण्याकरितां भिक्षू मजजवळ ब्रह्मचर्य पाळतात."

१३ "त्या गोष्टी कोणत्या, भगवन्?"

"महालि, पहिल्या तीन संयोजनांचा क्षय झाल्यानें भिक्षू

---

१. संयोजनें म्हणजे बंधनें. यांच्यामुळें प्राणी संसारांत बांधला जाऊन त्यास निर्वाणप्राप्तीच्या मार्गानें जातां येत नाहीं. हीं संयोजनें दहा आहेतः—सक्कायदिट्ठि (आत्मा नित्य आहे अशी चुकीची दृष्टी). २. विचिकिच्छा (बुद्ध, धर्म व संघ यांजविषयीं शंका). ३. सीलब्बतपरामास (शीलांनीं व व्रतांनींच शुद्धी मिळेल असा विश्वास). ४. कामराग (कामवासना). ५. पटिघ (क्रोध). ६. रूपराग (ब्रह्मलोकादि रूपलोकप्राप्तीची इच्छा). ७. अरूपराग (अरूपदेवलोकप्राप्तीची इच्छा). ८. मान (अहंकार). ९. उद्धच्च (भ्रांतचित्तता). १०. अविज्जा (अविद्या). यांतील पहिल्या पांचांस ओरंभागियसंयोजनें व शेवटच्या पांचांस उद्धंभागियसंयोजनें अशा संज्ञा आहेत. (प्रो. कोसंबी. बुद्ध, धर्म आणि संघ पृ० ९९).

सोतापन्न होतो. मग त्यास कोणत्याही दुःखकारक स्थितींत जन्म यावयाचा नाहीं व शेवटीं त्यास हटकून संबोधी मिळावयाचीच. ही गोष्ट, महालि, अधिक चांगली व श्रेष्ठ होय व तिचा साक्षात्कार करून घेण्याकरितां भिक्षू मजजवळ ब्रह्मचर्य पाळतात.

" यापुढें, महालि, पहिल्या तीन संयोजनांचा क्षय होऊन राग, द्वेष व मोह हे दुर्बल झाले म्हणजे भिक्षु सकदागामी होतो, व मग आणखी एकदांच त्याला या लोकीं जन्म घ्यावयास लागून नंतर त्याच्या दुःखाची समाप्ती होते. ही गोष्ट, महालि, अधिक चांगली व श्रेष्ठ होय व तिचा साक्षात्कार करून घेण्याकरितां भिक्षू मजजवळ ब्रह्मचर्य पाळतात.

" यापुढें, महालि, पहिल्या पांच संयोजनांचा नाश झाला म्हणजे भिक्षु ओपपातिक[3] होतो, मग त्यास तेथेंच निर्वाणप्राप्ति होते व तेथून तो

१. सोतापन्न, सकदागामि, अनागामि, व अरहा असे निर्वाणमार्गात समाविष्ट झालेल्या व्यक्तींचे चार भेद आहेत. निर्वाणमार्गाच्या सुरुवातीस असणाऱ्या मनुष्यास सोतापन्न ( प्रवाहास लागलेला ) असें म्हणतात. या पायरीवर येण्यास पहिल्या तीन संयोजनांचा क्षय व्हावा लागतो. या स्थितींत जर त्यास मृत्यु आला तर तो देवलोकीं आणि मनुष्यलोकीं फार झालें तर सात खेपा जन्म घेतो. सातव्या जन्मीं त्याला निर्वाणप्राप्ति झालीच पाहिजे. पहिल्या तीन संयोजनांचा नाश होऊन कामराग, द्वेष व मोह हे दुर्बल झाले म्हणजे मनुष्य सकदागामी ( एकदांच परत येणारा ) होतो. अशा स्थितींत त्याचा अंत झाला तर तो एकवेळच इहलोकीं जन्म घेतो व निर्वाण मिळवितो. पहिल्या पांच संयोजनांचा समूळ नाश झाला म्हणजे मनुष्य अनागामी (परत न येणारा) होतो त्याला त्या स्थितींत मरण आलें असतां तो पुन्हां इहलोकीं जन्म घेत नाहीं. ब्रह्मलोकादि देवलोकांत त्याचा जन्म होतो व तेथूनच तो निर्वाण मिळवितो. सर्व संयोजनांच्या क्षयानें मनुष्य अरहा ( अर्हत् ) होतो. त्याला पुनर्जन्म नाहीं. तो कायमचाच मुक्त झाला. ( प्रो. कोसंबी बुद्ध, धर्म आणि संघ पृ० १०० ) २. सोतापन्नास पुन्हां जन्म घ्यावा लागला तर मनुष्य किंवा देव या रूपानेंच तो जन्म घेतो. नरक, जनावराचा जन्म ( तिरच्छानयोनी ), प्रेतलोक व असुरलोक या चार वाईट स्थितींत ( विनिपात अथवा अपाय ) तो जन्मास येत नाहीं. ३. अण्डज, जलाबुज, संसेदज व ओपपातिक अशा चार योनी आहेत. त्यांतील ओपपातिक म्हणजे पहिल्या तिहींहून व्यतिरिक्त सर्व प्राणी. मनुष्यप्राणी स्त्रीपुरुषसंयोगामुळें जन्मास येतो. परंतु अनागामी देवलोकांत एकदम जात असल्याकारणानें त्यास ओपपातिक म्हणजे मनुष्यप्राण्याच्या जन्मण्याच्या नेहमींच्या तऱ्हेनें उत्पन्न झालेला नव्हे असें म्हणतात. ( पृ० २९ व ६१ येथील टीपा पहा. )

केव्हांही परत येत नाहीं. ही गोष्ट, महालि, अधिक चांगली व श्रेष्ठ होय व तिचा साक्षात्कार करून घेण्याकरितां भिक्षू मजजवळ ब्रह्मचर्य पाळतात.

“ यापुढें, महालि, सर्व आसवांचा क्षय होऊन भिक्षु अनास्रव अशी चित्त आणि प्रज्ञा यांची विमुक्ती याच जन्मीं जाणून व तिचा साक्षात्कार करून घेऊन त्याप्रमाणें वागतो. ही गोष्ट, महालि, अधिक चांगली व श्रेष्ठ होय व तिचा साक्षात्कार करून घेण्याकरितां भिक्षू मजजवळ ब्रह्मचर्य पाळतात.

“महालि, या गोष्टी अधिक चांगल्या व श्रेष्ठ होत व यांचा साक्षात्कार करून घेण्याकरितां भिक्षू मजजवळ ब्रह्मचर्य पाळतात. ”

१४ “पण या गोष्टींचा साक्षात्कार करून घेण्यास एखादा मार्ग अथवा उपाय आहे काय ? ”

“ होय, महालि. ”

“तो मार्ग, तो उपाय कोणता ? ”

“ तो मार्ग म्हणजे आर्य अष्टांगिक मार्ग हा होय. तो असा:— सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्मान्त, सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति व सम्यक् समाधि. त्या गोष्टींचा साक्षात्कार करून घेण्याचा मार्ग हाच होय.

१५ “ महालि, एके वेळीं मी कोसंबीनगरींत घोसितारामांत रहात होतों. तेथें मंडिस्स व दारुपात्तिकाचा[२] शिष्य जालिय असे दोन प्रव्रजितें मजजवळ येऊन कुशलप्रश्न विचारून एके बाजूस बसले व मला म्हणाले, ‘गौतम, जीव व शरीर हीं एकच आहेत कीं निराळीं आहेत ?’

“ ‘ ऐका तर मग आणि नीट ध्यानांत ठेवा. मी आतां सांगतों. ’

“ ‘ठीक आहे,’ असें त्यांनीं मला उत्तर दिलें. मग मी म्हणालों,

---

१. प्रो० धर्मानंद कोसंबी. बुद्ध, धर्म आणि संघ पृ० १०६-१०७ पहा. २. जालियाचा गुरु लाकडाचें पात्र घेऊन भिक्षेला जात असे म्हणून त्याचें नांव दारुपत्तिक ( दारुपात्रिक ) असें पडलें होतें.

१६ "'या जगांत तथागत, अर्हत्, सम्यक्संबुद्ध ....[ सामञ्ञफलसुत्त ४०–७५ याप्रमाणें ] हें ज्याला कळलें, हें ज्यानें पाहिलें, त्यानें जीव व शरीर हीं एकच आहेत अथवा तीं निराळीं आहेत असें म्हणणें योग्य होईल काय ? '

"' होयं. '

"' परंतु मला हें कळलें आहे, मीं हें पाहिलें आहे, तरी मी जीव व शरीर हीं एकच आहेत अथवा तीं निरनिराळीं आहेत असें कांहींच म्हणत नाहीं. '

१७-१८ " '[ सामञ्ञफलसुत्त ७७-८४ याप्रमाणें. येथेंही वरीलच प्रश्न व उत्तर हींही समजावीं. ]..

१९ "' याप्रमाणें चित्त शांत...[ सामञ्ञफलसुत्त ९७ याप्रमाणें ] ....आसवांचा नाश करण्याकडे लावितो. तो 'हें दुःख......आतां यापुढें जन्मच नाहींत असें त्यास कळून येतें.

" ' हें ज्यास कळलें, हें ज्यानें पाहिलें, त्यानें जीव व शरीर हीं एकच आहेत अथवा तीं निराळीं आहेत असें म्हणणें योग्य होईल काय ?'

"'नाहीं.'

"' मला हें कळलें आहे, मीं हें पाहिलें आहे, परंतु मी जीव व शरीर हीं एकच आहेत अथवा तीं निराळीं आहेत असें कांहींच म्हणत नाहीं.' '

असें भगवान् म्हणाले. प्रमुदित चित्तानें ओट्ठद्ध लिच्छवीनें त्यांच्या भाषणाचा स्वीकार केला.

## महालिसुत्त समाप्त.

---

१. सयामीप्रतींत सर्व ठिकाणीं ' नाहीं ' असें उत्तर आहे.

## परिशिष्ट.

या सूत्रांतील पहिला मुद्दा म्हणजे दिव्य रूपें दिसणें किंवा दिव्य शब्द ऐकूं येणें हें कांहीं ब्रह्मचर्याचें ध्येय नव्हे हा होय. समाधी नीट रितीनें साध्य झाली म्हणजे पांच ( लौकिक ) अभिञ्ञा अथवा अतिमानुष सिद्धी प्राप्त करून घेतां येतात. त्या पांच म्हणजे १ इद्धिविध ( अनेक प्रकारचे चमत्कार ), २ दिब्ब-सोत ( दिव्यश्रोत्र ), ३ परस्स चेतोपरियञ्ञाण ( दुसऱ्याच्या हृदयांतील विचार ओळखणें ), पुब्बेनिवासानुस्सति ( पूर्वजन्मांची स्मृती ) व ५ दिब्ब-चक्खु ( दिव्यचक्षु ) ह्या होत. यांतील प्रत्येक सिद्धी प्राप्त करून घेण्यास त्या त्या सिद्धींचें परिकर्म अथवा पूर्व तयारी करावी लागते. प्रस्तुत सूत्रांत सुनक्खत्त लिच्छवीला दिव्य शब्द ऐकूं न येण्याचें कारण त्यानें त्या हेतूनें समाधी लाविली नव्हती हें होय.[1] परंतु या सिद्धी प्राप्त होणें हें जरी कितीही फायदे-शीर असलें तरी त्या मिळविण्याकरितां कांहीं ब्रह्मचर्यपालन करावयाचें नसतें. खरें ध्येय म्हटलें म्हणजे सोतापत्ति वगैरे मार्गानें वर वर जात जात अर्हत्पद, ज्याला आसवानं खये ञाणं ( आसवांचा क्षय घडवून आणणारें ज्ञान ) नांवाची सहावी ( लोकोत्तर ) अभिज्ञा म्हणतात, तें प्राप्त करून घेणें आणि तें प्राप्त करून घेण्याचा उपाय आर्य अष्टांगिक मार्ग हाच होय.

येथें खरोखरी हें सूत्र संपावयास पाहिजे होतें. परंतु यापुढें लगेच भगवान् बुद्धांनीं जालियाशीं झालेला संवाद सांगण्यास सुरुवात केली आहे. तो अगदीं अप्रस्तुत दिसतो, परंतु या भागांतील प्रत्येक सूत्रांत अवश्य आढळून येणारीं शीलें या संवादांत ग्रथित केलीं आहेत हें पाहिलें म्हणजे तो अप्रस्तुत नसून जेव्हां सर्व सूत्रांचा संग्रह केला त्यावेळींच तो या सूत्रामध्यें हल्लीं आढळून येणाऱ्या रूपानेंच ग्रथित झाला होता असें दिसून येईल. कारण या सूत्रांत जर हीं शीलें नसतीं तर तें शीलस्कंध असें नांव असलेल्या या भागांत येणेंच अशक्य होतें.

---

१ बुद्धघोषाचार्यांनीं याचें कारण कांहींसें निराळें दिलें आहे. तें असें. सुनक्खत्तानें भगवंतांजवळ दिव्यचक्षूच्या परिकर्माची याचना केली होती व भगवंतांनीं तें त्यास सांगितलें होतें. म्हणून त्यास दिव्य रूपें दिसत. पुढें दिव्य मधुर शब्द ऐकण्याच्या इच्छेनें दिव्यश्रोत्राचें परिकर्म त्यानें भगवंतांस विचारिलें. परंतु पूर्वजन्मीं एका शील-वान् भिक्षूच्या कानांवर दगड मारून त्यानें त्यास बधिर केलें होतें म्हणून त्यास तें परिकर्म साध्य होणार नाहीं हें जाणून भगवंतांनीं तें त्यास सांगितलें नाहीं. त्यावरून त्यास राग येऊन त्यानें गृहस्थाश्रम स्वीकारिला.

परंतु हा जालियसंवाद मूळचा निराळाच संवाद होता हें उघड आहे. कारण तो जशाचा तसाच पुढील सूत्रांत आढळून येतो. अशा तऱ्हेनें एक सबंध सूत्रच्या सूत्र पुन्हां घालण्याचें कारण काय याचा उलगडा होत नाहीं, व अगदीं निराळाच असा विषय केवळ शीलें आलीं पाहिजेत म्हणून या सूत्रांत घालावयाचा हें कांहींसें चमत्कारिक दिसतें. बुद्धघोषाचार्यांनीं अट्ठकथेंत याचा थोडासा खुलासा करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या म्हणण्यावरून असें दिसतें कीं, महालीच्या मनांत रूप हाच आत्मा आहे असा विचार होता. तो जाणून त्यापासून त्यास मुक्त करावें या उद्देशानें भगवंतांनीं मूळ प्रतिपाद्य विषय संपला असतांही लगेच हा दुसरा विषय सुरू केला, व महालीला प्रत्यक्ष ‘ असा विचार तुझ्या मनांत आहे तो खोटा आहे ’ असें न सांगतां अप्रत्यक्ष गोष्टीच्या रूपानें सांगितला.

जीव व शरीर हीं एकच आहेत कीं निराळीं आहेत, हा प्रश्न दश अव्याकृतांमधील आहे. हीं दहा पुढीलप्रमाणें आहेतः—

१ जग शाश्वत आहे, २ जग अशाश्वत आहे, ३ जगताला अन्त आहे, ४ जग अनन्त आहे, ५ जीव व शरीर हीं एकच, ६ जीव व शरीर हीं निरनिराळीं, ७ तथागत मरणानंतर असतो, ८ तथागत मरणानंतर नसतो, ९ तथागत मरणानंतर असतोही व नसतोही व १० तथागत मरणानंतर असतो असेंही नाहीं व नसतो असेंही नाहीं. भगवान् बुद्धांच्या मतें या प्रश्नांचें उत्तर देण्याचा प्रयत्न करणें म्हणजे मेंदूस व्यर्थ शिणविणें आहे. कारण या गोष्टी विचारशक्तीच्या आटोक्याच्या बाहेरच्या आहेत. दुसरी गोष्ट अशी कीं त्या कळून आपणांस कांहींही फायदा नाहीं. आपले सर्व प्रयत्न जगतांतील दुःखाचा विनाश कसा होईल, या एका प्रश्नाकडे लागले पाहिजेत. ते सोडून निरर्थक प्रश्न काढून केवळ शक्तीचा व कालाचा अपव्यय करण्यांत काय फायदा? याकरितांच प्रत्येक ठिकाणीं असल्या प्रश्नांस उत्तर देण्याचें भगवंतांनीं सपशेल नाकारिलें आहे. ( चूलमालुंक्यसुत्त पहा. मज्झिम नं. ६३ ).

---

# ७ जालियसुत्त.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके समयीं भगवान् [ बुद्ध ] कोसंबीनगरींत घोसितारामांत रहात होते. तेथें मंडिस्स व दारुपात्तिकाचा शिष्य जालिय असे दोन प्रव्राजित त्यांजकडे येऊन कुशलप्रश्न विचारून एके बाजूस बसले व त्यांस म्हणाले, " गौतम, जीव व शरीर हीं एकच आहेत कीं निराळीं आहेत ? "

" ऐका तर मग आणि नीट ध्यानांत ठेवा. मी आतां सांगतों. "

" ठीक आहे, " असें त्यांनीं भगवंतांस उत्तर दिलें. भगवान् म्हणाले,

२ " या जगांत तथागत, अर्हत्, सम्यक्संबुद्ध ...[ सामञ्ञफलसुत्त ४०–७५ ].... हें ज्याला कळलें, हें ज्यानें पाहिलें, त्यानें जीव व शरीर हीं एकच आहेत अथवा तीं निराळीं आहेत असें म्हणणें योग्य होईल काय ? "

" होय. "

" परंतु मला हें कळलें आहे, मीं हें पाहिलें आहे, तरी मी जीव व शरीर हीं एकच आहेत अथवा तीं निराळीं आहेत असें कांहींच म्हणत नाहीं.

३–४ "... [ सामञ्ञफलसुत्त ७७–८४. येथेंही वरीलच प्रश्न व उत्तर हींही समजावीं ].

५ " याप्रमाणें चित्त शांत ....[ सामञ्ञफलसुत्त ९७ ].... आसवांचा नाश करण्याकडे लाविते. तो ' हें दुःख.... आतां यापुढें जन्मच नाहींत असें त्यास कळून येतें.

" हें ज्यास कळलें, हें ज्यानें पाहिलें, त्यानें जीव व शरीर हीं एकच आहेत अथवा तीं निराळीं आहेत असें म्हणणें योग्य होईल काय ? "

" नाहीं. "

" मला हें कळलें आहे, मीं हें पाहिलें आहे. परंतु मी जीव व शरीर हीं एकच आहेत अथवा तीं निराळीं आहेत असें कांहींच म्हणत नाहीं. "

असें भगवान् म्हणाले. प्रमुदित चित्तानें त्या दोघां प्रव्रजितांनीं त्यांच्या भाषणाचा स्वीकार केला.

जालियसुत्त समाप्त.

# ८ कस्सपसीहनादसुत्तं.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके समयीं भगवान् [ बुद्ध ] उजुञ्ञेंत कण्णकत्थल मिगदायांत रहात होते. तेथें अचेलक कस्सप भगवंतांकडे येऊन कुशलप्रश्न विचारून एके बाजूस बसला व त्यांस म्हणाला,

२ "गौतमा, मीं असें ऐकिलें आहे कीं, 'श्रमण गौतम सर्व तपाची निंदा करितो व प्रत्येक तपस्वी व रुक्षाजीवी[3] यांची अगदीं निंदा व थट्टा करितो.' तर, गौतम, जे असें म्हणतात ते आपलीं मतें बरोबर सांगतात काय? खोटें सांगून आपल्यावर भलताच आरोप करीत नाहींत ना? धर्मप्रमाणेंच सांगतात ना? यामुळें आपले कोणतेही मुख्य व गौण वाद निंद्य होत नाहींत ना? कारण भगवंतांवर भलताच आरोप करण्याची माझी इच्छा नाहीं."

३ "कस्सपा, जे असें म्हणतात ते माझीं मतें बरोबर सांगत नाहींत व खोटें सांगून माझ्यावर भलताच आरोप करितात. कस्सपा, मला दिव्य, विशुद्ध व अतिमानुष चक्षूनें एखादा रुक्षाजीवी तपस्वी मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर अपाय, दुर्गति, विनिपात, निरय यांप्रत गेलेला दिसतो. तसेंच दुसरा एखादा रुक्षाजीवी तपस्वी मरणानंतर

---

१. '(१-२) एखादा तपस्वी निरयास जातो, एखादा स्वर्गास जातो, ( ३–६ ) अकुशल धर्म सोडून देण्यांत व कुशलधर्म ग्रहण करण्यांत मी व माझी परिषद् हेच श्रेष्ठ आहों, ( ७–१० ) शील, वीर्य, प्रज्ञा व विमुक्ती यांमध्यें मीच श्रेष्ठ आहें. हे दहा सिंहनाद. यांतील प्रत्येकीं परिषदेंत सिंहनाद करितो, निर्धास्तपणें करितो इत्यादि दहा तऱ्हा मिळून एकंदर शंभर होतात, व मूळचे दहा मिळून या सूत्रांत एकंदर एकशें दहा सिंहनाद आहेत. म्हणून यास महासीहनादसुत्त असें नांव आहे.' ( बुद्धघोष ). मज्झिम १२ यासही महासीहनादसुत्त ( अथवा लोमहंसनपरियाय ) असेंच नांव आहे.

२. उरुञ्ञा असाही पाठ आहे. मज्झिम ९० पहा. ३. लूखाजीवी. 'तिणगोमयादिभक्खनादीहि नानप्पकारेहि अत्तानं किलमेति' ( बुद्धघोष ). Who lives a hard life ( Rh D ). ४. न च कोचि सहधम्मिको वादानुवादो गारय्हं ठानं आगच्छति. 'परेहि वुत्तकारणेहि सकारणो हुत्वा तुम्हाकं वादो वा अनुवादो वा विञ्ञूहि गरहितब्बं कारणं कोचि अप्पमत्तकोऽपि किं न आगच्छति' ( बुद्धघोष ).

शरीराचा भेद झाल्यावर सुगतीस, स्वर्गलोकास गेलेला दिसतो. तसेंच, कस्सपा, एखादा कमी दुःखाचें जीवित घालविणारा तपस्वी अपाय, दुर्गति, विनिपात, निरय यांप्रत गेलेला दिसतो व एखादा कमी दुःखानें जीवित घालविणारा तपस्वी सुगतीस, स्वर्गलोकास गेलेला दिसतो. याप्रमाणें, कस्सपा, मला या तपस्व्यांची अशा तऱ्हेची आगती, गती, च्युती व उत्पत्तीही कळते. तर अशा स्थितींत मी सर्व तपाची निंदा करीन काय ? प्रत्येक तपस्वी व रुक्षाजीवी यांची अगदीं निंदा व थट्टा करीन काय ?

४ "कस्सपा, कांहीं शहाणे, निपुण, वादांमध्यें कुशल, कोरून अर्थभेद काढणारे, आपल्या प्रज्ञेनें दुसऱ्यांचीं चुकीचीं मतें जणूं काय फोडून टाकणारे असे श्रमण व ब्राह्मण आहेत. त्यांच्याशीं माझीं कांहीं मतें जुळतात, कांहीं जुळत नाहींत. ते ज्या एखाद्या गोष्टीस चांगली म्हणतात त्या एखाद्या गोष्टीस आम्हींही चांगली म्हणतों, ते ज्या एखाद्या गोष्टीस चांगली म्हणत नाहींत त्या एखाद्या गोष्टीस आम्हीही चांगली म्हणत नाहीं, ते ज्या एखाद्या गोष्टीस चांगली म्हणतात त्या एखाद्या गोष्टीस आम्ही चांगली म्हणत नाहीं, ते ज्या एखाद्या गोष्टीस चांगली म्हणत नाहींत त्या एखाद्या गोष्टीस आम्ही चांगली म्हणतों. आम्हीं ज्या एखाद्या गोष्टीस चांगली म्हणतों त्या एखाद्या गोष्टीस ते चांगली म्हणतात, आम्ही ज्या एखाद्या गोष्टीस चांगली म्हणत नाहीं त्या एखाद्या गोष्टीस ते चांगली म्हणत नाहींत, आम्ही ज्या एखाद्या गोष्टीस चांगली म्हणत नाहीं त्या एखाद्या गोष्टीस ते चांगली म्हणतात, आम्ही ज्या एखाद्या गोष्टीस चांगली म्हणतों त्या एखाद्या गोष्टीस ते चांगली म्हणत नाहींत.

५ " त्यांच्याजवळ जाऊन मी असें म्हणतों कीं, " ज्या बाबतींत तुमचें आमचें जुळत नाहीं त्या गोष्टी बाजूला राहूंद्या, व ज्यांमध्यें जुळतें

---

१. या चार तऱ्हेच्या गोष्टी बुद्धघोषाचार्यांच्या मतें अनुक्रमें पंचशीलें, पंचविध वैर, पंचद्वारे असंवर व पंचद्वारे संवर या होत.

त्यांविषयीं शहाण्या पुरुषांनीं गुरूची गुरूशीं व संघाची संघाशीं तुलना करून म्हणावें कीं, 'ज्या गोष्टी वाईट आहेत व ज्यांस हे वाईट म्हणतात, ज्या निंद्य आहेत व ज्यांस हे निंद्य म्हणतात, ज्या सेवन करण्यास अयोग्य आहेत व ज्या सेवन करण्यास अयोग्य असें हे समजतात, ज्या आर्यधर्मास पुरेशा नाहींत व ज्या अशा नाहींत असें हे समजतात, ज्या अशुद्ध आहेत व ज्या तशा आहेत असें हे समजतात, त्या गोष्टी पूर्णपणें कोणीं सोडून दिल्या आहेत? श्रमण गौतमानें कीं दुसऱ्या गणांच्या आचार्यांनीं?'

६ "त्यांत, कस्सपा, कदाचित् असेंही होईल कीं शहाणे पुरुष असें म्हणतील कीं, 'या ज्या वाईट गोष्टी आहेत व ज्या वाईट आहेत असें हे मानितात त्या श्रमण गौतमानें पूर्णपणें सोडून दिल्या आहेत, परंतु दुसरे गणांचे जे आचार्य आहेत त्यांनीं यथातथाच सोडून दिल्या आहेत.'

७ "आणि, कस्सपा, पुन्हां शहाण्या पुरुषांनीं गुरूची गुरूशीं व संघाची संघाशीं तुलना करून म्हणावें कीं, 'ज्या गोष्टी चांगल्या आहेत व ज्या चांगल्या आहेत असें हे म्हणतात, ज्या स्तुत्य आहेत व ज्या स्तुत्य आहेत असें हे मानितात, ज्या सेवन करण्यास योग्य आहेत व ज्या तशा आहेत असें हे समजतात, ज्या आर्यधर्मास पुरेशा आहेत व ज्या तशा आहेत असें हे समजतात, ज्या शुद्ध आहेत व ज्या तशा आहेत असें हे मानितात, त्या गोष्टींचा पूर्णपणें स्वीकार करून कोण चालतो? श्रमण गौतम कीं दुसरे गणांचे आचार्य?'

८ "त्यांत, कस्सपा, कदाचित् असेंही होईल कीं शहाणे पुरुष असें म्हणतील कीं, 'या ज्या गोष्टी चांगल्या आहेत व ज्या चांगल्या आहेत असें हे मानितात त्या गोष्टींचा श्रमण गौतम पूर्णपणें स्वीकार करून त्याप्रमाणें वागतो, परंतु दुसरे जे गणांचे आचार्य आहेत त्यांनीं त्या गोष्टींचा यथातथाच स्वीकार केला आहे.' याप्रमाणें, कस्सपा, शहाणे पुरुष आमचीच प्रामुख्यानें स्तुती करितील.

---

१. समनुयुञ्जन्तं समनुगाहन्तं समनुभासन्तं.

९ " आणि, कस्सपा, पुन्हां शहाण्या पुरुषांनीं गुरूची गुरूशीं व संघाची संघाशीं तुलना करून म्हणावें कीं, ' ज्या गोष्टी वाईट आहेत व ज्यांस हे वाईट म्हणतात, ज्या निंद्य आहेत व ज्यांस हे निंद्य म्हणतात, ज्या सेवन करण्यास अयोग्य व ज्या सेवन करण्यास अयोग्य असें हे समजतात, ज्या आर्यधर्मास पुरेशा नाहींत व ज्या अशा नाहींत असें हे समजतात ,ज्या अशुद्ध आहेत व ज्या तशा आहेत असें हे समजतात, त्या गोष्टी पूर्णपणें कोणीं सोडून दिल्या आहेत? गौतमाच्या शिष्यसंघानें कीं दुसऱ्या गणांच्या आचार्यांच्या शिष्यसंघांनीं ? '

१० " त्यांत, कस्सपा, कदाचित् असेंही होईल कीं शहाणे पुरुष असें म्हणतील कीं, ' या ज्या वाईट गोष्टी आहेत व ज्या वाईट आहेत असें हे मानितात, त्या गौतमाच्या शिष्यसंघानें पूर्णपणें सोडून दिल्या आहेत, परंतु दुसऱ्या गणांच्या आचार्यांच्या शिष्यसंघानीं यथातथाच सोडून दिल्या आहेत. '

११ " आणि, कस्सपा, पुन्हां शहाण्या पुरुषांनीं गुरूची गुरूशीं व संघाशीं तुलना करून म्हणावें कीं, ' ज्या गोष्टी चांगल्या आहेत व ज्या चांगल्या आहेत असें हे म्हणतात, ज्या स्तुत्य आहेत व ज्या स्तुत्य आहेत असें हे मानितात, ज्या सेवन करण्यास योग्य आहेत व ज्या तशा आहेत असें हे समजतात, ज्या शुद्ध आहेत व ज्या तशा आहेत असें हे समजतात त्या गोष्टींचा पूर्णपणें स्वीकार करून कोण चालतो? गौतमाचा शिष्यसंघ कीं दुसऱ्या गणांच्या आचार्यांचे शिष्यसंघ ? '

१२ " त्यांत, कस्सपा, कदाचित् असेंही होईल कीं शहाणे पुरुष असें म्हणतील कीं, 'या ज्या गोष्टी चांगल्या आहेत व ज्या चांगल्या आहेत असें हे मानितात,त्या गोष्टींचा गौतमाचा शिष्यसंघ पूर्णपणें स्वीकार करून त्याप्रमाणें वागतो, परंतु दुसऱ्या गणांच्या आचार्यांच्या शिष्यसंघांनीं त्या गोष्टींचा यथातथाच स्वीकार केला आहे.' याप्रमाणें, कस्सपा, शहाणे पुरुष आमचीच प्रामुख्यानें स्तुती करितील.

१३ " कस्सपा, ज्याप्रमाणें चालणाऱ्या पुरुषाला श्रमण गौतम योग्य वेळीं बोलतो, खरें बोलतो, अर्थ, धर्म व विनय सांगतो, हें स्वतः कळेल

व दिसेल असा एक मार्ग, असा एक उपाय आहे. असा तो मार्ग, असा तो उपाय कोणता ? तर हा आर्य अष्टांगिक मार्गच होय. तो म्हणजे सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्मान्त, सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति व सम्यक् समाधि. ज्याप्रमाणें चालणाऱ्या पुरुषाला श्रमण गौतम योग्य वेळीं बोलतो, खरें बोलतो, अर्थ, धर्म व विनय सांगतो, हें स्वतः कळेल व दिसेल असा मार्ग, असा उपाय हाच होय."

१४ असें भगवान् बोलल्यावर अचेलक कस्सप त्यांस म्हणाला,

---

१. हे तपाचे उपक्रम विशेषतः आजीवकांनीं स्वीकारिले होते असें दिसतें ( मज्झिम ३६, ५१ व ७६ ). तेथें ते अत्तंतप मनुष्याचें उदाहरण म्हणून दिले आहेत. गौतम बुद्धानेंही संबोधीच्या पूर्वी त्यांचा अनुभव घेऊन ते मुक्ती मिळविण्यास कुचकामाचे आहेत असें ठरविलें होतें ( मज्झिम १२, ३६. तसेंच मज्झिम ६०, ९४, पुग्गलपञ्ञत्ति ४-२४ पहा. ) जैनग्रंथांतूनही यांचें वर्णन सांपडतें. उदाहरणार्थ कल्पसूत्र सामाचारी २०-३०, आयारंग १-८-४ व सूयगडंग १-२-१-९ पहा. सूयगडंग २-२-७२. येथेंही तपाचे अनेक प्रकार दिले आहेत.

'तेसिणं भगवंताणं इमा एतारूवा जाया माया वित्ती होच्छा। तं जहा चउच्छे भत्ते छट्ठे भत्ते अट्ठमे भत्ते दसमे भत्ते दुवालसमे भत्ते चउदसमे भत्ते अद्धमासिए भत्ते मासिए भत्ते दोमासिए भत्ते तिमासिए भत्ते चउम्मासिए भत्ते पंचमासिए भत्ते छम्मासिए भत्ते। अदुत्तरं च णं उक्खित्तचरया णिक्खित्तचरया उक्खित्तणिक्खित्तचरया अंतचरगा पंतचरगा लूहचरगा समुदाणचरगा संसट्ठचरगा असंसट्ठचरगा तज्जातसंसट्ठचरगा दिट्ठलाभिया अदिट्ठलाभिया पुट्ठलाभिया अपुट्ठलाभिया भिक्खुलाभिया अभिक्खुलाभिया अन्नायलाभिया अन्नायलोगलाभिया पनिहिया संखादत्तिया परिमितपिंडवाइया.'

महाभारत १२-३०९ येथेंही अनेक प्रकारचीं तपें दिलीं आहेत.

शुक्लवासाश्च दुर्वासाः शायी नित्यमधस्तथा। मण्डूकशायी च तथा वीरासनगतस्तथा ॥ ९
चीरधारणमाकाशे शयनं स्थानमेव च। इष्टकाप्रस्तरे चैव कण्टकप्रस्तरे तथा ॥ १०
भूमप्रस्तरशायी च भूमिशय्यानुलेपनः।... ... ... ... ... ... ... ... ...॥ ११
शणवालपरीधानो व्याघ्रचर्मपरिच्छदः। सिंहचर्मपरीधानः पट्टवासास्तथैव च ॥ १३
फलकपरिधानश्च तथा कण्टकवस्त्रधृत्। कीटकापासवसनश्चीरवासास्तथैव च ॥ १४
एकवस्त्रान्तराशित्वमेककालिकभोजनम्। चतुर्थाष्टमकालश्च षष्ठकालिक एव च॥ १६
षड्रात्रभोजनश्चैव तथैवाष्टाहभोजनः। सप्तरात्रदशाहारो द्वादशाहिकभोजनः ॥ १७
मासोपवाशी मूलाशी फलाहारस्तथैव च। वायुभक्षोऽम्बुपिण्याकदधिगोमयभोजनः ॥ १८
गोमूत्रभोजनश्चैव शाकपुष्पाद एव च। शैवालभोजनश्चैव तथाऽऽचामेन वर्तयन् ॥ १९
वर्तयन्शीर्णपर्णैश्च प्रकीर्णफलभोजनः। विविधानि च कृच्छ्राणि सेवते सिद्धिकांक्षया ॥२०

Neumann(Reden Gotamo Buddho's ) यांच्या I,376, 482; II,314 येथील टीपा पहा.

" मित्रा गौतमा, तपाचे पुढील उपक्रम कांहीं श्रमणब्राह्मणांच्या मतें श्रामण्य व ब्राह्मण्य देणारे आहेत. तो अचेलक[1] असतो. त्याला रीतभात[2] कांहीं नसते. तो हात चाटतो[3]. तो ' या बसा[4] ' वगैरे म्हटलें असतां त्याप्रमाणें वागत नाहीं. तो आधीं आणिलेली[5] भिक्षा किंवा त्यांच्याकरितां मुद्दाम[6] तयार केलेलें अन्न किंवा [भोजनाकरितां] निमंत्रण यांचा स्वीकार करीत नाहीं. तो भांड्यांतून[7] अथवा कळोपीतून[8] काढून आणिलेली, उंबऱ्याच्या[9] आंतून वाढलेली, कांठी[10], मुसल यांच्या मधून आणिलेली भिक्षा घेत नाहीं. तो दोघे जेवत[11] असतां [ आणिलेली ], गर्भिणी[12]-पासून, [ मूल ] पाजणारी[13]पासून, पुरुषाशीं रत[14] झालेल्या स्त्रीपासून, संकीर्ती[15]मध्यें, जेथें कुत्रा[16] उभा असेल तेथून, जेथें माशा[17] घोंगावत

---

१. वस्त्रविहीन, नग्न. २. मुत्ताचारो .'लौकिक आचार सोडून देऊन उभ्यानेंच शौच व लघुशंका करितो व खातो ' ( बुद्धघोष ). ३. हत्थापलेखनो. ' हातांतच अन्न घेऊन खातो व तें संपलें म्हणजे हात स्वच्छ करण्याकरितां ते चाटितो, अथवा शौचाहून आल्यावर पाणी न वापरतां हातानेंच साफ करितो ' ( बुद्धघोष ). संन्यासोपनिषद् २.१; ५-७७ पात्रं अस्य भवेत्पाणिः । ४. न एहिभदन्तिको न तिट्ठभदन्तिको. 'भिक्षाग्रहणार्थ ' या, थांबा ' असें म्हटलें असतां तो येत नाहीं थांबत नाहीं. कारण त्याप्रमाणें केलें असतां दुसऱ्याचा हुकूम मानिल्यासारखें होईल ' (बुद्धघोष). ५. अभिहटं. भिक्षेसाठीं बाहेर पडण्याच्या आधींच आणून दिलेलें. ६. उद्दिस्सकटं. ७. कुंभी.' भांड्यांतून काढून आणिलेली भिक्षा घेत नाहीं. कारण त्यास असें वाटतें कीं पळीनें त्यांतून भिक्षान्न काढीत असतां त्यास प्रहार बसतील' ( बुद्धघोष ). ८. उक्खलि वा पच्छि वा ( बुद्धघोष ). टीकाकार ' तो कुंभी अथवा कळोपी यांमधून अन्न खात नाहीं, कारण हातांतूनच अन्न खावयाचें असा त्याचा नियम असतो, असा अर्थ घेतो. ९. एळकमन्तरं. १०. Perhaps, among the firewood (Rh D.). ११. ' दोघे जेवत असतां एकानें उठून दिलेली भिक्षा घेत नाहीं. कारण त्यामुळें त्यांच्या जेवणांत अडथळा येईल ' (बुद्धघोष ). १२. 'कारण त्यामुळें गर्भास त्रास होईल ' ( बुद्धघोष ). १३. ' कारण त्यामुळें मुलास दूध मिळण्यास अडचण पडेल ' ( बुद्धघोष ). १४. पुरिसन्तरगताय. ' कारण त्यांच्या रतीमध्यें अडथळा येईल. ' ( बुद्धघोष ). जातक ६२, आयारंग २.१.१.११ व २.१०.२ पहा ( पुरिसंतरकडा ). तेथें हा शब्द अनुक्रमें अन्न व स्थंडिल यांस लाविला आहे. ( Prepared by another man ). १५. संकित्तीसु. 'दुर्भिक्षसमयीं श्रावक अचेलकांकरितां अन्न शिजवितात तेथें ' ( बुद्धघोष ). १६. ' कारण त्यामुळें त्या कुत्र्यास अन्न मिळणार नाहीं ' ( बुद्धघोष ). 'कुक्कुरं वा विद्दियं पुरतो. 'आयारंग १.८.४.११. १७. 'कारण त्याच्यामुळें माशांस त्रास होईल ( बुद्धघोष ).

असतील तेथून भिक्षा घेत नाहीं. तो मासे व मांस खात नाहीं. तो मद्य व तुसोदक[1] पीत नाहीं. तो एकाच[2] घरांतील भिक्षा घेतो अथवा एकच घास खातो, दोनच घरांतील भिक्षा घेतो अथवा दोनच घास खातो, सातच घरांतील भिक्षा घेतो अथवा सातच घास खातो. तो एकाच भिक्षेंत[3] निर्वाह करितो, दोनच भिक्षांत निर्वाह करितो, सातच भिक्षांत निर्वाह करितो. तो दररोज एकदां जेवतो अथवा दोन दिवसांनीं एकदां जेवतो अथवा सात दिवसांनीं एकदां जेवतो, अशा रितीनें तो नियमितपणें अर्ध्या महिन्यानें एकदां असें सुद्धां जेवतो.

"मित्रा गौतमा, तपाचे पुढील उपक्रमही कांहीं श्रमणब्राह्मणांच्या मतें श्रामण्य व ब्राह्मण्य देणारे आहेत. तो भाजी खातो, श्यामाक[4] खातो, नीवार खातो, दद्दुलं[5] खातो, हट[6] खातो, कण्या खातो, आचाम[7] खातो, पिण्याक[8] खातो, तृण खातो, वनांतील मूलें व फलें खातो, झाडावरून पडलेलीं फळें तेवढींच खातो.

"मित्रा गौतमा, तपाचे पुढील उपक्रमही कांहीं श्रमणब्राह्मणांच्या मतें श्रामण्य व ब्राह्मण्य देणारे आहेत. तो साण[9] धारण करितो, मसाण[10] धारण करितो, शैवांवरील[11] वस्त्रें धारण करितो, चिंध्या धारण करितो, झाडाची साल धारण करितो, अजिन धारण करितो, आजिनाचे तुकडे धारण करितो, कुशचीर धारण करितो, वाकचीर धारण करितो, फलकचीर[12] धारण करितो,

१. 'सर्व धान्यांच्या तुसांपासून केलेलें सोवीरक. सुरापान करणें निंद्य आहे, पण तो तुसोदक पिण्यांत देखील दोष आहे असें समजतो '( बुद्धघोष). २. 'एकाच घरांतून भिक्षा घेऊन परत फिरतो ' ( बुद्धघोष ). ३. दत्ती. ' ज्यामध्यें भिक्षा ठेवितात असें लहान भांडें ' ( बुद्धघोष ). Gift, donation. ४. ' अरञ्ञे सयंजातवीहिजाति ' ( बुद्धघोष ). ५. ' चांभारांनीं फेकून दिलेले चामड्याचे तुकडे ' ( बुद्धघोष ). सं० दर्दुर A sort of rice. ६. सीलेसोऽपि सेवालोऽपि ( बुद्धघोष ). ७. भत्तउक्खलिकाय लग्गो झामकओदनो, ओदनकंजियंऽति पि वदन्ति (बुद्धघोष ८. निःस्नेहतिलचूर्ण. Oil-cake. ९. साणवाकचीरानि. ताग. १०. मिस्सकचोळानि ११. छवदुस्सानि. ' एरकतिणादीनि वा गंथेत्वा कतनिवासनानि ' ( बुद्धघोष ) 'एरकादीहि कतानि हि छवानि लामकानि दुस्सानीऽति वत्तब्बतं लभन्ति '(टीका). १२. लाकडाच्या पातळ तुकड्यांचें बनविलेलें वस्त्र.

केशकंबल धारण करितो, घोडयाच्या शेपटीच्या केसांचें[2] केलेलें कांबळें धारण करितो, घुबडाचे पंख धारण करितो. तो केशश्मश्रुलोचक[3] होतो, केश व श्मश्रु उपटून टाकितो. तो उभाच राहतो व आसनावर कधींही बसत नाहीं, तो उकिडवा बसतो व तसाच सतत राहतो. तो कण्टकापस्सयिक असतो म्हणजे काट्यांच्या बिछान्यावर निजतो. तो फळ्यांवर निजतो, तो जमिनीवर निजतो. तो एकाच कुशीस निजतो. तो धूळ व घाण यांनीं आपलें शरीर माखतो. तो उघडयाच्या जागेंत राहतो. तो दिलें असेल त्यांत संतोष मानितो. तो वेकटिक असतो, विकटें वस्तु खातो. तो अपानक असतो, थंड पाणी पीत नाहीं. तो संध्याकाळीं तिसऱ्यांदां अशा रितीनें रोज तीनदां पाण्यांत जाऊन स्नान करितो."

१५ "कस्सपा, जर तो अचेलक असेल......अर्ध्या महिन्यानें असें एकदां सुद्धां जेवीत असेल, हें सर्व करीत असेल आणि शीलसंपदा, चित्त-संपदा व प्रज्ञासंपदा यांची त्यानें भावना केली नसले, यांचा साक्षात्कार करून घेतला नसेल, तर तो श्रामण्य व ब्राह्मण्य यांपासून दूर आहे [असेंच समजलें पाहिजे ]. परंतु, कस्सपा, जेव्हां भिक्षु वैरराहित व कोपरहित अशा मैत्रीचित्ताची भावना करितो व आसवांच्या क्षयानें अनासव अशी चित्ताची व प्रज्ञेची विमुक्ती याच जन्मांत स्वतः जाणून व तिचा साक्षात्कार करून घेऊन राहतो, तेव्हांच, कस्सपा, त्या भिक्षूला श्रमण किंवा ब्राह्मण म्हणतात.

---

१. 'मनुस्सकेसेहि कतकंबलं' (बुद्धघोष). अंगुत्तर १.१८.४ पहा. अजित (पृष्ठ ९६) हें धारण करीत असे. २. वालकंबलं. ३. कल्पसूत्र या जैनग्रंथामध्यें (सामाचारी ५७) महिन्यांतून एकदां हजामत करवावी, दर पंधरवड्यास केस कापावे व दर सहा महिन्यांनीं उपटून काढावे असें म्हटलें आहे. ४. उक्कुटिकप्पधानमनुयुत्तो. धम्मपद १४१ पहा. ५. 'कोठें जावयाचें झालें तरी उकिडवा राहूनच उड्या मारीत जातो' (बुद्धघोष). ६. थंडिलसेय्यंऽपि कप्पेति. धम्मपद १४१ पहा. ७. रजोजल्लधरो. मज्झिम ४० पहा. ८. अब्भोकासिकोऽपि होति यथासंथतिको. हीं दोन्हीं बौद्धांच्या तेरा धुतंगांपैकीं आहेत. विसुद्धिमग्ग २ पहा. ९. घाणेरड्या वस्तु. महावग्ग ६.१४.६ येथें चार महाविकटें सांगितलीं आहेत, तीं गूथ, मूत्र, छारिका व मृत्तिका हीं होत. १०. सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं. संयुत्त ७.२.११ येथें सकाळ संध्याकाळ आपलीं पापें स्नानानें धुवून टाकणाऱ्या संगारव ब्राह्मणाचें उदाहरण आहे.

" कस्सपा, जर तो भाजी खात असेल...... झाडावरून पडलेलीं फळें तेवढींच खात असेल, हें सर्व करीत असेल, आणि शीलसंपदा, चित्तसंपदा, व प्रज्ञासंपदा यांची त्यानें भावना केली नसेल, ............ त्या भिक्षूला श्रमण किंवा ब्राह्मण म्हणतात.

" कस्सपा, जर तो साण धारण करीत असेल ...... रोज तीनदां पाण्यांत जाऊन स्नान करीत असेल, हें सर्व करीत असेल, आणि शीलसंपदा, चित्तसंपदा व प्रज्ञासंपदा यांची त्यानें भावना केली नसेल, ......त्या भिक्षूला श्रमण किंवा ब्राह्मण म्हणतात."

१६ भगवान् असें बोलल्यावर अचेलक कस्सप त्यांस म्हणाला, "गौतमा, श्रामण्य किती दुष्कर आहे ! ब्राह्मण्य किती दुष्कर आहे! "

" होय, कस्सपा, 'श्रामण्य किती दुष्कर आहे ! ब्राह्मण्य किती दुष्कर आहे !' अशी लोकांत समजूत आहे खरी, परंतु, कस्सपा, तो अचेलक असेल ...... अर्ध्या महिन्यानें एकदां असें सुद्धां जेवीत असेल, हें सर्व तो करीत असेल, एवढ्यानेंच, एवढ्या तपाच्या उपक्रमानेंच, श्रामण्य व ब्राह्मण्य हीं दुष्कर, अतिदुष्कर आहेत असें सिद्ध होत असेल तर श्रामण्य व ब्राह्मण्य हीं दुष्कर आहेत असें म्हणणें योग्य व्हावयाचें नाहीं. कारण ' मी अचेलक असेन ...... अर्ध्या महिन्यानें एकदां असें सुद्धां जेवीत असेन,' असें म्हणून त्याप्रमाणें वागणें हें एखाद्या गृहपती अथवा गृहपतिपुत्र यांपासून तों अगदीं कुंभदासीपर्यंत कोणासही शक्य होईल परंतु, जेव्हां श्रामण्य व ब्राह्मण्य हीं दुष्कर, अतिदुष्कर आहेत असें याशिवाय, या तपाच्या उपक्रमांशिवाय, सिद्ध होईल, तेव्हांच श्रामण्य व ब्राह्मण्य हीं दुष्कर आहेत असें म्हणणें योग्य होईल. जेव्हां, कस्सपा, भिक्षु वैररहित व कोपरहित अशा मैत्रीचित्ताची भावना करितो व आस्रवांच्या क्षयानें अनास्रव अशी चित्त व प्रज्ञा यांची विमुक्ती याच जन्मांत स्वतः जाणून व तिचा साक्षात्कार करून घेऊन राहतो, तेव्हांच त्या भिक्षूला श्रमण अथवा ब्राह्मण म्हणतात.

---

१. पकति खो एसा कस्सप लोकस्मिं.

" कस्सपा, तो भाजी खात असेल...... झाडावरून पडलेलीं फळें तेवढींच खात असेल, हें सर्व तो करीत असेल, एवढ्यानेंच, एवढ्या तपाच्या उपक्रमानेंच, श्रामण्य व ब्राह्मण्य हीं दुष्कर आहेत असें सिद्ध होत असेल, ... तेव्हांच त्या भिक्षूला श्रमण अथवा ब्राह्मण म्हणतात.

"कस्सपा, तो साण धारण करीत असेल......रोज तीनदां पाण्यांत जाऊन स्नान करीत असेल, हें सर्व तो करीत असेल, एवढ्यानेंच, एवढ्या तपाच्या उपक्रमानेंच, श्रामण्य व ब्राह्मण्य हीं दुष्कर आहेत असें सिद्ध होत असेल,...तेव्हांच त्या भिक्षूला श्रमण अथवा ब्राह्मण म्हणतात."

१७ भगवान् असें बोलल्यावर अचेलक कस्सप त्यांस म्हणाला, "श्रमण कळण्यास किती कठीण आहे! ब्राह्मण कळण्यास किती कठीण आहे!"

"होय, कस्सपा, 'श्रमण कळण्यास किती कठीण आहे! ब्राह्मण कळण्यास किती कठीण आहे!' अशी लोकांत समजूत आहे खरी. परंतु, कस्सपा, 'तो अचेलक असल ... ... अर्ध्या महिन्यानें एकदां असें सुद्धां जेवत असेल, हें सर्व तो करीत असेल, एवढ्यानेंच, एवढ्या तपाच्या उपक्रमानेंच, श्रमण व ब्राह्मण हे कळण्यास कठीण, अतिशय कठीण आहेत असें सिद्ध होत असेल, तर श्रमण व ब्राह्मण कळण्यास कठीण आहेत असें म्हणणें योग्य व्हावयाचें नाहीं. कारण 'मी अचेलक असेन......अर्ध्या महिन्यानें एकदां असें सुद्धां जेवीत असेन' असें म्हणून त्याप्रमाणें वागणें हें एखाद्या गृहपती अथवा गृहपतीपुत्रापासून तों कुंभदासीपर्यंत कोणासही शक्य होईल. परंतु, जेव्हां श्रमण व ब्राह्मण हे कळण्यास कठीण, अतिशय कठीण असें याशिवाय, या तपाच्या उपक्रमाशिवाय, सिद्ध होईल, तेव्हांच श्रमण व ब्राह्मण हे कळण्यास कठीण आहेत असें म्हणणें योग्य होईल. जेव्हां, कस्सपा, भिक्षु वैर-रहित व कोपरहित अशा मैत्रीचित्ताची भावना करितो व आसवांच्या क्षयानें अनासव अशी चित्त व प्रज्ञा यांची विमुक्ती याच जगांत स्वतः जाणून व तिचा साक्षात्कार करून घेऊन रहातो, तेव्हांच त्या भिक्षूला श्रमण अथवा ब्राह्मण म्हणतात.

" कस्सपा, तो भाजी खात असेल...झाडावरून पडलेलीं फळें तेवढींच खात असेल, हें सर्व तो करीत असेल, एवढ्यानेंच, एवढ्या तपाच्या उपक्रमानेंच, श्रमण व ब्राह्मण कळण्यास कठीण, अतिशय कठीण असें सिद्ध होत असेल ...... तेव्हांच त्या भिक्षूला श्रमण अथवा ब्राह्मण म्हणतात.

" कस्सपा, तो साण धारण करीत असेल...रोज तीनदां पाण्यांत जाऊन स्नान करीत असेल, हें सर्व तो करीत असेल एवढ्यानेंच, एवढ्या तपाच्या उपक्रमानेंच, श्रमण व ब्राह्मण कळण्यास कठीण, अतिशय कठीण असें सिद्ध होत असेल ...... तेव्हांच त्या भिक्षूला श्रमण अथवा ब्राह्मण म्हणतात. "

१८ भगवान् असें बोलल्यावर अचेलक कस्सप त्यांस म्हणाला, " गौतमा, ती शीलसंपदा, ती चित्तसंपदा, ती प्रज्ञासंपदा कोणती ?"

" [ सामञ्ञफलसुत्त ४०-६३ प्रमाणें]. याप्रमाणें, कस्सपा, भिक्षू शीलसंपन्न होतो. हीच ती, कस्सपा, शीलसंपदा.

१९ " [सामञ्ञफलसुत्त ६४-८२ प्रमाणें ]. हीच ती, कस्सपा, चित्तसंपदा.

२० " [ सामञ्ञफलसुत्त ८३-९८ प्रमाणें. ] हीच ती, कस्सपा, प्रज्ञासंपदा.

" कस्सपा, या शीलसंपदेपेक्षां, चित्तसंपदेपेक्षां, प्रज्ञासंपदेपेक्षां दुसरी चांगली व श्रेष्ठ शीलसंपदा, चित्तसंपदा, प्रज्ञासंपदा नाहीं

२१ " कस्सपा, कांहीं श्रमण व ब्राह्मण शीलवादी असतात. ते अनेक तऱ्हांनीं शीलाची स्तुती करितात. कस्सपा, हें जें आर्य व उच्च शील आहे, त्यामध्यें माझ्या बरोबरीचाच कोणी मला दिसत नाहीं. मग माझ्यापेक्षां वरचढ कोण असणार ? शीलामध्यें मीच श्रेष्ठ आहें.

' कस्सपा, कांहीं श्रमण व ब्राह्मण तपोजुगुप्सावादी[1] असतात. ते अनेक

१. 'किलेससन्तापकविरियं तपो, तदेव ते किलेसे जिगुच्छतीऽति जिगुच्छा' ( बुद्धघोष). self-torture and austere scrupulousness. (Rh. D.) मज्झिम १२ पहा.

तऱ्हांनीं तपोजुगुप्सेची स्तुती करितात. कस्सपा, ही जी आर्य व उच्च तपोजुगुप्सा आहे, तीमध्यें माझ्या बरोबरीचाच कोणी मला दिसत नाहीं. मग माझ्यापेक्षां वरचढ कोण असणार ? तपोजुगुप्सेमध्यें मीच श्रेष्ठ आहें.

" कस्सपा, कांहीं श्रमण व ब्राह्मण प्रज्ञावादी असतात. ते अनेक तऱ्हांनीं प्रज्ञेची स्तुती करितात. कस्सपा, ही जी आर्य व उच्च प्रज्ञा आहे, तीमध्यें माझ्या बरोबरीचाच कोणी मला दिसत नाहीं. मग माझ्यापेक्षां वरचढ कोण असणार ? प्रज्ञेमध्यें मीच श्रेष्ठ आहें.

" कस्सपा, कांहीं श्रमण व ब्राह्मण विमुक्तिवादी असतात. ते अनेक तऱ्हांनीं विमुक्तीची स्तुती करितात. कस्सपा, ही जी आर्य व उच्च विमुक्ती आहे, तीमध्यें माझ्या बरोबरीचाच कोणी मला दिसत नाहीं. मग माझ्यापेक्षां वरचढ कोण असणार ? विमुक्तीमध्यें मीच श्रेष्ठ आहें.

२२ " आतां, कस्सपा, असेंही शक्य आहे कीं, अन्यधर्मीय परिव्राजक म्हणतील कीं, ' श्रमण गौतम सिंहनाद करितो खरा, पण तो एकांत जागेंत, परिषदेंत नव्हे.' त्यांना म्हणावें, 'असें नाहीं. श्रमण गौतम सिंहनाद करितो आणि तोही परिषदांत करितो.' असें, कस्सपा, त्यांस म्हणावें.

" आतां, कस्सपा, असेंही शक्य आहे कीं, अन्यधर्मीय परिव्राजक म्हणतील कीं, ' श्रमण गौतम सिंहनाद करितो आणि तोही परिषदांत करितो, परंतु तो निर्धास्तपणें नाहीं.' त्यांना म्हणावें, ' असें नाहीं. श्रमण गौतम सिंहनाद करितो आणि तोही परिषदांत करितो व तो निर्धास्तपणेंही करितो.' असें, कस्सपा, त्यांस म्हणावें.

१. ' कम्मस्सकतापञ्ञा च विपस्सनापञ्ञा च पञ्ञा नाम, मग्गफलसंपयुत्ता परमा पञ्ञा नाम ' ( बुद्धघोष ). २. ' तदंगविक्खंभनविमुत्तियो विमुत्ति नाम, समुच्छेदपटिपस्सद्धिनिस्सरणविमुत्तियो परमा विमुत्ति ( बुद्धघोष ). ३. मज्झिम १२ पहा. ' तथागतो आसभट्ठानं पटिजानाति परिसासु सीहनादं नदति, ब्रह्मचक्कं पवत्तेति.' ४. या आठ आहेत. क्षत्रिय, ब्राह्मण, गृहपति, श्रमण, चातुर्महाराजिक, त्रयस्त्रिंशत्, मार व ब्रह्म. मज्झिम १२.

" आतां, कस्सपा, असेंही शक्य आहे कीं, अन्यधर्मीय परिव्राजक म्हणतील कीं, ' श्रमण गौतम सिंहनाद करितो आणि तोही परिषदांत करितो व तो निर्धास्तपणेंही करितो; परंतु त्याला कोणी प्रश्न विचारीत नाहीं.' त्यांना म्हणावें कीं, ' असें नाहीं. श्रमण गौतम सिंहनाद करितो, तोही परिषदांत करितो, निर्धास्तपणेंही करतो व त्याला प्रश्नही विचारतात. ' असें, कस्सपा, त्यांस म्हणावें.

" आतां, कस्सपा, असेंही शक्य आहे कीं, अन्यधर्मीय परिव्राजक म्हणतील कीं, ' श्रमण गौतम सिंहनाद करितो...त्याला प्रश्नही विचारतात, परंतु त्या प्रश्नाचें तो उत्तर देत नाहीं. ' त्यांना म्हणावें कीं, ' असें नाहीं. श्रमण गौतम सिंहनाद करितो ..: त्याला प्रश्नही विचारतात, इतकेंच नव्हे तर तो त्या प्रश्नाचें उत्तरही देतो. ' असें, कस्सपा, त्यांस म्हणावें.

" आतां, कस्सपा, असें शक्य आहे कीं, अन्यधर्मीय परिव्राजक म्हणतील कीं, ' श्रमण गौतम सिंहनाद करितो ...... तो त्या प्रश्नाचें उत्तरही देतो, परंतु त्या प्रश्नाचें उत्तर देऊन तो समाधान करीत नाहीं' त्यांना म्हणावें कीं, ' असें नाहीं. श्रमण गौतम सिंहनाद करितो...... तो त्या प्रश्नाचें उत्तरही देतो, इतकेंच नव्हे तर त्या प्रश्नाचें उत्तर देऊन तो समाधानही करितो. ' असें, कस्सपा, त्यांस म्हणावें.

" आतां, कस्सपा, असेंही शक्य आहे कीं, अन्यधर्मीय परिव्राजक म्हणतील कीं, ' श्रमण गौतम सिंहनाद करितो...त्या प्रश्नाचें उत्तर देऊन तो समाधानही करितो; परंतु त्याचें भाषण ऐकण्यासारखें आहे असें कोणी मानीत नाहीं. ' त्यांस म्हणावें कीं, ' असें नाहीं. श्रमण गौतम सिंहनाद करितो ......तो त्या प्रश्नाचें उत्तर देऊन समाधानही करितो, इतकेंच नव्हे तर त्याचें भाषण ऐकण्यासारखें आहे असें सर्व मानितात' असें, कस्सपा, त्यांस म्हणावें.

" आतां, कस्सपा, असेंही शक्य आहे कीं, अन्यधर्मीय परिव्राजक म्हणतील कीं, ' श्रमण गौतम सिंहनाद करितो ...... त्याचें भाषण ऐकण्यासारखें आहे असें सर्व मानितात, पण त्याचें भाषण ऐकून लोक

प्रसन्न होत नाहींत.' त्यांना म्हणावें कीं, 'असें नाहीं. श्रमण गौतम सिंहनाद करितो ... त्याचें भाषण ऐकण्यासारखें आहे असें सर्व मानितात, इतकेंच नव्हे तर त्याचें भाषण ऐकून लोक प्रसन्नही होतात.' असें, कस्सपा, त्यांस म्हणावें.

"आतां, कस्सपा, असेंही शक्य आहे कीं, अन्यधर्मीय परिव्राजक म्हणतील कीं, 'श्रमण गौतम सिंहनाद करितो ...त्याचें भाषण ऐकून लोक प्रसन्न होतात, परंतु लोक प्रसन्न होऊन ती प्रसन्नता दाखवीत नाहींत.' त्यांना म्हणावें कीं, 'असें नाहीं. श्रमण गौतम सिंहनाद करितो ... त्याचें भाषण ऐकून लोक प्रसन्न होतात, इतकेंच नव्हे तर प्रसन्न होऊन ते ती प्रसन्नता दाखवितात.' असें कस्सपा, त्यास म्हणावें.

"आतां, कस्सपा, असेंही शक्य आहे कीं, अन्यधर्मीय परिव्राजक म्हणतील कीं, 'श्रमण गौतम सिंहनाद करितो...लोक ती प्रसन्नता दाखवितात, परंतु ते त्याप्रमाणें चालत नाहींत.' त्यांना म्हणावें कीं, 'असें नाहीं. श्रमण गौतम सिंहनाद करितो...ते ती प्रसन्नता दाखवितात, इतकेंच नव्हे तर ते त्याप्रमाणें चालतातही.' असें, कस्सपा, त्यास म्हणावें.

"आतां, कस्सपा, असेंही शक्य आहे कीं, अन्यधर्मीय परिव्राजक म्हणतील कीं, 'श्रमण गौतम सिंहनाद करितो...ते त्याप्रमाणें चालतात, परंतु ते त्याप्रमाणें चालून समाधान करीत नाहींत.' त्यांना म्हणावें कीं, 'असें नाहीं. श्रमण गौतम सिंहनाद करितो .... ते त्याप्रमाणें चालतात, इतकेंच नव्हे तर त्याप्रमाणें चालून ते समाधानही करितात.' असें कस्सपा, त्यांस म्हणावें.

२३ "एके समयीं, कस्सपा, मी राजगृहांत गृधकूट पर्वतावर रहात होतों. तेथें निग्रोध नांवाच्या तापस ब्रह्मचाऱ्यानें जुगुप्सेविषयीं मला प्रश्न विचारला. त्यावर मीं त्याचें उत्तर दिलें. उत्तर दिल्यावर त्यास अतिशय आनंद झाला."

---

१. दीघ २५. उदुंबरिकसीहनादसुत्त पहा.

" भगवंताच्या तोंडून धर्म ऐकून कोणास अतिशय आनंद होणार नाहीं ? भगवंतांच्या तोंडून धर्म ऐकून मलाही अतिशय आनंद झाला आहे. वाहवा ! भगवन्, वाहवा ! ज्याप्रमाणें, भगवन्, एखाद्यानें उलटें झालेलें सुलटें ठेवावें, अथवा झांकलेलें उघडें करावें, अथवा वाट चुकलेल्यास मार्ग सांगावा, अथवा डोळस मनुष्यांना वस्तू दिसाव्या म्हणून अंधारांत तेलाचा दिवा दाखवावा, त्याप्रमाणें भगवंतांनीं अनेक तऱ्हांनीं धर्माचा उपदेश केला आहे. तर हा मी भगवंतांस, धर्मास व भिक्षुसंघास शरण जातों. भगवंतानीं मला आपल्याजवळ प्रव्रज्या व उपसंपदा द्यावी."

२४ " कस्सपा, पूर्वीं दुसऱ्या धर्मांत असणाऱ्या मनुष्याला या धर्मांत प्रव्रज्या व उपसंपदा घेण्याची इच्छा असेल तर त्यानें चार महिने परिवासांत राहिलें पाहिजे. चार महिन्यानंतर भिक्षू तुष्ट चित्तानें त्यास प्रव्रज्या व उपसंपदा देतात व भिक्षू करितात. परंतु त्यामध्यें सुद्धां पुरुषापुरुषामध्यें भेद आहेच."

" जर, भगवन्, असें असेल तर मी चार महिने परिवासांत राहीन. भिक्षूंनीं मला प्रव्रज्या व उपसंपदा द्यावी व मला भिक्षू करावें."

अचेलक कस्सपाला भगवंतांजवळून प्रव्रज्या व उपसंपदा मिळाली व तो एकटा, निराळा, अप्रमत्त, उद्योगी, प्रहितात्म असा राहून थोड्याच कालानें ज्याकरितां कुलपुत्र घरांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतात तें श्रेष्ठ ब्रह्मचर्याचें अंतिम याच जन्मांत स्वतः जाणून, त्याचा साक्षात्कार करून घेऊन व तें प्राप्त करून घेऊन राहिला. ' जन्म संपले, ब्रह्मचर्यपालन झालें, करावयाचें तें करून झालें, यापुढें आतां कांहींही राहिलें नाहीं, ' असें त्यास कळून आलें. अचेलक कस्सप अर्हन्तांतील एक झाला.

कस्सपसीहनादसुत्त समाप्त.

---

१. महावग्ग १·१२ पहा. प्रव्रज्या म्हणजे गृहावास सोडून देऊन संन्यास घेणें व उपसंपदा म्हणजे भिक्षुसंघामध्यें प्रवेश करणें. या विषयीं विवेचन Kern. Man. Ind. Bud. pp. 76-78. येथें पहा. ' The real Ordination or Consecration takes place by the Upasampadâ, whereas the Pravrajyá is the act by which the candidate formally declares his intention to take the vows '
२. Probation महावग्ग १·३८. ३. वूपकट्ठो. ' वत्थुकामकिलेसकामेहि कायेन चेव चित्तेन च वूपकट्ठो. ' ( बुद्धघोष ). ४. पहितत्तो. ' काये च जीविते च अनपेक्खताय पेसितचित्तो विस्सट्ठअत्तभावो ' ( बुद्धघोष ). ५. अर्हत्त्वफल.

# परिशिष्ट.

वेदकालांत यज्ञयागांस अत्यंत महत्त्व होतें, परंतु पुढें त्यांचा प्रचार दिवसें-दिवस कमीकमी होत चालला हें मागें (पृ०१६७) सांगितलेंच आहे. यज्ञयाग जसजसे मागें पडत चालले तसतसे तपाचे उपक्रम अधिकाधिक वाढूं लागले, व पूर्वीच्या यज्ञांची जागा तपानें पटकाविली. पूर्वी यज्ञानें सर्व गोष्टी साध्य करून घेतां येतात अशी समजूत होती ती नाहींशी होऊन तपास अत्यंत महत्त्व चढलें. तपानें केवळ अतिमानुष सिद्धी प्राप्त होतात एवढेंच नव्हे तर त्यामुळें मुक्तीचा मार्ग सुकर होतो, किंबहुना मुक्ती प्राप्त करून घेण्याचा हा एकच मार्ग होय अशा तऱ्हेच्या कल्पना जनसमूहांत पसरूं लागल्या व तपोपक्रमांचें बंड वाढूं लागलें. हळूहळू तापसांचे निरानिराळे पंथ बनले. त्यांतील प्रत्येकांत कांहीं विशिष्ट प्रकारच्या तपोपक्रमास प्राधान्य दिलें जात असे. कोणी गोव्रतिक[1] म्हणजे गाईसारखें सर्व आचरण करणारे असत, कोणी कुक्कुरव्रतिक म्हणजे कुत्र्यासारखे वागणारे असत, कोणी जटिल[2], कोणी अग्न्युपासक कोणी स्नानानें पाप धुवून टाकणारे[3], कोणी प्रस्तुत सुत्तांत सांगितल्याप्रमाणें अचेलक वगैरे प्रकारांनीं राहणारे आजीवक, निर्ग्रंथ (अथवा जैन) असे अनेक प्रकारचे तापसांचे पंथ बुद्धाच्या कालीं अस्तित्वांत होते[4][5].

---

१. मज्झिम ५७. २. महावग्ग १. १५–२०. ३. मज्झिम १२. ४. संयुत्त ७.२.११. ५. अंगुत्तरनिकायांत एके ठिकाणीं (५.२६२) अशा दहा पंथांची यादी दिली आहे. ती अशी–आजीविक, निगंठ, मुण्डसावक, जटिलक, परिब्बाजक, मागण्डिक, तेदण्डिक, अविरुद्धक, गोतमक व देवधम्मिक.

भगवती ११.९ येथ अशा अनेक प्रकारच्या तापसांची एक यादी दिली आहे. ती अशी. ' गंगाकूलवाणपत्था तावसा—होत्तिया पोत्तिया (जहा उववाइए) कोत्तिया जण्णई सण्णई थालई हुवउट्ठा दंतुक्खलिया उम्मज्जगा संमज्जगा णिमज्जगा संपक्खाला उड्ढकंडूयगा अहोकंडूयगा दक्खिणकूलगा उत्तरकूलगा संखधमगा कूलधमगा मिगलुद्धया हत्थितावसा जलाभिसेयकढिणगत्ता अंबुवासिणो वाउवासिणो जलवासिणो वेलवासिणो अंबुभक्खिणो वाउभक्खिणो सेवालभक्खिणो मूलाहारा कंदाहारा पत्ताहारा तयाहारा पुप्फाहारा फलाहारा चीयाहारा पडिसडियकंदमूलतयपत्तपंडुत्तपुप्फफलाहारा उद्दंडगा रुक्खमूलिया मंडलिया बिलवासिणो वक्कवासिणो दिसापोक्खिणो आतावणेहिं पंचग्गितावेहिं इंगालसोल्लियं पि य कंदुसोल्लियं पि य कट्ठसोल्लियं पि य जाव अप्पाणं करेमाणा विहरंति ''.

स्वतः बुद्धांनींही संबोधीच्या पूर्वीं या तपोपक्रमांचा अवलंब केला होता. त्यांचें त्यांनीं स्वतःच पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे. ‘ हे अग्गिवेस्सन, याप्रमाणें मी परमसुखाचा, परमशांतीचा, निर्वाणाचा शोध करीत करीत मगध देशांत फिरत असतां उरुवेलेला येऊन पोहोंचलों. तेथील प्रदेश अत्यंत रमणीय होता, वनशोभा फारच चांगली होती, नदी मंद मंद वाहत होती, आसमंतात् कांहीं अंतरावर गांव वसले होते. या ठिकाणीं, हे अग्गिवेस्सन, मी माझे श्वासोच्छ्वास कोंडून घेत असें. श्वासोच्छ्वास कोंडल्यावर माझ्या मस्तकांत भयंकर वेदना उठत असत, पोटांतही अशाच वेदना उठत असत, व सगळ्या अंगाचा अत्यंत दाह होत असे. परंतु माझा उत्साह दृढ होता, जागृती कायम होती, देह मात्र दुर्बल झाला होता. इतक्या दुःखकारक वेदना होत होत्या तरी त्यांचा माझ्या चित्तावर परिणाम होत नसे.

‘ तदनंतर मीं आहार कमी करण्याचा निश्चय केला. मुगांचा किंवा कुळ-थांचा काढा पिऊनच मी रहात असें. अशा स्थितींत माझा देह अत्यंत कृश झाला. हातापायांच्या काड्या झाल्या, पाठीचा कणा स्पष्ट दिसूं लागला, मोडक्या घराच्या वांशांप्रमाणें बरगड्या खिळखिळून गेल्या, पाण्यांत पडलेलीं नक्षत्रांचीं प्रतिबिंबें जशीं खोल गेलेलीं दिसतात, त्याप्रमाणें माझ्या डोळ्यांचीं बुबळें खोल गेलीं होतीं. कडू भोपळा कच्चा कापून उन्हांत टाकिला असतां जसा कोमेजून जातो तशी माझी अंगकांती करपून गेली होती. पोट व पाठ एक झालीं होतीं. ’ ( मज्झिम ३६ ).[1]

परंतु इतका त्रास सोसूनही लोकोत्तर धर्मज्ञान प्राप्त होण्याचा थोडा देखील संभव दिसेना. तेव्हां त्यांच्या मनांत अशी शंका आली कीं, हा मार्ग चुकीचा तर नसेलना ? निर्वाणप्राप्तीचा मार्ग याहून निराळा तर नसेलना ? असा विचार मनांत येऊन त्यांनीं पुन्हां थोडेथोडें अन्न खाण्यास सुरुवात केली आणि थोडक्याच दिवसांत त्यांच्या अंगांत पुन्हां पहिल्यासारखी शक्ती आली. ते पूर्वी प्रमाणें समाधिसुखाचा अनुभव घेऊं लागले.

या अनुभवावरून तपाच्या योगानें संबोधी प्राप्त होणें अशक्य आहे ही गोष्ट स्पष्टपणें त्यांच्या लक्षांत आली व ती त्यांनीं संबोधीनंतर जो पहिला उपदेश केला—यास धर्मचक्रप्रवर्तन असें नांव आहे—त्यामध्यें सांगितली आहे. ती अशी. ‘ भिक्षूहो, प्रव्रजितानें या दोन अंतांचें सेवन करूं नये. ते दोन अंत कोणते ?

---

१. बुद्ध धर्म आणि संघ. पृ० १०-११.

चैनीचा उपभोग घेत पडणें हा एक अंत. हा हीन आहे, ग्राम्य आहे, अज्ञजन-सेवित आहे, अनार्य आहे, अनर्थावह आहे. देहदंडन करणें हा दुसरा अंत. हाही दुःखकारक आहे, अनार्य आहे, अनर्थावह आहे. म्हणून या दोन्ही अंतांना न जातां तथागतानें मध्यम मार्ग शोधून काढला आहे. हा मार्ग ज्ञानचक्षु उत्पन्न करणारा आहे, ज्ञानोदय करणारा आहे. यानेंच उपशम, अभिज्ञा, संबोध आणि निर्वाण यांची प्राप्ती होते. भिक्षूहो, हा मार्ग कोणता म्हणाल तर आर्य अष्टांगिक मार्ग होय.'[1]

परंतु तप म्हणजे अगदीं टाकाऊ व तपस्वी तेवढे येथून तेथून वाईट असें मात्र त्यांचें मत नव्हतें. तपाच्या योगानें चैनीस आळा बसतो, विषयसेवनापासून चित्त परावृत्त होतें, हें कांहीं खोटें नव्हे. एवढा त्यामधील गुण कबूल केलाच पाहिजे.[2] पण त्याबरोबरच तपोपक्रमांवर भर ठेविल्यानें देहदंडनाकडेच सर्व लक्ष लागून चित्तशुद्धीचा विसर पडतो हीही गोष्ट तितकीच खरी आहे. कायदंडापेक्षां मनोदंड केव्हांही झाला तरी श्रेष्ठच, त्यावांचून मुक्ती मिळणें अशक्य, असें असतांही तपोपक्रमांनींच मुक्ती मिळते असा जैन, आजीविक वगैरे पंथांतील तपस्व्यांचा दृढ विश्वास होता. हें भगवंतांस कबूल नव्हतें. त्यांच्या मते मनावर पूर्ण ताबा ठेवून ध्यानादिकांच्या द्वारें प्रज्ञेनें चित्ताची आश्रवांपासून विमुक्ती प्राप्त करून घेणें हाच निर्वाणप्राप्तीचा खरा मार्ग होय व या मार्गानें जाणाऱ्यासच श्रमण अथवा ब्राह्मण ही संज्ञा लाविणें योग्य होय. श्रामण्य अथवा ब्राह्मण्य तपोपक्र-मांनीं प्राप्त होण्यासारखें नाहीं. त्याकरितां मैत्रीभावना व चित्ताची प्रज्ञेनें विशुद्धी यांचा अवलंब केला पाहिजे. त्याचप्रमाणें तपोपक्रम कठिण अस-ल्यामुळें श्रामण्य अथवा ब्राह्मण्य दुष्कर आहे अथवा कळण्यासही कठीण आहे असें म्हणणें योग्य व्हावयाचें नाहीं. कारण यांच्यामुळेंच जर श्रामण्याची अथवा ब्राह्मण्याची प्राप्ती होत असती तर तें कोणाही साध्या मनुष्यास सहज प्राप्त झालें असतें. परंतु तें मैत्रीभावना व चित्ताची प्रज्ञेनें विमुक्ती यांजवर अवलंबून असल्याकारणानें शील, समाधी व प्रज्ञा यांची प्राप्ती करून घेतल्या-विना कोणासही श्रमण अथवा ब्राह्मण म्हणतां यावयाचें नाहीं.

---

१. बुद्ध, धर्म आणि संघ. पृ० २० २१. २. बौद्धांचीं धुतंगें हींही थोड्या फार प्रमाणानें तपाचे उपक्रमच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. विशुद्धिमार्ग परिच्छेद २ पहा.

हें व दुसरीं कांहीं सूत्रें[1] यांस सिंहनादसूत्रें अशी संज्ञा आहे, ती त्या सूत्रांच्या रचनेवरून पडली आहे. सिंहनाद म्हणजे श्रेष्ठनाद अथवा अभीतनाद. या सर्व सूत्रांमधून भगवंतांनीं सिंहाप्रमाणें गर्जना केली आहे. अर्थात् सिंह ज्याप्रमाणें कोणासही घाबरत नाहीं त्याप्रमाणें स्वतःच्या सामर्थ्याची जाणीव असल्यामुळें निर्भयपणें, कोणासही न घाबरतां, कोणाचीही परवा न ठेवितां, सरळ व स्पष्ट रितीनें आपलीं मतें सांगितलीं आहेत म्हणून त्यांस सिंहनादसूत्रें असें नांव आहे.

---

१ चूलसीहनादसुत्त ( मज्झिम ११ ), महासीहनादसुत्त ( मज्झिम १२ ), उदुंबरिकसीहनादसुत्त ( दीघ २५ ) व चक्कवत्तिसीहनादसुत्त ( दीघ २६ ). अंगुत्तरनिकायाच्या नवकनिपातांतील दुसऱ्या वग्गासही सीहनादवग्ग अशीच संज्ञा आहे.

# ९ पोट्ठपादसुत्त.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके समयीं भगवान् [ बुद्ध ] श्रावस्ती-नगरींत जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होते. त्यावेळीं पोट्ठपाद नांवाचा परिव्राजक तीनशें परिव्राजकांच्या मोठ्या समुदायासह मल्लिका देवीनें निरनिराळ्या धर्मप्रचारांविषयीं चर्चा व्हावी म्हणून बांधलेल्या तिंदुक वृक्षांनीं परिवेष्टित अशा एकशालक नांवाच्या आरामांत रहात होता.

---

१. सावत्थी. कोसलदेशाची राजधानी. Buddhist India p. 40 पहा 'The exact site of Sárvastï, being buried in the jungles of Nepal, is not known, but its approximate position to the north-east of Nepalganj or Bánki has been determined.' Smith Early History of India. p. 27 note.

भगवान् बुद्ध राजगृह नगरांत सीतवनांत असतां श्रावस्तीनगरींतील सुदत्त नांवाचा श्रेष्ठी तेथें आला व बुद्धाची कीर्ति ऐकून त्याच्या दर्शनास गेला. बुद्धाचा उपदेश ऐकून तो उपासक बनला व दुसऱ्या दिवशीं बुद्धप्रमुख भिक्षुसंघास जेवावयास बोलावून त्यांस श्रावस्तीस आपल्या येथें येण्याची त्यानें विनंति केली. श्रावस्तीनगरींत सुदत्तास जेतकुमाराचें जेतवन पसंत पडलें व तें त्यानें सोन्याचीं नाणीं जमिनीवर पसरून तेवढ्या किमतीस विकत घेतलें. थोड्याशा भागास मात्र तीं नाणीं पुरेनात, म्हणून जेतकुमारानें तो फुकट देऊन टाकिला. तेथें नंतर सुदत्तानें मोठा विहार बांधून भिक्षुसंघाच्या स्वाधीन केला. तेथें भगवान् बुद्धांनीं अनेक महत्त्वाचे उपदेश केले. सुदत्तास अनाथपिण्डिक असेंही म्हणत, म्हणून त्या विहाराचें नांव अनाथपिण्डिकाचा आराम असें पडलें. चुल्लवग्ग ६.४,९. Kern. Man. Ind. Bud. p. 24 Note 4 पहा.

श्रावस्तीनगरी श्रावस्त नांवाच्या राजानें वसविली असें संस्कृत ग्रंथांतून आढळतें. महाभारत ३.२०. मत्स्यपुराण १२.३० वगैरे.

२. सं. प्रोष्ठपादः descendent of प्रोष्ठपद or born under प्रोष्ठपदा नक्षत्र. 'तो मोठा ब्राह्मण असून तीस कोटी धन सोडून देऊन तीर्थियांचा आचार्य बनला होता.' ( बुद्धघोष ). ३. कोसलदेशाचा राजा पसेनदि याची राणी. ४. समयप्पवादके. 'त्या जागीं तारुक्ख, पोक्खरसाती वगैरे ब्राह्मण व निगण्ठ, अचेलक, परिव्राजक वगैरे प्रव्रजित येऊन आपआपल्या मतांविषयीं वादविवाद करीत' ( बुद्धघोष ). ५. एकसालके. 'तेथें पहिल्यानें एकच शाला होती, म्हणून पुढें जरी अनेक शाला झाल्या तरी त्यास एकशालक असेंच म्हणत' ( बुद्धघोष ). Known by the name of 'The Hall' ( Rh. D ).

२ तेव्हां भगवान् सकाळींच वस्त्रपरिधान करून पात्र व चीवर घेऊन श्रावस्तीनगरींत भिक्षेसाठीं गेले. तितक्यांत त्यांस वाटलें कीं, 'श्रावस्तीनगरींत भिक्षेसाठीं आतां जाणें फारच लवकर होईल. तर पोट्ठपाद परिव्राजक जेथें राहतो त्या मल्लिका देवीनें निरनिराळ्या धर्मप्रचारांविषयीं चर्चा व्हावी म्हणून बांधलेल्या तिंदुक वृक्षांनीं परिवेष्टित अशा एकशालक नांवाच्या आरामांत जावें हें बरें.' असा विचार करून भगवान् तिकडे गेले.

३ त्यावेळीं पोट्ठपाद गोंगाट करणाऱ्या, उच्च स्वरानें व मोठमोठ्यानें बोलणाऱ्या, राजे, चोर, महामात्य, सेना, भय, युद्ध, अन्न, पान, वस्त्र, शयन, माला, गंध, ज्ञाति, यान, ग्राम, निगम, नगर, जनपद, स्त्री, शूर, विशिखा, कुंभस्थान, पूर्वप्रेत, इत्यादिकांच्या व दुसऱ्या अनेक निरर्थक कथा, लोकाख्यायिका, समुद्राख्यायिका, इतिभवाभवकथा, इत्यादि अनेक प्रकारचे ग्राम्य कथालाप[1] करीत बसलेल्या परिव्राजकांच्या मोठ्या समुदायासह तेथें बसला होता.

४ पोट्ठपाद परिव्राजकानें भगवंतांना दुरून येतांना पाहिलें व आपल्या मंडळीस 'कृपा करून हळू बोला, मुळींच आवाज करूं नका, हा श्रमण गौतम येत आहे. त्याला शांतवृत्ति आवडते व तिचीच तो स्तुती करितो. कदाचित् मंडळी शांत आहेत असें पाहून त्यांस येथें यावें असें वाटेल,' असें म्हणून शांत केलें. असें तो म्हणाल्यावर ते परिव्राजक स्तब्ध राहिले.

५ नंतर भगवान् पोट्ठपाद परिव्राजकाकडे आले. तेव्हां पोट्ठपाद परिव्राजक त्यांस म्हणाला, 'यावें, भगवंतांनीं यावें! भगवंतांचें स्वागत असो! फार दिवसांनीं भगवंतांनीं इकडे यावयाचा विचार केला[2]! बसावें भगवंतांनीं. हें आसन घातलेलें आहे.' तेव्हां भगवान् त्या आसनावर बसले. पोट्ठपाद परिव्राजकही एके बाजूस लहानसें आसन घेऊन त्या-

---

१. ब्रह्मजालसुत्त. (दीघ १·१·१७) पहा. २. परियायमकासि यदिदं इधागमनाय.

वर बसला. तेव्हां भगवान् त्यास म्हणाले, ' पोट्ठपादा, कोणत्या गोष्टीं-संबंधानें कथा चालल्या होत्या ? कोणत्या गोष्टींचा माझ्या आगमनामुळें भंग झाला ? '

६ असें ते बोलल्यावर पोट्ठपाद त्यांस म्हणाला, " आमच्या ज्या गोष्टी चालल्या होत्या त्या राहूं द्या. भगवंतांना या गोष्टी पुढें केव्हांतरी ऐकणें कांहीं कठीण नाहीं. पूर्वीं, भगवन्, अनेक तीर्थ्य, श्रमण व ब्राह्मण कुतूहलशालेंत एकत्र बसले असतां त्यांचा अभिसंज्ञानिरोधावर वाद-विवाद चालला होता कीं, ' अभिसंज्ञानिरोध कसा होतो ? '

" तेव्हां कांहीं म्हणाले, ' हेतूशिवाय, कारणाशिवाय, पुरुषाला संज्ञा प्राप्त होतात व नाहिशा होतात. ज्या वेळीं त्यास संज्ञा प्राप्त होतात त्या-वळा ता संज्ञी होतो व ज्यावेळीं त्या नाहिशा होतात त्यावेळीं तो असंज्ञी होतो. ' याप्रमाणें कांहीं जणांनीं अभिसंज्ञानिरोध समजावून सांगितला.

" तेव्हां दुसरा एकजण म्हणाला, ' हें अशा रितीनें होत नाहीं. संज्ञा हा पुरुषाचा आत्मा[1] आहे; व ती येते व जाते. ज्यावेळीं ती येते त्यावेळीं पुरुष संज्ञी होतो, ज्यावेळीं जाते त्यावेळीं असंज्ञी होतो. ' या-प्रमाणें दुसऱ्या कांहीं जणांनीं अभिसंज्ञानिरोध समजावून सांगितला.

" त्यांस दुसरा एकजण म्हणाला, ' हें अशा रितीनें होत नाहीं. महान् प्रतापी असे कांहीं श्रमण व ब्राह्मण[2] आहेत. ते त्या पुरुषाची संज्ञा त्यास प्राप्त करून देतात व त्याजपासून ती काढून नेतात. ज्यावेळीं ते ती त्यास प्राप्त करून देतात त्यावेळीं तो संज्ञी होतो, ज्यावेळीं काढून नेतात त्यावेळीं असंज्ञी होतो. ' याप्रमाणें दुसऱ्या कांहीं जणांनीं अभि-संज्ञानिरोध समजावून सांगितला.

---

१. मिगसिंग नांवाच्या तपस्व्यानें घोर तप आरंभिलें म्हणून शक्रानें अलंबुसा नांवाची देवकन्या त्याजकडे पाठविली. तिच्या स्पर्शानें मोहित होऊन तो तीन वर्षें विसंज्ञ होता. या कथेस अनुसरून तो असें म्हणाला (बुद्धघोष). जातक ५२३ पहा.

२. 'आथर्वणिक अथर्वण मंत्रांच्या योगें प्राण्यास डोकें फटलेला, हात तुटलेला, मेलेला असा करून दाखवितात व पुन्हां पूर्वीसारखा करून दाखवितात, हें पाहून तो असें म्हणाला ' ( बुद्धघोष ).

" त्यांस दुसरा एकजण म्हणाला, ' हें अशा रीतीनें होत नाहीं. महान् प्रतापी अशा कांहीं देवता आहेत. त्या त्या पुरुषाची संज्ञा त्यास प्राप्त करून देतात व त्याजपासून ती काढून नेतात. ज्यावेळीं ती त्यास प्राप्त करून देतात त्यावेळीं तो संज्ञी होतो, व ज्यावेळीं काढून नेतात त्यावेळीं असंज्ञी होतो. ' याप्रमाणें दुसऱ्या कांहीं जणांनीं अभिसंज्ञा-निरोध समजावून सांगितला. त्यावेळीं मला भगवंतांची आठवण झाली कीं, भगवान्, सुगत आहेत. त्यांस या गोष्टी उत्तम रीतीनें माहीत आहेत ! भगवंतांना अभिसंज्ञानिरोध कसा होतो हें माहीत आहे. तर अभिसंज्ञानिरोध कसा होतो ? "

७ " पोट्ठपादा, जे श्रमण व ब्राह्मण 'हेतूशिवाय, कारणाशिवाय, पुरुषास संज्ञा प्राप्त होतात व त्यापासून नाहिशा होतात, ' असें म्हणतात, त्यांचें मूळपासूनच चुकलेलें आहे. ते कां तर, पोट्ठपादा, हेतूनें, कारणानें, पुरुषास संज्ञा उत्पन्न होतात व नाहिशा होतात. शिक्षेनें कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व शिक्षेनेंच कांहीं संज्ञा नाहिशा होतात. " भगवान् पुढें म्हणाले, " आणि ती शिक्षा कोणती ?

"[सामञ्ञफलसुत्त ४०-६२ प्रमाणें]. हेंही एक प्रकारचें शीलच झालें.

८–९ " [ सामञ्ञफलसुत्त ६३–७४ प्रमाणें ].

१० " याप्रमाणें हीं पांच नीवरणें आपल्या मधून निघून गेलेलीं पाहून त्यास आनंद प्राप्त होतो; आनंदित झाला म्हणजे प्रीति उत्पन्न होते, प्रीतीमुळें शरीर शांत होतें; शरीर शांत झालें म्हणजे सुखाचा आस्वाद घेतां येतो; व सुख झालें असतां चित्त समाधीकडे वळतें. नंतर विषयसुख व अकुशल धर्म यांजपासून वेगळा होऊन वितर्क व विचार यांनीं युक्त, एकांतामुळें उत्पन्न झालेल्या प्रीतीनें व सुखानें परिपूर्ण असें प्रथम ध्यान संपादन करून घेऊन त्यांत तो विहार करितो. त्याची

---

१. ' यक्षदासी सर्व रात्र नृत्य व गायन यांचे योगानें देवतांची सेवा करून अरुणोदयसमयीं एक भांडें भरून सुरा पिऊन निजतात व उशिरां उठतात, म्हणून त्यांस वाटतें कीं, निजलेल्या असतां त्या निरोधसमापन्न असतात ' ( बुद्धघोष ).

जी पूर्वींची कामसंज्ञा असते ती विनाश पावते व विवेकापासून उत्पन्न झालेली प्रीति व सुख यांनीं युक्त, सूक्ष्म पण सत्य संज्ञा त्यास प्राप्त होते व त्या संज्ञेनें युक्त असा तो होतो. याप्रमाणें शिक्षेनें कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व शिक्षेनेंच कांहीं संज्ञा नाहिशा होतात. हीच ती शिक्षा." असें भगवान् म्हणाले.

११ "पुन्हां, पोट्ठपादा, वितर्क व विचार यांचा लोप झाल्यावर जी चित्ताची प्रसन्नता, जी चित्ताची एकाग्रता, तिनें युक्त, वितर्कविचार-विरहित व समाधीपासून उत्पन्न झालेल्या प्रीतीनें व सुखानें युक्त असें द्वितीय ध्यान संपादन करून घेऊन तो त्यांत विहार करितो. त्याची जी पूर्वींची विवेकापासून उत्पन्न झालेली प्रीति व सुख यांनीं युक्त, सूक्ष्म पण सत्य संज्ञा असते ती विनाश पावते व समाधीपासून उत्पन्न झालेली प्रीति व सुख यांनीं युक्त पण सत्य संज्ञा त्यास प्राप्त होते, व त्या संज्ञेनें युक्त असा तो होतो. याप्रमाणें शिक्षेनें कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व शिक्षेनेंच कांहीं संज्ञा नाहिशा होतात. हीच ती शिक्षा." असें भगवान् म्हणाले.

१२ "पुन्हां, पोट्ठपादा, प्रीतीच्या त्यागानें तो उपेक्षायुक्त होतो व स्मृतिमान् होत्साता समाधिसुखाचा अनुभव घेतां, व ज्यायोगें त्याला आर्यजन उपेक्षायुक्त, स्मृतिमान् आणि सुखी असें म्हणतात, अशाप्रकारचें तृतीय ध्यान संपादन करून घेऊन तो त्यांत विहार करितो. त्याची जी पूर्वींची समाधीपासून उत्पन्न झालेली प्रीति व सुख यांनीं युक्त, सूक्ष्म पण सत्य संज्ञा असते ती विनाश पावते व उपेक्षेच्या सुखानें युक्त अशी सूक्ष्म पण सत्य संज्ञा त्यास प्राप्त होते, व त्या संज्ञेनें युक्त असा तो होतो. याप्रमाणें शिक्षेनें कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व शिक्षेनेंच कांहीं संज्ञा नाहिशा होतात. हीच ती शिक्षा." असें भगवान् म्हणाले.

१३ "पुन्हां, पोट्ठपादा, सौमनस्य आणि दौर्मनस्य यांचा पूर्वींच नाश झाल्यावर सुख आणि दुःख यांचा निरोध करून तो सुखदुःख-विरहित व उपेक्षा आणि स्मृति यांनीं परिशुद्ध असें चतुर्थ ध्यान संपा-

दन करून घेऊन त्यांत विहार करितो. त्याची जी पूर्वीची उपेक्षेच्या सुखानें युक्त अशी सूक्ष्म पण सत्य संज्ञा असते ती विनाश पावते व अदुःख व असुख अशी सूक्ष्म पण सत्य संज्ञा त्यास प्राप्त होते, व त्या संज्ञेनें युक्त असा तो होतो. याप्रमाणें शिक्षेनें कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व शिक्षेनेंच कांहीं संज्ञा नाहिशा होतात. हीच ती शिक्षा.'' असें भगवान् म्हणाले.

१४ '' पुन्हां, पोट्ठपादा, भिक्षू पूर्णपणें रूपसंज्ञेचें अतिक्रमण करून, प्रतिघसंज्ञेचा अस्त करून, नानात्वसंज्ञा विचारांत न घेऊन, आकाश अनंत आहे अशा समजुतीनें आकाशानन्त्यायतन प्राप्त करून घेऊन त्यामध्यें विहार करितो. त्याची ती पूर्वीची रूपसंज्ञा विनाश पावते व आकाशाविषयीं सूक्ष्म पण सत्य संज्ञा त्यास प्राप्त होते, व त्या संज्ञेनें युक्त असा तो होतो. याप्रमाणें शिक्षेनें कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व शिक्षेनेंच कांहीं संज्ञा नाहिशा होतात. हीच ती शिक्षा. '' असें भगवान् म्हणाले.

१५ '' पुन्हां, पोट्ठपादा, भिक्षू पूर्णपणें आकाशानन्त्यायतनाचें अतिक्रमण करून विज्ञान अनंत आहे अशा समजुतीनें विज्ञानानन्त्यायतन प्राप्त करून घेऊन त्यामध्यें विहार करितो. त्याची ती पूर्वीची आकाशानन्त्यायतनाची संज्ञा विनाश पावते व विज्ञानानन्त्यायतनाविषयीं सूक्ष्म पण सत्य संज्ञा त्यास प्राप्त होते, व त्या संज्ञेनें युक्त असा तो होतो. याप्रमाणें शिक्षेनें कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व शिक्षेनेंच कांहीं संज्ञा नाहिशा होतात. हीच ती शिक्षा. '' असें भगवान् म्हणाले.

१६ '' पुन्हां, पोट्ठपादा, भिक्षू पूर्णपणें विज्ञानानन्त्यायतनाचें अतिक्रमण करून कांहीं नाहीं अशा समजुतीनें आकिंचन्यायतन प्राप्त करून घेऊन त्यामध्यें विहार करितो. त्याची ती पूर्वीची विज्ञानानन्त्यायतनाची संज्ञा विनाश पावते व आकिंचन्यायतनाविषयीं सूक्ष्म पण सत्य संज्ञा त्यास प्राप्त होते, व त्या संज्ञेनें युक्त असा तो होतो. याप्रमाणें शिक्षेनें कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व शिक्षेनेंच कांहीं संज्ञा नाहिशा होतात. हीच ती शिक्षा. '' असें भगवान् म्हणाले.

१७ " जेव्हांपासून, पोट्ठपादा, त्याला [प्रथमध्यानादिकांनीं] स्वतःची संज्ञा होते व जेव्हांपासून तो वरवर जात जात संज्ञेच्या अग्रस्थानीं जाऊन पोहोंचतो, तेव्हां त्यास वाटतें कीं, ' विचार करणें हें वाईट होय. विचार न करणें हें श्रेष्ठ होय. जर मी विचार करीन व संस्कार उत्पन्न करीनें, तर या माझ्या संज्ञा विनाश पावतील व दुसऱ्या स्थूल संज्ञा उत्पन्न होतील. म्हणून मी विचार करणार नाहीं व ते संस्कार उत्पन्न करणार नाहीं. ' असें म्हणून तो विचार करीत नाहीं व संस्कार उत्पन्न करीत नाहीं.[3] असें केल्यानें त्या संज्ञा विनाश पावतात व दुसऱ्या स्थूल संज्ञा उत्पन्न होत नाहींत, आणि तो निरोधाप्रत जातो. अशा रितीनें, पोट्ठपादा, क्रमेंकरून त्यास स्मृतियुक्त संज्ञानिरोध प्राप्त होतो.

१८ " तर तुला काय वाटतें, पोट्ठपादा ? तूं पूर्वीं कधीं अशा तऱ्हेचा क्रमानें प्राप्त होणारा संज्ञानिरोध ऐकिला आहेस काय ? "

" नाहीं, भगवन्, परंतु आतां आपण सांगितल्याप्रमाणें मला तो कळला आहे. "

" ठीक, पोट्ठपादा. "

१९ " भगवन्, आपण संज्ञेचें एकच अग्र सांगतां कीं अनेक ? "

१. 'आकिञ्चञ्ञायतन. कारण लौकिक दृष्टीनें तें कार्यसाधक असतें. त्यापासून पुढें नेवसञ्ञानासञ्ञायतन अथवा निरोध समापत्ती यांप्रत जातां येतें. ' (बुद्धघोष). २. अभिसंखरेय्यं. ' उपरिसमापत्तिअत्थाय निकन्तिं कुरुमानो अभिसंखरोति नाम ' ( बुद्धघोष ). सं अभिसंस्कृ to form. to model ( a thought ). ३. आकिञ्चञ्ञायतनापासून तो वर नेवसञ्ञानासञ्ञायतनाप्रत जातो तेव्हां एक दोन चित्तक्षण तेथें राहतो, परंतु त्याचें सर्व लक्ष वरवर जाण्याकडे असतें. म्हणून विचार करीन असतांही तो विचार करीत नाहीं. यास एक सुरेख दाखला आहे. मुलाच्या घरास जाण्यास बापाच्या घरांतून रस्ता होता मुलाच्या घरांतून उत्तम अन्न घेऊन पुढील दारीं आसनशालेंत बसलेल्या पोरास एका भिक्षूनें हें कोठून आणलें असें विचारिलें. तेव्हां त्या पोरानें मुलाच्या घराकडे बोट दाखविलें. बापाच्या घरांतून जरी जावें लागत होतें तरी त्याचें त्यास भानही राहिलें नाहीं. त्या पुढील दारच्या आसनशालेप्रमाणें आकिञ्चञ्ञायतन होय बापाच्या घराप्रमाणें नेवसञ्ञानासञ्ञायतनसमापत्ति. मुलाच्या घराप्रमाणें निरोधसमापत्ति. ज्याप्रमाणें बापाच्या घरामधून मुलाच्या घराकडे जात असतां बापाच्या घराकडे लक्ष रहात नाहीं, तसें आकिञ्चञ्ञायतनापासून निरोधसमापत्तीकडे जात असतां नेवसञ्ञानासञ्ञायतनामध्यें एक दोन चित्तक्षण थांबला असतांही त्याकडे लक्ष रहात नाहीं. ( बुद्धघोष ).

"पोट्टपादा, मी संज्ञेचें अग्र एकच आहे असेंही सांगतों व अनेक आहेत असेंही सांगतों."

"भगवन्, संज्ञेचें अग्र एकही आहे व अनेकही आहेत असें आपण कसें सांगतां?"

"पोट्टपादा, जसजसा एखादा निरोध प्राप्त करून घेतो तसतसा मी त्याच्या संज्ञेचें अग्र सांगतों. अशा रितीनें, पोट्टपादा, मी संज्ञेचें अग्र एक आहे असेंही सांगतों व अनेक आहेत असेंही सांगतों."[1]

२० "भगवन्, संज्ञा प्रथम व मग ज्ञान अशीं उत्पन्न होतात, कीं प्रथम ज्ञान व मग संज्ञा अशीं उत्पन्न होतात, कीं संज्ञा व ज्ञान हीं आधीं मागून अशीं उत्पन्न न होतां एकदमच उत्पन्न होतात?"

"पोट्टपादा, संज्ञा प्रथम उत्पन्न होते व मग ज्ञानें.[2] संज्ञेच्या उत्पादानें ज्ञानाचा उत्पाद होतो. [ कारण ] मनुष्याला तिजपासून ज्ञान उत्पन्न झालें असें कळतें. या रितीनें, पोट्टपादा, संज्ञा प्रथम व मग ज्ञान, संज्ञेच्या उत्पादानें ज्ञानाचा उत्पाद होतो असें जाणावें."

२१ "भगवन्, संज्ञा हा पुरुषाचा आत्मा कीं संज्ञा व आत्मा हे निरनिराळे?"

"कोणत्या आत्म्याविषयीं, पोट्टपादा, तूं बोलतोस?[3]"

"भगवन्, रूपी, चतुर्महाभूतांपासून उत्पन्न झालेल्या, व अन्नावर पोसला जाणाऱ्या आत्म्याविषयीं मी बोलतों."

१ पठवीकसिणादिकांची ध्यानांच्या योगानें एकदां प्राप्ति करून घेतांना मागील संज्ञेचा एकदां निरोध होतो, अनेकदां प्राप्ति करून घेतांना अनेकदां निरोध होतो. याप्रमाणें पठवीकसिणादिकांची एकदांप्राप्ति करून घेतांना किंवा सर्व मिळून एकदम प्राप्त करून घेतांना संज्ञेचें एकच अग्र असतें, वेगवेगळीं प्राप्त करून घेतांना अनेक असतात. ( बुद्धघोष ). २. संज्ञा म्हणजे ध्यानसंज्ञा, ज्ञान म्हणजे विपश्यनाज्ञान; अथवा संज्ञा म्हणजे विपश्यनासंज्ञा, ज्ञान म्हणजे मार्गज्ञान; अथवा संज्ञा म्हणजे मार्गसंज्ञा, ज्ञान म्हणजे फलज्ञान; अथवा ( तिपिटकमहासिवत्थेर म्हणतो त्याप्रमाणें ) संज्ञा म्हणजे फलसंज्ञा, ज्ञान म्हणजे प्रत्यवेक्षणज्ञान ( बुद्धघोष ). ३. पच्चेसि. आश्रय घेतोस, go back, fall back upon. ४. यास उपनिषदांत अन्नमय व प्राणमय अशीं नांवें आहेत ( टका ).

"पोट्ठपादा, अशा तऱ्हेचा स्थूल असा जरी आत्मा असला तरी मी म्हणतों कीं, संज्ञा व आत्मा हे निरनिराळे आहेत. हें पुढील रितीनेंही, पोट्ठपादा, कळून येईल. रूपी, चतुर्महाभूतांपासून उत्पन्न झालेला व अन्नावर पोसला जाणारा आत्मा तसाच राहतो, पण पुरुषाला कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व दुसऱ्या कांहीं विनाश पावतात. या रितीनेंही, पोट्ठपादा, संज्ञा व आत्मा निरनिराळे आहेत हें जाणावें."

२२ "भगवन्, मनोमय, सर्वांगपरिपूर्ण व सर्व इंद्रियांनीं पूर्णपणें युक्त अशा आत्म्याविषयीं मी बोलतों."

"पोट्ठपादा, मनोमय, सर्वांगपरिपूर्ण व सर्व इंद्रियांनीं पूर्णपणें युक्त असा जरी आत्मा असला तरी मी म्हणतों कीं, संज्ञा व आत्मा हे निरनिराळेच आहेत. हें पुढील रितीनेंही, पोट्ठपादा, कळून येईल. मनोमय, सर्वांगपरिपूर्ण व सर्व इंद्रियांनीं पूर्णपणें युक्त आत्मा तसाच राहतो, पण पुरुषाला कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व दुसऱ्या कांहीं विनाश पावतात. या रितीनेंही, पोट्ठपादा, संज्ञा व आत्मा निरानिराळे आहेत हें जाणावें.'

२३ "भगवन्, अरूपी व संज्ञामय अशा आत्म्याविषयीं मी बोलतों."[1]

"पोट्ठपादा, अरूपी व संज्ञामय असा जरी आत्मा असला तरी मी म्हणतों कीं संज्ञा व आत्मा हे निरनिराळेच आहेत. हें पुढील रितीनेंही, पोट्ठपादा, कळून येईल. अरूपी व संज्ञामय आत्मा तसाच राहतो, पण पुरुषाला कांहीं संज्ञा उत्पन्न होतात व दुसऱ्या कांहीं विनाश पावतात. या रितीनेंही, पोट्ठपादा, संज्ञा व आत्मा निरानिराळे आहेत हें जाणावें."

२४ "तर मग, भगवन्, पुरुषाची संज्ञा हाच त्याचा आत्मा, कीं संज्ञा व आत्मा हे निरनिराळे आहेत, हें मला कळणें शक्य आहे काय?"

"पोट्ठपादा, तुझीं मतें निराळीं, आवड निराळी, रुचि निराळी, तुझे प्रयत्न निराळ्या गोष्टींसंबंधानें, तुझे गुरु निराळे, तेव्हां पुरुषाची संज्ञा हाच त्याचा आत्मा कीं संज्ञा व आत्मा हे निरानिराळे हें कळणें तुला बरेंच कठीण जाईल."

---

१. आनंदमय व विज्ञानमय ( टीका ).

२५ " भगवन्, असें असेल तर [ मला आपण एवढें तरी सांगावें कीं, ] जग शाश्वत आहे काय ? हेंच खरें असून दुसरें सर्व खोटें आहे काय ? "

" पोट्ठपादा, जग शाश्वत आहे, हेंच खरें असून दुसरें सर्व खोटें आहे, असें मीं कधींही म्हटलें नाहीं. "

" पण, भगवन्, जग अशाश्वत आहे काय ? "

" पोट्ठपादा, असें मीं कधींही म्हटलें नाहीं. "

" पण, भगवन्, जग अन्तवान् आहे काय ? "

" पोट्ठपादा, असें मीं कधींही म्हटलें नाहीं. "

" पण, भगवन्, जग अनन्त आहे काय ? "

" पोट्ठपादा, असें मीं कधींही म्हटलें नाहीं. "

२६ " पण, भगवन्, जीव व शरीर एकच आहेत काय ? "

" पोट्ठपादा, असें मीं कधींही म्हटलें नाहीं. "

" पण, भगवन्, जीव व शरीर निराळे आहेत काय ? "

" पोट्ठपादा, असें मीं कधींही म्हटलें नाहीं. "

२७ " पण, भगवन्, तथागत मरणानंतर असतो काय ? "

" पोट्ठपादा, असें मीं कधींही म्हटलें नाहीं. "

" पण, भगवन्, तथागत मरणानंतर नसतो काय ? "

" पोट्ठपादा, असें मीं कधींही म्हटलें नाहीं. "

" पण, भगवन्, तथागत मरणानंतर असतोही व नसतोही असें होतें काय ? "

" पोट्ठपादा, असें मीं कधींही म्हटलें नाहीं. "

" पण, भगवन्, तथागत मरणानंतर असतो असेंही नाहीं व नसतो असेंही नाहीं असें होतें काय ? "

" पोट्ठपादा, असें मीं कधींही म्हटलें नाहीं. "

---

१. या दहा प्रश्नांस दश अव्याकृतें असें नांव आहे. मज्झिम ६३, ७२. मागें पृष्ठ १८० पहा.

२८ " भगवन्, असें आपण कां म्हटलें नाहीं ? "

" पोट्ठपादा, हें अर्थयुक्त नाहीं, धर्मयुक्त नाहीं, ब्रह्मचर्याला आवश्यक नाहीं, व तें निर्विदा, विराग, निरोध, उपशम, अभिज्ञा, संबोध, निर्वाण यांप्रत नेत नाहीं. म्हणून मीं असें केव्हांही सांगितलें नाहीं. "

२९ " मग, भगवन्, आपण काय सांगितलें आहे ? "

" पोट्ठपादा, हें दुख आहे, हें दुःखाचें कारण आहे, अशा रितीनें दुःखाचा परिहार होतो व दुःखपरिहाराचा मार्ग हा, हें मीं सांगितलें आहे. "

३० " भगवन्, असें आपण कां सांगितलें आहे ? "

" पोट्ठपादा, हें अर्थयुक्त आहे, धर्मयुक्त आहे, ब्रह्मचर्याला आवश्यक आहे व तें निर्विदा, विराग, निरोध, उपशम, अभिज्ञा, संबोध, निर्वाण यांप्रत नेतें. म्हणून मीं असें सांगितलें आहे. "

" असेंच आहे, भगवन्, असेंच आहे, सुगत. आतां आपली मर्जी.' तेव्हां भगवान् आसनावरून उठून तेथून निघून गेले.

३१ भगवान् उठून गेल्यावर लगेच ते परिव्राजक पोट्ठपादाच्या भोंवतीं जमून बोलबोलून त्रास देऊन त्याची थट्टा करूं लागले कीं, "असाच हा पोट्ठपाद ! श्रमण गौतम जें जें म्हणेल त्याला ' असेंच आहे, असेंच आहे,' असें म्हणून अनुमोदन देतो. आम्हाला तर श्रमण गौतमानें जग शाश्वत आहे... यांपैकीं एखाद्या प्रश्नावर ठाम मत दिलें आहे असें माहीत नाहीं."

असें ते म्हणाल्यावर पोट्ठपाद परिव्राजक त्यांस म्हणाला, " जग शाश्वत आहे... यांपैकीं एखाद्या प्रश्नावर श्रमण गौतमानें ठाम मत दिल्याचें मलाही माहीत नाहीं. परंतु श्रमण गौतम खरा, तथ्य, सत्य, धर्मयुक्त व धर्मनियामक मार्ग सांगतो व असें तो सांगत असतां माझ्यासारख्या शहाण्या मनुष्यानें जें बरोबर सांगितलें आहे तें तसें आहे असें म्हणून अनुमोदन कसें न द्यावें ? "

१. आदि ब्रह्मचरियकं. २. हीं चार आर्यसत्यें होत. बुद्ध, धर्म आणि संघ २१, १०३ पहा. ३. वाचाय सन्नितोदकेन संजंभरियमकंसु.

३२ त्यानंतर दोन तीन दिवसांनीं चित्त नांवाचा महाताचा मुलगा व पोट्ठपाद परिव्राजक हे भगवंतांकडे गेले. तेथें चित्त भगवंतांस अभिवादन करून एके बाजूस बसला, परंतु पोट्ठपाद परिव्राजक भगवंतांस कुशल प्रश्न विचारून एके बाजूस बसला व म्हणाला, "त्या दिवशीं आपण उठून गेल्यावर लगेच परिव्राजक माझ्या भोंवतीं जमून बोलबोलून त्रास देऊन माझी थट्टा करूं लागले कीं, 'असाच हा पोट्ठपाद !... माहीत नाहीं.'

"असें ते म्हणाल्यावर मी त्यांस म्हणालों, 'जग शाश्वत आहे... अनुमोदन कसें न द्यावें ?' "

३३ "पोट्ठपादा, ते सर्व परिव्राजक अंध आहेत. त्यांना डोळे नाहींत. त्यांमध्यें तुलाच एकट्याला डोळे आहेत. कांहीं गोष्टी मीं खात्रीपूर्वक सांगितल्या आहेत, पण कांहीं संदिग्ध रितीनें सांगितल्या आहेत. पोट्ठपादा, संदिग्ध ठेविलेल्या गोष्टी कोणत्या तर जग शाश्वत आहे...तथागत मरणानंतर असतो असेंही नाहीं व नसतो असेंही नाहीं. या गोष्टी मी संदिग्ध ठेविल्या आहेत. पोट्ठपादा, त्या मीं अशा संदिग्ध कां ठेविल्या तर त्या अर्थयुक्त नाहींत, धर्मयुक्त नाहींत, ब्रह्मचर्याला आवश्यक नाहींत व त्या निर्विदा, विराग, निरोध, उपशम, अभिज्ञा, संबोध, निर्वाण यांप्रत नेत नाहींत. म्हणून मीं या गोष्टी संदिग्ध ठेविल्या आहेत. आणि, पोट्ठपादा, खात्रीपूर्वक सांगितलेल्या गोष्टी कोणत्या तर दुःख कोणतें, दुःखाचें कारण कोणतें, कोणत्या रितीनें दुःखाचा परिहार होईल व दुःखपरिहाराचा मार्ग कोणता. या गोष्टी मीं खात्रीपूर्वक सांगितल्या आहेत. त्या मी खात्रीपूर्वक कां सांगितल्या तर त्या अर्थयुक्त आहेत, धर्मयुक्त आहेत, ब्रह्मचर्याला आवश्यक आहेत व त्या निर्विदा, विराग, निरोध, उपशम, अभिज्ञा, संबोध, निर्वाण यांप्रत नेतात. म्हणून मीं त्या गोष्टी खात्रीपूर्वक सांगितल्या आहेत.

---

१. त्यानें भिक्षू होऊन तिन्ही पिटकांचा अभ्यास केला होता. तो अर्थांतील बारिकसारिक भेद ओळखिण्यांत फार कुशल होता. परंतु तो सातदां संघ सोडून देऊन गृहस्थ बनला होता. पोट्ठपाद त्याचा मित्र असल्याकारणानें त्यानें त्यास यावेळीं मुद्दाम आपल्याबरोबर आणिलें होतें. (बुद्धघोष).

३४ "पोट्ठपादा, कांहीं श्रमण व ब्राह्मण यांच्या अशा कल्पना, अशीं मतें असतात कीं, आत्मा मरणानंतर पूर्णपणें सुखी व अरोगी असतो. त्यांच्याकडे जाऊन मी त्यांस म्हणतों, 'खरेंच तुमच्या अशा कल्पना, अशीं मतें आहेत काय कीं, आत्मा मरणानंतर पूर्णपणें सुखी व अरोगी असतो?' असें मीं विचारिलें म्हणजे ते होय असें उत्तर देतात त्यांना मी असें म्हणतों कीं,'तुम्हांस जगांतील लोक पूर्णपणें सुखी आहेत असें वाटतें काय, असें तुम्हाला आढळून आलें आहे काय?' असें विचारिलें म्हणजे ते नाहीं असें उत्तर देतात. त्यांना मी पुन्हा विचारितों कीं, 'एक रात्र किंवा एक दिवस, अर्धी रात्र किंवा अर्धा दिवस तरी पूर्णपणें आपण सुखी आहों असें तुम्हांस आढळून आलें आहे काय?' असें विचारिलें म्हणजे ते नाहीं असें उत्तर देतात. त्यांना मी पुन्हां विचारितों कीं, 'पूर्णपणें सुखी असलेल्या लोकांचा साक्षात्कार करून घेण्याचा मार्ग अमुक हें तुम्हांस माहीत आहे काय?' असें त्यांस विचारिलें म्हणजे ते नाहीं असें उत्तर देतात. त्यांना मी पुन्हा विचारितों कीं, 'पूर्णपणें सुखी लोकांत असलेल्या देवता 'लोकहो, पूर्णपणें सुखी लोकांचा साक्षात्कार करून घेण्याकरितां नीट रितीनें वागा, सरळ मार्गानें चाला. आम्हीही अशाच रितीनें वागून या पूर्णपणें सुखी लोकांत उत्पन्न झालों आहों,' असें म्हणत असतांना त्यांचा शब्द तुम्हीं ऐकला आहे काय?' असें विचारिलें म्हणजे ते नाहीं असें उत्तर देतात. तर तुला काय वाटतें, पोट्ठपादा? असें असतां त्या श्रमणब्राह्मणांचें भाषण मूर्खपणाचें नाहीं काय?

३५ "ज्याप्रमाणें, पोट्ठपादा, एखाद्या पुरुषानें म्हणावें कीं, 'या देशांतील जी अत्यंत सुंदर स्त्री ती मला आवडते, तिच्यावर माझें प्रेम आहे.' त्याला दुसऱ्यानें विचारावें कीं, 'हे पुरुषा, या देशांतील जी अत्यंत सुंदर स्त्री आहे, जी तुला आवडते व जिच्यावर तुझें प्रेम आहे ती क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य किंवा शूद्र यांपैकीं कोणत्या जातीची आहे

---

१. अप्पाटिहीरिकतं. 'पटिहरणविरहितं, अनिय्यानिकं' (बुद्धघोष).

हें तुला माहीत आहे काय?' असें त्याला विचारिलें असतां त्यानें नाहीं म्हणून म्हणावें. त्याला पुन्हां विचारावें कीं, 'हे पुरुषा, या देशांतील जी अत्यंत सुंदर स्त्री आहे, जी तुला आवडते व जिच्यावर तुझें प्रेम आहे तिचें नांव अमुक, गोत्र अमुक, ती उंच आहे अथवा ठेंगणी आहे कीं मध्यम आहे, कीं काळी आहे कीं सांवळी आहे कीं फिकट आहे व अमुक गांवांत अथवा शहरांत अथवा नगरांत रहाते हें तुला ठाऊक आहे काय?' असें त्याला विचारिलें असतां त्यानें नाहीं म्हणून म्हणावें. त्याला पुन्हा विचारावें कीं,' हे पुरुषा, जी तुला माहीत नाहीं, जिला तूं पाहिलें नाहींस, ती तुला आवडते? तिच्यावर तुझें प्रेम आहे?' असें त्याला विचारिलें असतां त्यानें होय म्हणून म्हणावें. तर तुला काय वाटतें, पोट्ठपादा? या ठिकाणीं त्याचें हें बोलणें मूर्खपणाचें होणार नाहीं काय?"

"होय, भगवन्, खरोखरीच मूर्खपणाचें होईल."

३६ "त्याप्रमाणें, पोट्ठपादा, ज्या श्रमणब्राह्मणांचीं अशीं मतें असतात त्यांचें भाषण मूर्खपणाचें नाहीं काय?"

"होय, भगवन्, खरोखरीच त्यांचें भाषण मूर्खपणाचें आहे."

३७ "ज्याप्रमाणें, पोट्ठपादा, एखाद्या मनुष्यानें चार रस्ते जेथें मिळतात तेथें प्रासादावर चढण्याकरितां जिना तयार करावा. त्याला एखाद्यानें विचारावें कीं,' हे पुरुषा, ज्या प्रासादावर चढण्याकरितां तूं जिना तयार करीत आहेस तो प्रासाद पूर्व दिशेस आहे कीं दक्षिण दिशेस आहे कीं पश्चिम दिशेस आहे, कीं उत्तर दिशेस आहे, उंच आहे कीं लहान आहे कीं मध्यम आहे हें तुला माहीत आहे काय?' असें त्याला विचारिलें असतां त्यानें नाहीं म्हणून म्हणावें. त्याला पुन्हां विचारावें कीं, 'हे पुरुषा, जो प्रासाद तुला माहीत नाहीं, जो तूं पाहिलेला नाहींस, त्यावर चढण्याकरितां तूं हा जिना तयार करीत आहेस?' असें त्याला विचारिलें म्हणजे त्यानें होय म्हणून म्हणावें. तर

१ मंगुरच्छवि. Rh.D. Dialogues I. 258 n. 2. पहा.

तुला काय वाटतें, पोट्ठपादा ? या ठिकाणीं त्यांचें हें भाषण मूर्ख-पणाचें होणार नाहीं काय ? "

" होय, भगवान्, खरोखरीच मूर्खपणाचें होईल. "

३८ " त्याप्रमाणें, पोट्ठपादा, ज्या श्रमणब्राह्मणांचीं अशीं मतें असतात त्यांचें भाषण मूर्खपणाचें नाहीं काय ?"

" होय, भगवन्, खरोखरीच त्यांचें भाषण मूर्खपणाचें आहे. "

३९ " पोट्ठपादा, तीन प्रकारच्या शरीरांचा लाभ होत असतो. स्थूल, मनोमय व अरूप. त्यांतील स्थूल शरीर कोणतें तर रूपी, चतुर्महाभूतां-पासून उत्पन्न झालेलें व अन्न खाऊन रहाणारें. हें स्थूल शरीर. मनोमय शरीर कोणतें तर रूपी, मनोमय व सर्व अंगप्रत्यंगांनीं परिपूर्ण व सर्व इंद्रियांनीं युक्त. हें मनोमय शरीर. अरूप शरीर कोणतें तर अरूपी व संज्ञामय. हें अरूप शरीर.

४०—४२ " आतां, पोट्ठपादा, ज्याप्रमाणें चाललें असतां पापें नष्ट होतात व चांगले गुण वाढतात, प्रज्ञा परिपूर्ण व विपुल होते व याच जन्मांत ती स्वतः जाणून व साक्षात्कार करून घेऊन प्राण्यास राहतां येतें अशा तऱ्हेचा स्थूल, मनोमय व अरूप या शरीरांच्या त्यागाविषयीं मी धर्म सांगतों. आतां, पोट्ठपादा, तुला असें वाटेल कीं, 'पापें नष्ट होतील व चांगले गुण वाढतील, प्रज्ञा परिपूर्ण व विपुल होईल व याच जन्मांत ती स्वतः जाणून व साक्षात्कार करून घेऊन प्राण्यास रहातां येईल आणि तरीही प्राणी दुःखीच राहील.' परंतु, पोट्ठपादा, असें नाहीं. पापें नष्ट होतील व चांगले गुण वाढतील, प्रज्ञा परिपूर्ण व विपुल होईल व याच जन्मांत ती स्वतः जाणून व साक्षात्कार करून घेऊन प्राण्यास

१. अवीचिपासून परनिम्मितवसवत्तिदेवलोकापर्यंत असणारा कामभव. २. प्रथमध्यान-भूमिकापासून अकनिट्ठब्रह्मलोकापर्यंत असणारा रूपभव. ३. आकासानञ्चायतन-लोकापासून नेवसञ्ञानासञ्ञालोकापर्यंत असणारा अरूपभव. ४. संकिलेसिका धम्मा. 'द्वादस अकुसलचित्तुप्पादा' ( बुद्धघोष ). ५. वोदानिया धम्मा. 'समथविपस्सना ( बुद्धघोष ).

रहातां येईल आणि प्रामोद्य, प्रीति, प्रश्रब्धि, स्मृति, संप्रजन्य हींही प्राप्त होतील व प्राणी सुखी राहील.

४३–४५ " पोट्ठपादा, दुसरे लोक आम्हांस विचारितील कीं, ' ज्याच्या त्यागाविषयीं तुम्ही धर्म सांगतां, ज्याप्रमाणें चाललें असतां पापें नष्ट होतात व चांगले गुण वाढतात, प्रज्ञा परिपूर्ण व विपुल होते व याच जन्मांत ती स्वतः जाणून व साक्षात्कार करून घेऊन प्राण्यास रहातां येतें असा ज्याच्या त्यागाविषयीं तुम्ही धर्म सांगतां तो स्थूल, मनोमय व अरूप शरीरांचा लाभ कोणता ? ' असें त्यांनीं विचारिलें म्हणजे मीं त्यास म्हणेन कीं, ' ज्याप्रमाणें चाललें असतां ...... असा ज्याच्याविषयीं मी धर्म सांगतों, तो स्थूल, मनोमय व अरूप शरीरांचा लाभ हाच होय. ' तर तुला काय वाटतें, पोट्ठपादा, असें झालें असतां तें भाषण योग्य होणार नाहीं काय ? "

" होय, भगवन्, खरोखरीच तें भाषण योग्य होईल. "

४६ " ज्याप्रमाणें, पोट्ठपादा, एखाद्या पुरुषानें प्रासादावर चढण्याकरितां त्याच्या खालीं एक जिना तयार करावा. त्याला विचारावें कीं, ' हे पुरुषा, ज्या प्रासादावर जाण्याकरिता तूं जिना तयार करीत आहेस तो प्रासाद पूर्व, पश्चिम, दाक्षिण, अथवा उत्तर यांपैकीं कोणत्या दिशेस आहे, तो उंच आहे कीं लहान आहे कीं मध्यम आहे हें तुला माहीत आहे काय ? ' असें त्यास विचारिलें म्हणजे त्यानें उत्तर द्यावें कीं, ' मित्रा, ज्या प्रासादावर जाण्याकरितां त्याच्या खालीं मी जिना तयार करीत आहें, तो प्रासाद हाच होय. ' तर तुला काय वाटतें, पोट्ठपादा, असें झालें असतां तें भाषण योग्य होणार नाहीं काय ? "

" होय, भगवन्, खरोखरीच तें भाषण योग्य होईल. "

४७ " याचप्रमाणें, पोट्ठपादा, दुसऱ्या लोकांनीं मला याप्रमाणें विचारिलें असतां मी त्यांस असें उत्तर दिलें तर तें भाषण योग्य होणार नाहीं काय ? "

" होय, भगवन्, खरोखरीच तें भाषण योग्य होईल. "

४८ असें भगवान् बोलल्यावर चित्त नांवाचा महाताचा मुलगा त्यांस म्हणाला, " ज्यावेळीं, भगवन्, [ यांतील एका ] शरीराचा लाभ होतो त्यावेळीं [ बाकीचीं ] शरीरें खोटीं असतात काय? [ तेंच ] शरार तेवढेंच खरें असतें कांय ? "

४९ " चित्ता, ज्यावेळीं [ यांतील एका ] शरीराचा लाभ होतो त्यावेळीं [ बाकीच्या ] शरीरांचा लाभ होतो असें म्हणत नाहींत. त्यावेळीं फक्त [ त्याच ] शरीराचा लाभ होतो असें म्हणतात.

" चित्ता, जर तुला कोणीं विचारिलें कीं, ' तूं पूर्वीं होतास ना? नव्हतास असें नाहीं ना ? तूं पुढें असणार ना? नसणार असें नाहीं ना ? तूं आतां आहेस ना? नाहींस असें नाहीं ना ? ' तर तूं काय सांगशील ?"

" जर, भगवन्, मला कोणीं असें विचारिलें तर मी म्हणेन कीं, ' मी पूर्वीं होता, नव्हतों असें नाहीं. मी पुढेंही असणार, नाहीं असें नाहीं. मी आतां आहें, नाहीं असें नाहीं. ' असें मी त्यांस म्हणेन. "

५० " जर, चित्ता, त्यांनीं तुला विचारिलें कीं, ' पूर्वीं तुझा जो देह होता तेवढाच खरा व हल्लींचा व पुढचा खोटा काय ? पुढें तुझा जो देह होणार आहे तेवढाच खरा व पूर्वींचा व हल्लींचा खोटा काय ? आतांचा तुझा जो देह आहे तेवढाच खरा व पूर्वींचा व पुढचा खोटा काय ? ' तर तूं काय उत्तर देशील ? "

" जर, भगवन्, मला त्यांनीं असें विचारिलें तर मी म्हणेन कीं, ' माझा पूर्वींचा जो देह होता तोच त्यावेळीं खरा होता. आतांचा व पुढचा हे खोटे होते. पुढें जो मला देह प्राप्त होणार तोच त्यावेळीं खरा असणार. पूर्वींचा व आतांचा हे खोटे असणार. आतां जो माझा देह आहे तोच आतां खरा. पूर्वींचा व पुढचा हे दोन्हीही खोटेच आहेत. ' असें मी त्यांस उत्तर देईन. "

---

१. मूळांत सर्व पुनरुक्ति आहे.

५१ " याचप्रमाणें, चित्ता, ज्यावेळीं [यांपैकीं एका] शरीराचा लाभ होतो त्यावेळीं [ बाकींच्या ] शरीरांचा लाभ होतो असें म्हणत नाहींत. त्यावेळीं फक्त [ त्याच ] शरीराचा लाभ होतो असें म्हणतात.

५२ " ज्याप्रमाणें, चित्ता, गाईपासून दूध, दुधापासून दहीं, दह्यापासून लोणी, लोण्यापासून तूप, तुपापासून वरील साक[1] होतो. ज्यावेळीं दूध असतें त्यावेळीं त्यास दहीं, लोणी, तूप, साक यांपैकीं कांहींही म्हणत नाहींत, त्यावेळीं त्यास दूधच म्हणतात. ज्यावेळीं दहीं असतें त्यावेळीं त्यास दूध, लोणी, तूप, साक यांपैकीं कांहींही म्हणत नाहींत, त्यावेळीं त्यास दहींच म्हणतात. ज्यावेळीं लोणी असतें त्यावेळीं त्यास दूध, दहीं, तूप, साक यांपैकीं कांहींही म्हणत नाहींत, त्यावेळीं त्यास लोणीच म्हणतात. ज्यावेळीं तूप असतें त्यावेळीं त्यास दूध, दहीं, लोणीं, साक यांपैकीं कांहींही म्हणत नाहींत, त्यावेळीं त्यास तूपच म्हणतात. ज्यावेळीं साक असतो त्यावेळीं त्यास दूध, दहीं, लोणी, तूप यांपैकीं कांहींही म्हणत नाहींत, त्यावेळीं त्यास साकच म्हणतात.

५३ " त्याचप्रमाणें, चित्ता, ज्यावेळीं [ यांपैकीं एका ] शरीराचा लाभ होतो त्यावेळीं [ बाकीच्या ] शरीरांचा लाभ होतो असें म्हणत नाहींत. त्यावेळीं फक्त [ त्याच ] शरीराचा लाभ होतो असें म्हणतात.

" चित्ता, हीं जगांतील नुसतीं नांवें, बोलण्याच्या तऱ्हा, व्यवहार, शब्दप्रयोग आहेत. तथागत हींच वापरतो, परंतु त्यामुळें तो बांधला जात नाहीं. "

५४ असें भगवान् म्हणाल्यावर पोट्ठपाद परिव्राजक त्यांस म्हणाला, " वाहवा ! भगवन्, वाहवा ! ज्याप्रमाणें, भगवन्, एखाद्यानें उलटें झालेलें सुलटें ठेवावें, अथवा झांकलेलें उघडें करावें, अथवा वाट चुकलेल्यास मार्ग सांगावा, अथवा डोळस मनुष्यांना वस्तू दिसाव्या म्हणून अंधारांत तेलाचा दिवा दाखवावा, त्याप्रमाणें भगवंतांनीं अनेक तऱ्हांनीं धर्माचा उपदेश केला आहे. तर मीं भगवंतांस, धर्मास व भिक्षुसंघास शरण जातों. शरण आलेल्या मला आजपासून मरेपर्यंत आपण उपासक समजावें. "

---

१. सप्पिमण्ड.

५५ पण चित्त नांवाचा महाताचा पुत्र भगवंतांस म्हणाला, " वाह्वा ! भगवन्, वाह्वा !...... शरण जातों. भगवंतांनीं मला आपल्याजवळ प्रव्रज्या व उपसंपदा द्यावी. "

चित्त नांवाच्या महाताच्या पुत्राला भगवंतांजवळून प्रव्रज्या व उपसंपदा मिळाली व तो एकटा, निराळा, अप्रमत्त, उद्योगी, प्रहितात्म असा राहून थोड्याच कालानें ज्याकरितां कुलपुत्र घरांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतात तें श्रेष्ठ ब्रह्मचर्याचें अंतिम याच जन्मांत स्वतः जाणून, त्याचा साक्षात्कार करून घेऊन व तें प्राप्त करून घेऊन राहिला. 'जन्म संपले, ब्रह्मचर्यपालन झालें, करावयाचें तें करून झालें, यापुढें आतां कांहींही राहिलें नाहीं, ' असें त्यास कळून आलें. चित्त नांवाचा महाताचा पुत्र अर्हन्तांतील एक झाला.

पोट्ठपादसुत्त समाप्त.

## परिशिष्ट.

या सूत्राचा विषय अभिसंज्ञानिरोध हा आहे. अभिसंज्ञानिरोध म्हणजे कांहीं कालपर्यंत संज्ञेचा पूर्णपणें निरोध करून टाकणें. यास व्यावहारिक भाषेंत समाधी असें नांव आहे. विशुद्धिमार्गामध्यें यास निरोधसमापत्ती असें म्हटलें आहे व त्याचें लक्षण हळूंहळूं निरोध करीत जाऊन सरतेशेवटीं चित्त व चित्ताचे धर्म हे सर्वथा नाहींसे करणें असें दिलें आहे.[1] त्रिपिटकांत दुसऱ्या अनेक ठिकाणीं यास संज्ञावेदयितनिरोध असें नांव दिलेलें आढळतें. लोक हें कशाकरितां साध्य करून घेतात ? तर सदोदित चालू असलेल्या संस्कारांचा कंटाळा येऊन हें चिंतन करणेंच नको असें त्यांस वाटूं लागतें. म्हणून चित्तच थांबविण्याकरितां लोक हें साध्य करून घेण्याची एवढी धडपड करितात. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हें या जन्मांत प्राप्त करून घेतां येण्याजोगें तात्पुरतें निर्वाणच होय.

हें होतें कसें ? चित्त सर्वथा थांबवें कसें ? ही मोठी आश्चर्याची गोष्ट होय, सर्व जगताचे चित्ताचे व्यवहार चालू असतां एखाद्दुसऱ्या मनुष्यास त्यांचा पूर्ण निरोध करितां यावा हा एक चमत्कारच समजला पाहिजे, अशी साधारण जनसमूहाची समजूत असते. पण या चमत्काराचें खरें कारण काय हें न समजल्यामुळें निरानिराळे लोक त्याविषयीं वेगवेगळ्या कल्पना करीत असतात. कोणी म्हणतात कीं, यास कांहीं विशेष कारण लागत नाहीं; हें आपोआपच घडून येतें. कोणी म्हणतात कीं, संज्ञा हा पुरुषाचा आत्मा असून तो शरीरांत जात येत असतो, तो शरीरांतून बाहेर गेला म्हणजे समाधी लागली असें म्हणतात. दुसरे कांहीं याचा संबंध महान् प्रतापी श्रमण ब्राह्मण अथवा देवता यांपर्यंत नेऊन लावितात.[2] परंतु हीं कारणें खरीं नव्हत. खरें कारण असें आहे कीं जसजसा मनुष्य एकामागून एक निरनिराळीं ध्यानें प्राप्त करून घेतो तसतशा त्याच्या स्थूल संज्ञा नष्ट होऊन अधिकाधिक सूक्ष्म संज्ञा त्यास प्राप्त होतात.

---

१. 'या अनुपुब्बनिरोधवसेन चित्तचेतसिकानं धम्मानं अप्पवत्ति.' विशुद्धिमार्ग. परिच्छेद २३. २. ब्राह्मणग्रंथांतून याचें कारण आत्मा आहे असें म्हटलें आहे. त्याविषयीं अशी समजूत होती कीं, कांहीं रोग आत्मा शरीराच्या बाहेर गेला म्हणजेच उत्पन्न होतात. स्वप्नांमध्येंही अशाच तऱ्हेनें आत्मा बाहेर गेलेला असतो. आत्मा पूर्णपणें ( पुन्हां परत न येण्यासारखा ) बाहेर गेला म्हणजे मृत्यु येतो, व तो शरीराच्या ज्या भागांतून बाहेर जाईल त्यावर त्याची पुढील गति अवलंबून असते. RhD. Buddhist India. 251-258 पहा.

याप्रमाणें आकिञ्चञ्ञायतनसमाधीपर्यंत जाऊन नंतर चिंतन व त्याच्याशीं संबद्ध असलेले संस्कार हे जेव्हां तो सर्वथैव सोडून देतो तेव्हां तो निरोधाप्रत पोंचतो. अंगुत्तरनिकाय ( १.२०.७३ इत्यादि ) व विशुद्धिमार्ग ( परिच्छेद २३ ) या ग्रंथांतून निरोधसमापत्ती नेवसञ्ञानासञ्ञायतनसमाधीनंतर प्राप्त होते असें म्हटलें आहे. एवढा फरक सोडून दिला तर त्रिपिटकांत यासंबंधीं एकवाक्यता आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

अभिसंज्ञानिरोधासंबंधानें येथें एवढाच विचार केला आहे. पण इतर ठिकाणीं आणखी कांहीं प्रश्नांचा उलगडा केला आहे तो येथें देणें अप्रस्तुत होणार नाहीं. समाधिस्थ मनुष्याची सर्व हालचाल बंद असल्याकारणानें तो मेल्यासारखाच दिसतो. मग निरोधसमापन्न व मृत मनुष्य यांमध्यें फरक काय ? तर दोन्हीं-तहीं कायसंस्कार, वचीसंस्कार व चित्तसंस्कार, यांचा निरोध झालेला असतो, परंतु निरोधसमापन्नाचें आयुष्य सरलेलें नसतें, त्याच्या अंगांतील उष्णता नाहिंशी होत नाहीं व इंद्रियांचा भेद होत नाहीं, आणि मृताचें आयुष्य संपलेलें असतें, उष्णता नाहिंशी झालेली असते व इंद्रियांचा भेद झालेला असतो. ( मज्झिम ४३. विशुद्धिमार्ग २३ ). तसेंच समाधी लागतांना पहिल्यानें वचीसंस्कार थांबतात, नंतर कायसंस्कार व सरतेशेवटीं चित्तसंस्कार. समाधी उतरतांना पहिल्यानें चित्तसंस्कार सुरू होतात, मग कायसंस्कार व शेवटीं वचीसंस्कार. समाधींतून उठल्यावर सर्व चित्त विवेकाकडे लागलेलें असतें. ( मज्झिम ४४, विशुद्धिमार्ग २३ ).

येथें अभिसंज्ञानिरोधाविषयीं साधारण विचार संपला. त्यापुढें संज्ञेविषयीं थोडासा विचार आला आहे. तो असा. संज्ञेचें अग्र एकही आहे व अनेकही आहेत. एका ध्यानांतून दुसऱ्या ध्यानांत जेव्हां मनुष्य प्रवेश करितो तेव्हां त्या ( दुसऱ्या ) ध्यानांतील संज्ञाच त्यास तेवढ्यापुरती श्रेष्ठ असते. परंतु एकंदर मालिका घेतली तर आकिञ्चञ्ञायतनसमाधीमधील संज्ञा ही एकच संज्ञेचें अग्र आहे असें म्हणतात. त्याचप्रमाणें ज्ञान एकदम उत्पन्न होत नाहीं. आधीं संज्ञा उत्पन्न होते व त्या संज्ञेमागून त्याप्रमाणें ज्ञान उत्पन्न होतें. कित्येक संज्ञेसच पुरुषाचा आत्मा समजतात. परंतु रूपी, मनोमय अथवा अरूपी यांपैकीं कोणताही आत्मा एखाद्यास खरा वाटत असला, तरी तो आत्मा व संज्ञा हीं

---

१. दीघ ३३. ३. १. ११. अंगुत्तर ८.६६.७ येथें त्यास आठवा विमोक्ष म्हटलें आहे. अंगुत्तर ९.३१-६१ येथें सर्व त्याविषयींच निरनिराळ्या प्रकारांनीं विवेचन केलें आहे.

एकच होत असें केव्हांही म्हणतां यावयाचें नाहीं. कारण आत्मा जर असेल तर तो शरीरांत नित्य वास करणारा असला पाहिजे व संज्ञा ही तर एकसारखी येत असते व जात असते.

हें सर्व पोट्ठपादास पटलें. परंतु त्यानें नंतर जग शाश्वत आहे कीं नाहीं इत्यादि दहा प्रश्नांचीं उत्तरें मला द्या असा आग्रह धरिला. परंतु बुद्धांनीं ( मागें महालिसुत्ताच्या परिशिष्टांत सांगितल्याप्रमाणें )[1] आपल्या नेहमींच्या तऱ्हेनें त्याविषयीं कांहींच सांगितलें नाहीं. कारण या गोष्टी कळून न कळून कांहींच फायदा नाहीं, डोक्यास मात्र व्यर्थ त्रास असें त्यांचें मत होतें. म्हणून या दहांस दश अव्याकृतें असें म्हणतात. खरी कळून घेण्याजोगी गोष्ट म्हटली म्हणजे चार आर्यसत्यें होत, कारण त्यांच्यामुळेंच मनुष्यास निर्वाणप्राप्ति होते. हें न कळल्यामुळेंच लोक अमुक एक तऱ्हेचा आत्मा असला म्हणजे तो मरणानंतर सुखी व अरोगी असतो, अशा तऱ्हेचीं मतें घेऊन बसतात, परंतु तें सुख काय हें त्यांस माहीत नसल्याकारणानें त्यांचें तें म्हणणें अगदीं वायफळ आहे असेंच समजलें पाहिजे. वर सांगितलेले रूपी, मनोमय व अरूपी हे तीन तऱ्हेचे आत्मे नसून देह आहेत. त्यांपैकीं एका वेळीं एकच विद्यमान असतो. आणि हे देह सुद्धां वस्तुतः असे जगांत आहेत असें नाहीं. तीं नुसतीं नांवें, केवळ व्यवहारांत वापरण्याचे शब्दप्रयोग आहेत. त्यांचे योगानें परमार्थतया आंत खरोखरी कांहीं वस्तु आहे असें समजणें चुकीचें होय.

---

१ पृ० १७९-१८० पहा. २ चूलमालुंक्यसुत्त ( मज्झिम ६३ ) पहा.

# १० सुभसुत्त.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके समयीं आयुष्मान आनंद श्रावस्तीनगरींत जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत रहात होता. तेव्हां भगवंतांचें परिनिर्वाण होऊन फार दिवस लोटले नव्हते. त्यावेळीं तोदेय्यपुत्र सुभ नांवाचा तरुण ब्राह्मण कांहीं कामानिमित्त श्रावस्तीनगरींत रहात होता.

२ त्या तोदेय्यपुत्र सुभ नांवाच्या तरुण ब्राह्मणानें दुसऱ्या एका तरुण ब्राह्मणास बोलावून म्हटलें, "हे तरुण ब्राह्मणा, इकडे ये व श्रमण आनंदाकडे जाऊन माझ्या वतीनें त्यास म्हण कीं, तोदेय्यपुत्त सुभानें असें विचारिलें आहे कीं आपला आजार व त्रास कमी आहे ना ? आपली प्रकृती ठीक आहेना ? आपल्याला शक्ती व आराम वाटतो ना ? व आणखी सांग कीं आपण कृपा करून तोदेय्यपुत्र सुभाच्या घरीं यावें."

३ "ठीक आहे," असें सुभास उत्तर देऊन तो तरुण ब्राह्मण आयुष्मान आनंदाकडे गेला व कुशलप्रश्न विचारून एका बाजूस बसला आणि म्हणाला, "तोदेय्यपुत्र सुभानें असें विचारिलें आहे कीं ...... सुभाच्या घरीं यावें."

४ असें तो म्हणाल्यावर आयुष्मान आनंद त्यास म्हणाला, "हे तरुण ब्राह्मणा, आतां मला येतां येणार नाहीं. आज मीं औषध घेतलें आहे. उद्यां जर योग्य काळवेळ असला तर मी येईन."

"बरें आहे," असें आयुष्मान आनंदास उत्तर देऊन तो तरुण ब्राह्मण तोदेय्यपुत्र सुभ याजकडे आला व त्यास म्हणाला, "आपल्या वतीनें मी पूज्य आनंदास प्रकृतीसंबंधीं विचारून आपला निरोपही त्यास सांगितला. तेव्हां तो म्हणाला, 'हे तरुण ब्राह्मणा, आतां मला येतां

१. श्रावस्तीजवळच तुदि नांवाचें एक गांव होतें. तेथें राहणाऱ्या मनुष्याचा मुलगा. अट्ठकथेचा टीकाकार या गांवाचें नांव तुरि होतें असें म्हणतो. २. भगवंतांच्या परिनिर्वाणानंतर लोकांचें सांत्वन करीत बसावें लागल्यामुळें आनंदास थोडासा आजार झाला त्याकरितां त्यानें क्षीरविरेचन घेतलें होतें. ( समन्तपासादिका ९ ).

येणार नाहीं, आज मीं औषध घेतलें आहे, उद्यां काळवेळ पाहून मी येईन.' इतकें मीं केलें आहे कीं आनंदानें उद्यां येण्याचें कबूल केलें आहे."

५ नंतर आयुष्मान आनंद ती रात्र सरल्यावर सकाळींच वस्त्रपरिधान करून पात्र व चीवर घेऊन चैत्य[1] देशांतील एक भिक्षु बरोबर घेऊन तोदेय्य-पुत्र सुभ याच्या घरीं गेला व त्याजकरितां पसरलेल्या आसनावर बसला. सुभही आनंदाजवळ जाऊन कुशलप्रश्न विचारून एका बाजूस बसला व म्हणाला, "आपण भगवान् गौतमाचे फार दिवस उपस्थायक होतां, नेहमीं यांचे जवळ त्यांचे सांनिध्यांत होतां, तेव्हां भगवान् गौतम कोणत्या गोष्टी चांगल्या म्हणत, व कोणत्या गोष्टींसंबंधीं लोकांस प्रोत्साहन देत, उपदेश करीत व स्वीकारण्याविषयीं आग्रह करीत, हें आपणास माहीत असेलच. त्या गोष्टी कोणत्या?"

६ "हे तरुण ब्राह्मणा, तीन गोष्टी भगवान् गौतम चांगल्या म्हणत व त्यासंबंधीं लोकांस प्रोत्साहन देत, त्यांचा त्यांस उपदेश करीत व त्या स्वीकारण्याविषयीं आग्रह करीत. त्या तीन गोष्टी कोणत्या? तर आर्य शीलस्कंध, आर्य समाधिस्कंध व आर्य प्रज्ञास्कंध."

"पण, आनंद, ज्यास भगवान् गौतम चांगला म्हणत......आग्रह करीत, असा आर्य शीलस्कंध कोणता?"

७–२९ "[ सामञ्ञफलसुत्त ४०–६३ याप्रमाणें. ]

"हे तरुण ब्राह्मणा, ज्यास भगवान् गौतम चांगला म्हणत...... आग्रह करीत, तोच हा आर्य शीलस्कंध होय. परंतु यांहूनही अधिक करावयाचें राहिलेंच आहे."

३० "आनंद, हें किती आश्चर्यकारक व अद्भुत आहे! हा आर्य शीलस्कंध परिपूर्ण आहे, अपरिपूर्ण नाहीं. अशा रितीनें परिपूर्ण असलेला शीलांचा समुदाय येथल्याशिवाय दुसरे श्रमण व ब्राह्मण यांचे ठिकाणीं मला आढळला नाहीं. आणि, आनंद, अशा रीतीनें परिपूर्ण

---

१. चैत्य देश (पाली. चेतिय. सं. चेदि) म्हणजे हल्लींचा बुंदेलखंड.

असलेला शीलांचा समुदाय येथल्याशिवाय दुसऱ्या श्रमणब्राह्मणांना जर आपल्या ठिकाणीं आढळला तर तेवढ्यानेंच ते आनंदित होऊन ह्मणतील कीं, ' एवढें पुरे, एवढ्यानेंच आमचा कार्यभाग झाला, आह्मांला श्रामण्य मिळालें, आह्मांस आतां यापुढें करावयाचें असें कांहींही उरलें नाहीं. ' परंतु आपण तर ह्मणतां कीं याहूनही अधिक [illegible]रावयाचें राहिलेंच आहे ! "

पहिला भाग समाप्त.

---

१ " आणि, आनंद, ज्यास भगवान् गौतम चांगला ह्मणत,...... आग्रह करीत असा आर्य समाधिस्कंध कोणता ? "

२-१९ " [ सामञ्ञफलसुत्त ६४-८२ याप्रमाणें ].

" हे तरुण ब्राह्मणा, ज्यास भगवान् गौतम चांगला ह्मणत, ...... आग्रह करीत, तोच हा आर्य समाधिस्कंध होय. परंतु याहूनही अधिक करावयाचें राहिलेंच आहे. "

" आनंद, हें किती आश्चर्यकारक व अद्भुत आहे ! हा आर्य समाधिस्कंध परिपूर्ण आहे, अपरिपूर्ण नाहीं....... परंतु आपण तर म्हणतां कीं याहूनही अधिक करावयाचें राहिलेंच आहे !

२० " आणि, आनंद, ज्यास भगवान् गौतम चांगला म्हणत, .... आग्रह करीत असा आर्य प्रज्ञास्कंध कोणता ? "

२१–२६ " [ सामञ्ञफलसुत्त ८३-९७ याप्रमाणें ].

२७ " हे तरुण ब्राह्मणा, ज्यास भगवान् गौतम चांगला म्हणत,... आग्रह करीत, तोच हा आर्य प्रज्ञास्कंध होय. यापुढें कांहींही करावयाचें उरत नाहीं. "

" आनंद, हें किती आश्चर्यकारक व अद्भुत आहे ! हा आर्य प्रज्ञास्कंध परिपूर्ण आहे, अपरिपूर्ण नाहीं. अशा रितीनें परिपूर्ण असलेला प्रज्ञांचा समुदाय येथल्याशिवाय दुसरे श्रमण व ब्राह्मण यांचे

ठिकाणीं मला आढळला नाहीं, आणि यापुढें तर कांहींही करावयाचें उरत नाहीं. वाहवा ! आनंद, वाहवा ! ज्याप्रमाणें, आनंद, एखाद्यानें उलटें झालेलें सुलटें ठेवावें, अथवा झांकलेलें उघडें करावें, अथवा वाट चुकलेल्यास मार्ग सांगावा, अथवा डोळस मनुष्यांना वस्तू दिसाव्या म्हणून अंधारांत तेलाचा दिवा दाखवावा, त्याप्रमाणें आपण अनेक तऱ्हांनीं धर्माचा उपदेश केला आहे. तर, आनंद, मी भगवान् गौतमास, धर्मास व भिक्षुसंघास शरण जातों. शरण आलेल्या मला आजपासून मरेपर्यंत आपण उपासक समजावें."

सुभसुत्त समाप्त.

---

# परिशिष्ट.

आतांपर्यंतच्या व या सूत्रांत फरक हा आहे कीं, यांतील उपदेश स्वतः भगवान् बुद्धांनीं सांगितलेला नाहीं. तर त्यांच्या परिनिर्वाणानंतर त्यांच्या सान्निध्यांत राहणारा शिष्य ( उपट्ठाक ) आनंद यानें केला आहे. एकंदर त्रिपिटकांत अशीं कांहीं सूत्रें सांपडतात. त्यांतील प्रमुख म्हणजे भगवंतांच्या परिनिर्वाणापूर्वींच्या तीन महिन्यांत घडलेली हकीकत ज्यांत आली आहे असें महापरिनिब्बाणसुत्त ( दीघ १६ ) होय. परंतु या सूत्रांतील विषयही कांहीं आनंदाच्या स्वतःच्या पदरचा नाहीं. तो केवळ भगवंतांनीं पूर्वी त्यास जें कांहीं सांगितलें होतें त्याचाच अनुवाद करीत आहे. यावरून पाहतां हेंही एक बुद्धवचनच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

यांतील मुख्य विषय सामञ्ञफलसुत्तांत आलेलाच आहे. परंतु येथें त्याचे शील, समाधी व प्रज्ञा असे स्पष्टपणें तीन भाग करून त्यांजविषयीं विचार केला आहे. बुद्धघोषाचार्यांनीं विशुद्धिमार्ग या ग्रंथांतही हाच क्रम स्वीकारिला आहे. त्यांमधील शील म्हणजे प्राणातिपातादि वाईट गोष्टी सोडून देणें हें होय असें दिसतें. यापुढील इंद्रियांवर ताबा ठेवणें, जागरूक राहणें व संतुष्ट असणें हे सर्व समाधीमध्यें अंतर्भूत होतात. परंतु विशुद्धिमार्गांत यांचा शीलांमध्येंच समावेश केला आहे व तोच मार्ग जास्त सयुक्तिक आहे असें दिसून येईल. येथें समाधि म्हणजे इंद्रियांवर ताबा ठेवणें वगैरे गोष्टी व त्यानंतर पांच नीवरणें हृदयांतून घालवून चार ध्यानें संपादन करणें एवढेंच होय. याशिवाय विशुद्धिमार्गांत अरूपध्यानादिक गोष्टी जास्त आलेल्या आहेत. शेवटीं प्रज्ञेमध्यें ज्ञानदर्शन, मनोमय काय, ऋद्धिविध, दिव्यश्रोत्र, परचित्तजानन, पूर्वनिवासानुस्मृति, सत्वांची च्युति व उपपत्ति ( अथवा दिव्यचक्षु ) व आस्रवांचा क्षय इतक्या गोष्टी येतात. यांतील शेवटच्या सहांना अभिञ्ञा म्हणतात व बुद्धघोषाचार्यांनीं त्या समाधीमुळें उत्पन्न होणाऱ्या असल्यामुळें समाधीला पुरवणीदाखल दिल्या आहेत. त्यांच्या दृष्टीनें चार आर्यसत्यें, स्कंध, आयतनें वगैरे, प्रतीत्यसमुत्पाद इत्यादि गोष्टी प्रज्ञेमध्यें येतात. या सर्व गोष्टींचा खल अभिधम्मपिटकांत केलेला आहे व त्यावरूनच बु-घोषाचार्यांनीं तसें विवरण केलें आहे. परंतु मूळ विचाराची तऱ्हा या सूत्रांत ांगितल्याप्रमाणेंच होती हें उघड आहे.

---

# ११ केवट्टसुत्त.

१ असें मी ऐकिलें आहे. एके समयीं भगवान् [ बुद्ध ] नालंदा येथें पावारिक अंबवनांत रहात होते. त्यावेळीं केवट्ट नांवाचा एक गृहपतिपुत्र भगवंतांकडे आला व त्यांस वंदन करून एके बाजूस बसला आणि म्हणाला, " भगवन्, ही नालंदा नगरी समृद्ध व संपन्न, लोकांनीं भरलेली व गजबजलेली असून येथील लोकांची भगवंतांवर फार भक्ती आहे. तेव्हां भगवंतांनीं एखाद्या भिक्षूस अतिमानुष चमत्कार करून दाखविण्याची आज्ञा करावी म्हणजे या नालंदानगरींतील लोकांची भगवंतांवर अधिकच भक्ती बसेल. "

असें केवट्ट बोलल्यावर भगवान् त्यास म्हणाले, " केवट्टा, मी भिक्षूंना असा केव्हांही उपदेश करीत नाहीं कीं, भिक्षूहो, इकडे या व पांढरीं वस्त्रें परिधान केलेल्या गृहस्थांसमोर अतिमानुष चमत्कार करून दाखवा."

२ दुसऱ्यांदा केवट्ट भगवंतांस म्हणाला, " मला भगवंतांस त्रास द्यावयाची इच्छा नाहीं. परंतु ही नालंदा नगरी समृद्ध व संपन्न, .. ... भगवंतांवर अधिकच भक्ती बसेल. "

दुसऱ्यांदाही भगवंतांनीं केवट्टास तेंच उत्तर दिलें.

---

१. हें नांव निरनिराळ्या पोथ्यांत केवद्ध, केवड्ढ असें वेगवेगळें सांपडतें. ऱ्हिस डेव्हिड्स् यांच्या मतें एवढ्या मोठ्या धनवान् गृहस्थाचें नांव केवट्ट ( कोळी ) असणें संभवत नाहीं. परंतु अट्ठकथाकार व टीकाकार या दोघांनींही केवट्ट असेंच नांव दिलें आहे, आणि टीकाकारानें कोळ्यांनीं संरक्षण केलें म्हणून त्याचें नांव केवट्ट अशी त्याची उपपत्तीही दिली आहे. २. संघांतील भिक्षू काषायवस्त्रें परिधान करीत, व बौद्ध उपासकांचीं वस्त्रें पांढरीं असत. भिक्षूंना अपराधाबद्दल मोठी शिक्षा द्यावयाची म्हणजे त्यांस पांढरीं वस्त्रें नेसावयास लावून संघांतून बाहेर काढून लावीत. सांची येथील स्तंभावर कोरलेल्या अशोकाच्या शिलालेखांतही ' जो संघभेद करील त्यास पांढरीं वस्त्रें नेसावयास लावून हाकलून दिलें जाईल,' असा उल्लेख आहे. ( वोदातानि दुसानि संनधापयितु अनावाससि विसपेतविये ). ३. ' न धंसेमि. ' म्हणजे शीलाचा भेद करून गुणांचा विनाश करून उच्च स्थानांवरून आपणास खालीं ओढण्याची माझी इच्छा नाहीं. ( बुद्धघोष ).

३ तिसऱ्यांदा केवट्ट भगवंतांस तसेंच म्हणाला. [ तेव्हां भगवान् म्हणाले, ] " केवट्टा, मी स्वतः जाणून साक्षात्कार करून घेऊन दुसऱ्यास शिकविलेले असे तीन चमत्कार आहेत. ते तीन कोणते ? तर ऋद्धिचमत्कार, आदेशनाचमत्कार व अनुशासनचमत्कार.

४ " त्यांतील, केवट्टा, ऋद्धीचा चमत्कार कोणता ? केवट्टा, एखादा भिक्षू पुढीलप्रमाणें अनेक तऱ्हेच्या चमत्कारांचा अनुभव घेतो. एक असतां अनेक होतो, अनेक असतां एक होतो, दृश्यमान होतो, अदृश्य होतो, भिंतीच्या, तटाच्या, पर्वताच्या पलीकडे आकाशांत उडल्याप्रमाणें न अटकतां जातो, पाण्यांतल्याप्रमाणें पृथ्वींतही खालीवर बुड्या मारितो, पृथ्वीवरल्याप्रमाणें पाण्यांतही न खचतां विहार करितो, पंख असलेल्या पक्षाप्रमाणें आकाशांतही मांडी घालून राहतो, एवढे प्रतापी व पराक्रमी चंद्र व सूर्य, पण त्यांना सुद्धां हातानें स्पर्श करून त्यांचें परिमर्दन करितो व आपल्या शरीराच्या प्रभावानें ब्रह्मलोकापर्यंत आपला ताबा बसवितो.

" असें तो करीत असतां एखादा श्रद्धायुक्त पुरुष तें पाहून त्याजवर प्रसन्न होईल व हें सर्व एखाद्या श्रद्धाहीन व अप्रसन्न अशा मनुष्याला सांगून म्हणेल कीं, ' काय हो हें आश्चर्य ! किती अद्भुत ही गोष्ट ! केवढें श्रमण गौतमाचें बल व सामर्थ्य ! मी एका भिक्षुला एक असतां अनेक होणें, ......असे चमत्कार करितांना पाहिलें ! '

५ " तेव्हां तो श्रद्धाहीन व अप्रसन्न मनुष्य म्हणेल, ' गांधारी[1] नांवाची एक विद्या आहे. तिच्या योगानें तो भिक्षु हे सर्व चमत्कार करून दाखवितो. ' तर तुला काय वाटतें, केवट्टा ? तो श्रद्धाहीन व अप्रसन्न मनुष्य असें म्हणेल कीं नाहीं ? "

---

१. गंधार नांवाच्या ऋषीनें केलेली अथवा गंधार राष्ट्रांत प्रचलित असलेली. ( बुद्धघोष ). टीकाकाराच्या मतें चूलगन्धारी व महागन्धारी अशा दोन विद्या आहेत. त्यांतील चूलगन्धारी म्हणजे ज्यांना मरून तीन वर्षें झालीं नाहींत अशांची च्युति व उपपत्ति जाणतां येणें, व महागंधारी म्हणजे येथें सांगितलेले चमत्कार करून दाखवितां येणें. जातक ५१० येथील गांधारी विद्येच्या योगानें मनुष्यास अदृश्य होतां येतें.

" होय, म्हणेल, भगवन्. "

" या ऋद्धीच्यामुळें घडलेल्या चमत्कारांमध्यें मला दोष दिसतात. म्हणून मला ते आवडत नाहींत, त्यांचा वीट येतो, तिटकारा येतो.

६, " आणि, केवट्टा, आदेशनाचमत्कार कोणता ? एखादा भिक्षू ' असें तुझें मन आहे, इतकें तुझें मन आहे, असें तुझें चित्त आहे, ' असें म्हणून दुसऱ्या प्राण्यांचीं, दुसऱ्या पुरुषांचीं चित्तें, मनोवृत्ती, वितर्क व विचार हीं सर्व उघडीं करून दाखवितो.

७ " असें तो करीत असतां एखादा श्रद्धायुक्त पुरुष तें पाहून त्याजवर प्रसन्न होईल व हें सर्व एखाद्या श्रद्धाहीन व अप्रसन्न मनुष्याला सांगून म्हणेल कीं, ' काय हो हें आश्चर्य ! किती अद्भुत ही गोष्ट ! केवढें श्रमण गौतमाचें बल व सामर्थ्य ! मी एका भिक्षूला ' असें तुझें मन आहे, इतकें तुझें मन आहे, असें तुझें चित्त आहे,' असें म्हणून दुसऱ्या प्राण्यांचीं, दुसऱ्या पुरुषांचीं चित्तें, मनोवृत्ती, वितर्क व विचार हीं सर्व उघडीं करून दाखवितांना पाहिलें ! '

८ " तेव्हां तो श्रद्धाहीन व अप्रसन्न मनुष्य म्हणेल, ' मणिका[2] नांवाची एक विद्या आहे. तिच्या योगानें तो भिक्षु हे सर्व चमत्कार करून दाखवितो. ' तर तुला काय वाटतें, केवट्टा ? तो श्रद्धाहीन व अप्रसन्न मनुष्य असें म्हणेल कीं नाहीं?"

" होय, म्हणेल, भगवन्. "

" या आदेशनाचमत्कारामध्यें मला दोष दिसतात. म्हणून मला तो आवडत नाहीं, त्याचा वीट येतो, तिटकारा येतो.

९-६६ " आणि, केवट्टा, अनुशासनचमत्कार कोणता ? एखादा भिक्षू असा उपदेश करितो कीं, ' असा विचार करा, असा विचार करूं नका, हें ध्यानांत ठेवा, तें ध्यानांत ठेवूं नका, हें सोडून द्या, याचा स्वीकार करा. ' हा, केवट्टा, अनुशासनचमत्कार.

---

१ चुल्लवग्ग ७.४.३ पहा. २ चिन्तामणिविद्या ( बुद्धघोष ). जातक ४३२ पहा. तिच्या योगानें एखाद्या मनुष्यास पुढें जाऊन बारा वर्षें झालीं असलीं तरी त्याचा पाठलाग करितां येतो.

" आणि, केवट्टा, तथागत अर्हत् सम्यक्संबुद्ध [ वगैरे सामञ्ञफलसुत्त ४०–८४ व ९७ यांप्रमाणें ]. हाही, केवट्टा, अनुशासन-चमत्कार होय. मी स्वतः जाणून, साक्षात्कार करून घेऊन, दुसऱ्यांस शिकविलेले असे हे तीन चमत्कार होत.

६७ " केवट्टा, पूर्वी एकदां याच भिक्षुसंघांतील एका भिक्षूच्या मनांत असा विचार आला कीं, ' पृथ्वी, आप, तेज व वायु हीं चार महाभूतें कोठें पूर्णपणें निरोध पावतात ? ' तेव्हां त्या भिक्षूनें अशा तऱ्हेची समाधी लाविली कीं, चित्त एकाग्र झाल्यावर त्यास देवलोकाचा मार्ग दिसूं लागला.

६८ " तेव्हां, केवट्टा, तो भिक्षू चातुम्महाराजिकदेवांकडे गेला व त्यांस म्हणाला, ' पृथ्वी, आप, तेज, व वायु हीं चार महाभूतें कोठें पूर्णपणें निरोध पावतात ? '

" केवट्टा, असें तो बोलल्यावर चातुम्महाराजिक देव त्यास म्हणाले, ' तीं कोठें पूर्णपणें विलय पावतात हें आम्हांस माहीत नाहीं. परंतु आम्हांपेक्षां थोर व श्रेष्ठ असे चार महाराजे आहेत, त्यांना कदाचित् या प्रश्नाचें उत्तर माहीत असेल. '

६९–७९ " तेव्हां, केवट्टा, तो भिक्षू त्या चार महाराजांकडे गेला व त्यांस त्यानें तोच प्रश्न केला. [ त्यांनींही त्यास तेंच उत्तर देऊन तावतिंस देवांकडे पाठविलें. त्यांनीं त्यास देवांचा राजा शक्र याजकडे पाठविलें. याप्रमाणें तो पुढें याम, सुयाम, तुसित, संतुसित, निम्मानरति, सुनिम्मित, परनिम्मितवसवत्ती, व वसवत्ती या देवांकडे गेला. ]

८० " नंतर, केवट्टा, त्या भिक्षूनें अशा तऱ्हेची समाधी लाविली कीं, चित्त एकाग्र झाल्यावर त्यास ब्रह्मलोकाचा मार्ग दिसूं लागला. तेव्हां तो ब्रह्मकायिक देवांकडे गेला व त्यांसही त्यानें तोच प्रश्न विचारिला. तेव्हां ते त्यास म्हणाले, ' आम्हालाही तीं चार महाभूतें पूर्णपणें कोठें विलय पावतात हें माहीत नाहीं. परंतु आम्हापेक्षांही थोर व श्रेष्ठ

१. सुयाम, संतुसित, सुनिम्मित व वसवत्ती हे अनुक्रमें याम, तुसित, निम्मानरती व परनिम्मितवसवत्ती या लोकांचे अधिपति होत.

असा ब्रह्मा, महाब्रह्मा आहे. तो जेता व अपराजित असून त्यास सर्व दिसतें. त्याच्या वशांत सर्व जग आहे. तोच ईश्वर, कर्ता, निर्माण करणारा, श्रेष्ठ, व सर्व सत्वांचें नियमन करणारा आहे. तोच वशी व हल्लीं असणाऱ्या व पुढें होणाऱ्या प्राण्यांचा पिता आहे. त्याला कदाचित् या प्रश्नाचें उत्तर माहीत असेल.'

" 'पण, मित्रांनो, तो ब्रह्मा यावेळीं कोठें असेल' ?

" 'आम्हालाही पण, हे भिक्षु, तो कोठें, कसा व कां आहे हें माहीत नाहीं. परंतु, हे भिक्षु, तशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत, उजेड दिसूं लागला आहे, तेज प्रादुर्भूत झालें आहे. तेव्हां तो ब्रह्मा इतक्यांत येथें येईल. ब्रह्मा येऊं लागला म्हणजे हें एकच चिन्ह दिसूं लागतें कीं उजेड दिसूं लागतो व तेज प्रादुर्भूत होतें.'

८१ " आणि, केवट्टा, तो महाब्रह्मा तेथें लवकरच आला. तेव्हां तो भिक्षू त्याजकडे जाऊन म्हणाला, 'मित्रा, पृथ्वी, आप, तेज, व वायू हीं चार महाभूतें पूर्णपणें कोठें निरोध पावतात ?'

"केवट्टा, असें तो बोलल्यावर ब्रह्मा त्यास म्हणाला, 'हे भिक्षु, मी ब्रह्मा महाब्रह्मा, जेता व अपराजित आहें. मला सर्व दिसतें. माझ्या वशांत सर्व जग आहे. मीच ईश्वर, कर्ता, निर्माण करणारा, श्रेष्ठ, व सर्व सत्वांचें नियमन करणारा आहें. मीच वशी व हल्लीं असणाऱ्या व पुढें होणाऱ्या प्राण्यांचा पिता आहे.'

८२ " तेव्हां, केवट्टा, तो भिक्षू दुसऱ्यांदा ब्रह्म्यास म्हणाला, 'मित्रा, तूं ब्रह्मा, महाब्रह्मा वगैरे आहेस कीं नाहींस हें मीं तुला विचारलें नव्हतें. तर पृथ्वी, आप, तेज व वायू हीं चार महाभूतें पूर्णपणें कोठें विलय पावतात [ असा माझा प्रश्न होता. ]' ब्रह्म्यानेंही त्यास पूर्वीप्रमाणेंच उत्तर दिलें.

८३ " तिसऱ्यांदा[१]ही त्या भिक्षूनें ब्रह्म्यास तोच प्रश्न केला. तेव्हां ब्रह्मा त्या भिक्षूचा दंड धरून त्यास एका बाजूस घेऊन गेला व

---

१. दीघ १.२.५ (पृ० २०) पहा.

म्हणाला, 'मित्रा, या ब्रह्मलोकांतील देवांना असें वाटतें कीं जें ब्रह्म्यानें पाहिलें नाहीं, जें ब्रह्मयास माहीत नाहीं, ज्याचा त्यास साक्षात्कार झालेला नाहीं, असें कांहींही नाहीं. म्हणून मीं त्यांच्यासमोर तुला सांगितलें नाहीं, परंतु, मित्रा, पृथ्वी, आप, तेज व वायू हीं चार महाभूतें पूर्णपणें कोठें निरोध पावतात हें मलाही माहीत नाहीं. हे भिक्षु, या प्रश्नाचें उत्तर मिळविण्याकरितां तूं भगवंतांस सोडून दुसरीकडे धांव घेतलीस हें तूं फार वाईट केलेंस, मोठा अपराध केलास. जा, भिक्षु, त्या भगवंतांकडे जाऊन त्यांस हा प्रश्न विचार व ते जसें सांगतील तसें समज.'

८४ "तेव्हां, केवट्टा, तो भिक्षु जितक्या लवकर बलवान् पुरुष आपला आंखडून घेतलेला हात लांब करील अथवा लांब केलेला हात आंखडून घेईल तितक्या लवकर ब्रह्मलोकांत अंतर्धान पावून माझ्या समोर येऊन उभा राहिला व मला वंदन करून एके बाजूस बसला आणि म्हणाला, 'पृथ्वी, आप, तेज, व वायु हीं चार महाभूतें पूर्णपणें निरोध कोठें पावतात ?'

८५ "असें तो बोलल्यावर मीं त्या भिक्षूस म्हणालों, 'पूर्वी समुद्रांतून व्यापार करणारे वाणी तीर दाखविणाऱ्या पक्षाला बरोबर घेऊन नावांमधून समुद्रांत सफरी करीत असत. ते जेव्हां नावेंतून तीर दिसेनासा होई तेव्हां त्या तीर दाखविणाऱ्या पक्षाला सोडून देत. तो पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, वरची दिशा व अनुदिशा इकडे जाई. जर त्याला कोठें तीर दिसला तर तो त्या बाजूस जाई, न दिसला तर पुन्हां त्या नावेकडे परत येई. त्याप्रमाणें, हे भिक्षु, ब्रह्मलोकापर्यंत शोध करून सुद्धां जेव्हां तुला या प्रश्नाचें उत्तर मिळालें नाहीं तेव्हां तूं माझ्याकडे आलास. हे भिक्षु, हा प्रश्न 'पृथ्वी, आप, तेज व वायु हीं चार महाभूतें पूर्णपणें कोठें निरोध पावतात ?,' असा विचारावयाचा नाहीं. तो असा विचारावयाचा—

‘ आप, पृथ्वी, तेज व वायु यांना कोठें अवकाश सांपडत नाहीं ?
दीर्घ, ऱ्हस्व, लहान, मोठे, शुभ, अशुभ,
नाम व रूप हीं पूर्णपणें कोठें निरोध पावतात ? ’

“ याचें उत्तर असें—

‘ अदृश्य, अनन्त, सर्व बाजूंनीं मिळणारें विज्ञान [ जेथें आहे ],
तेथें आप, पृथ्वी, तेज व वायु यांना अवकाश सांपडत नाहीं.
तेथें दीर्घ, ऱ्हस्व, लहान, मोठे, शुभ, अशुभ,
नाम व रूप हीं पूर्णपणें निरोध पावतात.
विज्ञानाच्या निरोधानें तेथें सर्व निरोध पावतें.’ ”

असें भगवान् म्हणाले. प्रमुदित चित्तानें केवट्ट गृहपतिपुत्रानें त्यांच्या भाषणाचा स्वीकार केला.

केवट्टसुत्त समाप्त.

---

१. सब्बतोपहं. ‘पभ म्हणजे तीर्थ. ज्यास सर्व बाजूंनीं तीर्थ आहे असें. मूळ पपा म्हणजे तीर्थ. पण येथें पकाराचा भकार आला आहे. ज्याप्रमाणें समुद्रांत वाटेल त्या बाजूनें उतरतां येतें, कोणत्याही बाजूनें न उतरण्यासारखी जागा नसते, त्याप्रमाणें ज्या ज्या तऱ्हेनें विज्ञान मिळविण्याची इच्छा असेल त्या त्या तऱ्हेनें तें मिळवितां येतें.’ ( बुद्धघोष ). टीकाकारानें याचा अर्थ पभं म्हणजे पभस्सरं ( प्रकाशणारें ) असा केला आहे, व हाच अर्थ बरोबर दिसतो. जातक ५३९.२५ येथील टीकाकारानें ‘ समन्ततो अलंकारोभासयुत्तं’ असाच अर्थ केला आहे.

२. उदान १·१० सुत्तनिपात ७३४, १०३७, संयुत्त १·३·३; १·३·७; १·५·१०. नेत्ती १५०. अशाच तऱ्हेचा दुसरा एक प्रश्न उपनिषदें व बौद्ध वाङ्मय यांमध्यें आढळतो. बृहदारण्यकोपनिषत् ३·३·१; ३·६ ( लोकानां अन्तानं पृच्छामः ). संयुत्त २·३·६. अंगुत्तर १·४५,४६; ९·३८ येथें रोहितास्स नांवाचा ऋषी खाणेंपिणें, झोंप इत्यादि सर्व व्यवहार सोडून देऊन सतत शंभर वर्षे चालून चालून दमला तरी त्यास लोकाच्या अंताचा पत्ता लागला नाहीं ही गोष्ट सांगितली आहे. सरतेशेवटीं बुद्ध म्हणतात—

गमनेन न पत्तब्बो लोकस्सन्तो कुदाचनं
न च अप्पत्वा लोकन्तं दुक्खा अत्थि पमोचनं ।
तस्मा हवे लोकविदू सुमेधो लोकन्तगू वुसितब्रह्मचरियो
लोकस्स अन्तं समितावि ञत्वा नासिंसति लोकमिमं परं च ।

# परिशिष्ट.

महालिसुत्तांत ( पृ० १७९) दिव्य शब्द ऐकणें व दिव्य रूपें पाहणें हें ब्रह्मचर्याचें अन्तिम साध्य नाहीं असें सांगितलें. येथें चमत्कार करून दाखविण्याचें सामर्थ्य अंगीं येणें हाही ब्रह्मचर्याचा उद्देश नव्हे हें दाखविलें आहे. चमत्कार करून दाखविण्यानें जनसमूहाची श्रद्धा वाढते हें खरें, परंतु लोकांचीं मनें आपल्या कार्याकडे अशा रितीनें ओढून घेणें हा मार्ग कांहीं झालें तरी गौणच व आत्यंतिक मुक्ततेच्या दृष्टीनें चुकीचाच ठरणार यांत शंका नाहीं. म्हणून भगवान् बुद्धांनीं अनेक रितींनीं आपल्या धर्मसाधनाचें अंतिम साध्य काय व निरनिराळे लोक या साध्याकडे दुर्लक्ष करून दुसऱ्या गौण गोष्टींच्या मागें लागून कसे फसतात हें सविस्तर सांगितलें आहे. दुःखापासून मुक्तता करून घेणें हें तें साध्य. तें प्राप्त करून घेण्याच्या मार्गानें जात असतां जीं जीं बलें मिळतात त्यांकडे लक्ष न देतां साध्यावरच पूर्ण नजर ठेवून आपला मार्ग आक्रमण करणें हेंच मनुष्याचें कर्तव्य होय.

समाधीच्या योगानें प्राप्त करून घेतलेल्या बुद्धीच्या बलानें पाहिजे तर वाटेल त्या देवलोकांत जातां येईल, परंतु त्यामुळें श्रेष्ठ प्रश्न कांहीं सुटत नाहीं. त्याला बुद्धाच्या उपदेशाचाच अवलंब केला पाहिजे, हें दाखविण्याच्या उद्देशानें भगवंतांनीं एक भिक्षु आपल्या शंकेचें समाधान करून घेण्याकरितां सर्व स्वर्गलोक कसे हिंडला व शेवटीं कर्ता, निर्माता, वशी व सर्वश्रेष्ठ देव ब्रह्मा याजकडून सुद्धां उत्तर न मिळाल्यामुळें त्यास परत भगवंतांकडेच कसें यावें लागलें ही मजेदार व बोधप्रद गोष्ट सांगितली आहे. ती शंका म्हणजे महाभूतें पूर्णपणें कोठें निरोध पावतात ही होय. परंतु हा प्रश्न मुळांतच चुकीचा आहे. कारण महाभूतें म्हणजे काय आहे, त्यांचा पूर्ण निरोध होतो कीं नाहीं, तो कोठें व कसा होतो हें कोणीच सांगूं शकणार नाहीं. त्यांचें आस्तित्व आपल्या कल्पनाशक्तीमध्यें आहे व तिजवरूनच आपण या प्रश्नाचा उलगडा करण्याचा प्रयत्न करितों. म्हणून महाभूतें पूर्णपणें कोठें निरोध पावतात असें न विचारितां त्यांना अवकाश कोठें सांपडत नाहीं असें विचारिलें पाहिजे. त्यांना अवकाश न सांपडण्यास त्यांचें आस्तित्व ज्यामुळें आहे त्या कल्पनाशक्तीचा अर्थात् मनुष्याचा निरोध झाला पाहिजे, आणि मनुष्य हा तर नामरूपात्मक आहे. नाम म्हणजे मन व मनाच्या निरनिराळ्या शक्ती आणि रूप म्हणजे शरीर. हीं दोन्हीं एकमेकांच्या आधारानें एकमेकांशीं संलग्न होऊन राहतात. यांची जेव्हां जोडी फोडावी तेव्हांच महाभूतांना कोठेंही अवकाश सांपडणार नाहीं. हें नामरूप विज्ञानावर अवलंबून आहे. विज्ञानामुळेंच नामरूप उद्भवतें. त्यामुळेंच निरनिराळे जन्म घेऊन या संसारचक्रामध्यें एकसारखें फिरत रहावें लागतें. उलट नामरूपामुळें विज्ञान उत्पन्न होतें. असें हें चक्र आहे. तेव्हां विज्ञान व नामरूप या दोहोंचाही निरोध केला पाहिजे. नामरूपाचा निरोध विज्ञानाच्या

निरोधानें होतो व विज्ञानाचा निरोध वेदनांचा आस्वाद न घेण्यानें होतो. या दोहोंचाही निरोध झाला म्हणजे संसार संपले, करावयाचें तें करून झालें, त्यापुढें कांहींही करावयाचें व मिळवावयाचें उरलें नाहीं, अशी स्थिति प्राप्त होते. मग तेथें महाभूतांसच काय पण कशासच अवकाश उरत नाहीं.

## बौद्धांची स्वर्गमालिका.

एकंदर स्वर्ग २६ आहेत. त्यांतील चातुम्महाराजिकदेवलोकावर चार देवांचा (महाराजे अथवा दिक्पाल यांचा) अम्मल आहे. पूर्वदिशेस गंधर्वांचा राजा धृतराष्ट्र असतो. पश्चिमेस नागांचा राजा विरूपाक्ष याचें राज्य आहे. दक्षिणेस कुंभंडांचा अधिपति विरूढक हा असतो व उत्तरेस यक्षांचा स्वामी कुबेर याचा प्रदेश आहे. याच्यापुढें तावतिंस देवलोक ( त्रयस्त्रिंशत् ) आहे. त्याचा स्वामी शक्र अथवा इंद्र हा आहे. यापुढें याम, तुसित, निम्मानरति व परनिम्मितवसवत्ति असे चार लोक आहेत. यापुढील तीन लोकांस ब्रह्मकायिक असें म्हणतात. येथूनच रूपलोकास सुरुवात होते. याच्या आधीं जे सहा लोक वर सांगितले त्या सर्वांस मिळून कामलोक अशी संज्ञा आहे, कारण यांतील सर्व देव कामरागाच्या वशांत असतात. रूपलोक म्हणजे जेथें रूप उर्फ शरीर आहे, परंतु कामरागाचें आस्तित्व नाहीं तो लोक. ब्रह्मकायिक लोकांमधील पहिले ब्रह्मदेवाच्या परिषदेतील सभासद व दुसरे त्यांचे पुरोहित होत. तिसरे महाब्रह्मा हे पुष्कळ आहेत. या लोकांची प्राप्ति पहिल्या ध्यानानें होते. दुसऱ्या ध्यानानें ज्यांची प्राप्ती होते असे तीन लोक आहेत. ते सर्व देदीप्यमान असतात, व जसजसें वर चढत जावें तसतशी त्यांची प्रभा अधिकाधिक आहे असें आढळून येतें. तिसऱ्या ध्यानानें प्राप्त होणाऱ्या लोकांतील देव शुभ असतात. त्यांतील पहिले साधारण शुभ, दुसरे अतिशय शुभ, व तिसरे पूर्णपण शुभ. यापुढील सात लोकांची प्राप्ति चवथ्या ध्यानानें होते. त्यांतील वरील पांचांना सुद्धावास ( शुद्ध देवांचें भवन ) असें म्हणतात. वरील चार लोकांस अरूपलोक म्हणतात. त्यांस विशेष नांवें नसून ज्या ज्या अरूपध्यानांनीं त्यांची प्राप्ति होते त्या त्या नांवांनींच ते ओळखिले जातात. तेथील देवांस शरीर नसून केवळ चित्तानेंच त्यांचा व्यवहार चालतो. हे सव्वीस स्वर्ग व मनुष्यलोक, असुरभवन, पेत्तिविसय, तिरच्छानयोनि व निरय मिळून एकतीस लोक होतात.

---

१ अज्झत्तं च बहिद्धा च वेदनं नाभिनन्दतो
एवं सतस्स चरतो विञ्ञाणं उपरुज्झति । सुत्तनिपात १११९.

२ Kern. Man. Ind. Bud. pp 57–60. Hardy. Manual p.p. 24-28 पहा.

## बौद्धांची स्वर्गमालिका.

| | | |
|---|---|---|
| अरूपलोक. | ३१ नेवसञ्ञानासञ्ञायतन<br>३० आकिञ्चञ्ञायतन<br>२९ विञ्ञाणानञ्चायतन<br>२८ आकासानञ्चायतन | अरूपध्यानांनीं प्राप्त होणारे. |
| रूपलोक. | २७ अकनिट्ठ<br>२६ सुदस्सी<br>२५ सुदस्स<br>२४ आतप्प<br>२३ अविह<br>२२ असञ्ञीसत्त<br>२१ वेहप्फल | चवथ्या ध्यानानें प्राप्त होणारे. |
| | २० सुभकिण्ण<br>१९ अप्पमाणसुभ<br>१८ परित्तसुभ | तिसऱ्या ध्यानानें प्राप्त होणारे. |
| | १७ आभस्सर<br>१६ अप्पमाणाभ<br>१५ परित्ताभ | दुसऱ्या ध्यानानें प्राप्त होणारे. |
| | १४ महाब्रह्मा<br>१३ ब्रह्मपुरोहित<br>१२ ब्रह्मपारिसज्ज | ब्रह्मकायिक. पहिल्या ध्यानानें प्राप्त होणारे. |
| कामलोक. | ११ परनिम्मितवसवत्ति<br>१० निम्मानरति<br>९ तुसित<br>८ याम<br>७ तावतिंस<br>६ चातुम्महाराजिक | |
| ५ मनुस्सलोक | | |
| अपायलोक | ४ असुरभवन<br>३ पेत्तिविसय<br>२ तिरच्छानयोनि<br>१ निरय— | (आठ—संजीव, कालसुत्त, संघात, रोरुव, महारोरुव, तपन, पतापन, अवीचि.) |

# १२ लोहिच्चसुत्त.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके समयीं भगवान् [ बुद्ध ] कोसल देशांत पांचशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासह हिंडत असतां सालवतिकेकडे गेले. त्यावेळीं लोहिच्च नांवाचा ब्राह्मण सालवतिकेंत रहात होता. तें गांव मनुष्यांनीं गजबजलेलें, तृण, काष्ठ, उदक व धान्य यांनीं परिपूर्ण व राजभोग्य असें असून कोसलदेशाचा राजा पसेनदि यानें लोहिच्चे ब्राह्मणास राजदाय म्हणून दान दिलें होतें.

२ त्यावेळीं लोहिच्च ब्राह्मणाच्या मनांत असा खोटा पापविचार आला कीं, ' एखाद्या श्रमणाला अथवा ब्राह्मणाला एखादा कुशल विचार सुचला तर त्यानें तो दुसऱ्या कोणास सांगू नये. कारण एक दुसऱ्याचें काय करूं शकणार? ज्याप्रमाणें जुनें बंधन तोडून टाकून नवें बंधन उत्पन्न करावें त्याप्रमाणेंच हा त्याचा लोभयुक्त पापविचार होईल. कारण एक दुसऱ्याचें काय करूं शकणार? '

३ लोहिच्च ब्राह्मणानें ऐकिलें कीं, ' शाक्यपुत्र श्रमण गोतम शाक्य-कुलांतून बाहेर पडून वेसालीनगरींत महावनांत कूटागारशालेंत रहात आहे. त्या भगवान् गोतमाची अशी कीर्ती पसरली आहे कीं, अर्हत्, सम्यक्संबुद्ध ...... अशा अर्हन्तांचें दर्शन घेणें चांगलें. '

४ तेव्हां लोहिच्च ब्राह्मणानें रोसिके नांवाच्या न्हाव्याला हाक मारून त्यास म्हटलें, ' मित्रा रोसिका, इकडे ये व भगवंतांकडे जाऊन माझ्या वतीनें त्यांस म्हण कीं, लोहिच्च ब्राह्मणानें असें विचारिलें आहे कीं, ' आपला आजार व त्रास कमी आहे ना? आपली प्रकृती ठीक आहे ना? आपल्याला शक्ती व आराम वाटतो ना? ' व आणखी असें सांग कीं, उद्यां आपण कृपा करून लोहिच्च ब्राह्मणाच्या घरीं जेवावयास यावें. '

---

१. त्या गांवास सालवृक्षांची वती ( कुंपण ) होती म्हणून त्याचें नांव सालवतिका. २ पृष्ठ १०३ पहा. ३ याच्या कुळाच्या मूळपुरुषाचें नांव लोहित असें होतें. म्हणून गोत्रनामानें त्यास लोहिच्च असें म्हटलें आहे. ( टीका ). Vedic Index ii. 235 पहा. ४ पृ० १०४ पहा. ५ भेसिक असाही पाठ आहे. ६ रोसिके अथव भेसिके. त्याचें असें स्त्रीलिंगी नांव पडलें होतें. ( बुद्धघोष ).

५ 'ठीक आहे,' असें त्यास उत्तर देऊन रोसिकानें भगवंतांकडे जाऊन त्यांस निरोप कळविला. भगवंतांनीं स्तब्ध राहून अनुमती दर्शविली.

६ तेव्हां रोसिक न्हावी भगवंतांची अनुमती जाणून, आसनावरून उठून, भगवंतांस अभिवादन करून, लोहिच्च ब्राह्मणाकडे गेला व त्यास म्हणाला, 'मी तुझ्या वतीनें भगवंतांस तुझा निरोप सांगितला आणि भगवंतांनीं आपली अनुमती दर्शविली आहे.'

७ तेव्हां लोहिच्च ब्राम्हणानें ती रात्र सरल्यावर आपल्या घरीं उत्तम उत्तम पदार्थ तयार करून रोसिक न्हाव्यास हाक मारून सांगितलें, 'मित्रा रोसिका, श्रमण गोतमाकडे जा व त्यास सांग कीं, हे गौतम, वेळ झाली. जेवण तयार आहे.' 'ठीक आहे,' असें त्यास उत्तर देऊन रोसिक न्हावी भगवंतांकडे जाऊन त्यांस अभिवादन करून एके बाजूस बसला व म्हणाला, 'भगवन्, वेळ झाली. जेवण तयार आहे.' तेव्हां भगवान् सकाळींच वस्त्रपरिधान करून पात्र व चीवर घेऊन भिक्षुसंघासहित सालवतिकेकडे जाण्यास निघाले.

८ त्यावेळीं रोसिक न्हावी भगवंतांच्या पाठीमागून चालला होता. तो भगवंतांस म्हणाला, 'भगवन्, लोहिच्च ब्राम्हणाच्या मनांत असा खोटा पापविचार आला आहे कीं, 'एखाद्या श्रमणाला अथवा ब्राम्हणाला एखादा कुशल विचार सुचला तर त्यानें तो दुसऱ्या कोणास सांगूं नये. ...... कारण एक दुसऱ्याचें काय करूं शकणार?' तर भगवंतांनीं लोहिच्च ब्राह्मणाला या पापविचारापासून सोडवावें.'

'होय, तसेंच होईल, रोसिका, तसेंच होईल.'

९ नंतर भगवान् लोहिच्च ब्राह्मणाच्या घरीं आले व त्यांजकरितां पसरिलेल्या आसनावर बसले. नंतर लोहिच्च ब्राम्हणानें बुद्धप्रमुख संघाला उत्तम उत्तम पदार्थ आपल्या हातानें आग्रह करकरून वाढले व त्यांस संतुष्ट केलें. भगवंतांचें भोजन होऊन त्यांनीं हात धुतल्यावर लोहिच्च ब्राह्मण एका बाजूस लहानशा आसनावर बसला. तेव्हां त्यास भगवान् म्हणाले, 'लोहिच्चा, 'एखाद्या श्रमणाला अथवा ब्राम्हणाला एखादा

कुशल विचार सुचला तर त्यानें तो दुसऱ्यास सांगू नये....कारण एक दुसऱ्याचें काय करूं शकणार? ' असा खोटा पापविचार तुझ्या मनांत आला हें खरें कां? '

' होय, गौतम. '

१० 'तर, लोहिच्चा, तुला काय वाटतें? तूं सालवतिकेंत राहतोस ना?'

' होय, गौतम. '

' जो कोणी, लोहिच्चा, असें म्हणेल कीं, ' लोहिच्च ब्राह्मण सालवतिकेंत राहतो, त्यानें सालवतिकेंतील सर्व मालमत्ता व मिळकत एकट्यानेंच घ्यावी, दुसऱ्या कोणास देऊं नये, ' तो तुझ्यावर अवलंबून राहणाऱ्या लोकांस भयदायकच होईल कीं नाहीं? '

' होय, गौतम, भयदायकच होईल. '

' भयदायक असला म्हणजे तो त्यांच्या हिताची काळजी वाहील कीं नाहीं? '

' नाहीं, गौतम, तो त्यांच्या हिताची काळजी वाहणार नाहीं. '

' जो त्यांच्या हिताची काळजी वाहणार नाहीं त्याचें चित्त मैत्रीयुक्त असेल कीं वैरयुक्त असेल? '

' वैरयुक्त असेल, गौतम. '

' वैरयुक्त चित्त असलें म्हणजे त्याचे विचार बरोबर असतील कीं चूक असतील?'

' चूक असतील, गौतम. '

' ज्याचे विचार चूक असतील, त्याला दोन गतींपैकीं एक गती मिळणार असें मी म्हणतों, एक नरक अथवा दुसरा जनावराचा जन्म.

११ ' तर तुला काय वाटतें, लोहिच्चा? कोसल देशाचा राजा पसेनदि काशी व कोसल या देशांत राहतो ना? '

' होय, गौतम. '

'जो कोणी, लोहिच्चा, असें म्हणेल कीं, 'कोसल देशचा राजा पसेनदि काशी व कोसल या देशांत राहतो, त्यानें काशी व कोसल या देशांतील मालमत्ता एकट्यानेंच घ्यावी, दुसऱ्या कोणास देऊं नये,' तो जे तूं व दुसरे राजावर अवलंबून राहतां त्यांना भयदायक होईल कीं नाहीं?'

'होय, गौतम, भयदायकच होईल.'

'भयदायक असला म्हणजे तो त्यांच्या हिताची काळजी करील कीं नाहीं?'

'नाहीं, गौतम, तो त्यांच्या हिताची काळजी वाहणार नाहीं.'

'जो त्यांच्या हिताची काळजी वाहणार नाहीं त्याचें चित्त मैत्रीयुक्त असेल कीं वैरयुक्त असेल?'

'वैरयुक्त असेल, गौतम.'

'वैरयुक्त चित्त असलें म्हणजे त्याचे विचार बरोबर असतील कीं चूक असतील?'

'चूक असतील, गौतम.'

'ज्याचे विचार चूक असतील, त्याला दोन गतींपैकीं एक गता मिळणार असें मी म्हणतों, एक नरक अथवा दुसरा जनावराचा जन्म,

१२ 'याप्रमाणें, लोहिच्चा, जो कोणी असें म्हणेल कीं, 'लोहिच्च ब्राह्मण सालवतिकेंत राहतो, त्यानें सालवतिकेंतील सर्व मालमत्ता व मिळकत एकट्यानेंच घ्यावी, दुसऱ्या कोणास देऊं नये,' तो तुझ्यावर अवलंबून राहणाऱ्या लोकांस भयदायकच होईल. जो भयदायक होईल तो तुझ्यावर अवलंबून राहणारांच्या हिताची काळजी वाहणार नाहीं, जो अशी काळजी वाहणार नाहीं त्याचें चित्त त्यांजाविषयीं वैरयुक्त असणार, व वैरयुक्त चित्त झाल्यामुळें त्याचे विचार चूक असणार.

१३ 'त्याचप्रमाणें, लोहिच्चा, जो असें म्हणेल कीं, 'एखाद्या श्रमणाला अथवा ब्राह्मणाला एखादा कुशल विचार सुचला तर त्यानें तो दुसऱ्या कोणास सांगूं नये. ... कारण एक दुसऱ्याचें काय करूं शकणार?' तो तथागतानें सांगितलेला धर्म व विनय ऐकून ज्या कुलपुत्रांनीं अशा

तऱ्हेचा मोठेपणा मिळविला आहे म्हणजे ज्यांनीं सोतापत्ति, सकदागामि, अनागामि व अरहत्त या चार मार्गांचा साक्षात्कार करून घेतला आहे व दिव्य लोकांत जन्म मिळविण्याकरितां ज्यांनीं दिव्य गर्भ परिपूर्ण केले आहेत, त्यांना भयदायकच होईल. जो भयदायक होईल तो वर सांगितलेल्या कुलपुत्रांच्या हिताची काळजी वाहणार नाहीं, जो अशी काळजी वाहणार नाहीं त्याचें चित्त त्यांजविषयीं वैरयुक्त असणार, व ज्याचें चित्त असें वैरयुक्त असेल त्याचे विचार चूक असणार. ज्याचे विचार चूक असतील त्याला दोन गतींपैकीं एक गती मिळणार असें मी म्हणतों, एक नरक किंवा दुसरा जनावराचा जन्म.

१४ ‘ त्याचप्रमाणें, लोहिच्चा, जो कोणी असें म्हणेल कीं, ‘ कोसल देशचा राजा पसेनदि काशी व कोसल या देशांत राहतो, त्यानें काशी व कोसल या देशांतील मालमत्ता एकट्यानेंच घ्यावी, दुसऱ्या कोणास देऊं नये, ’ तो जे तूं व दुसरे राजावर अवलंबून राहतां त्यांना भयदायकच होईल. जो भयदायक होईल तो तूं व दुसरे राजावर अवलंबून राहणारे यांची काळजी वाहणार नाहीं, जो अशी काळजी वाहणार नाहीं त्याचें चित्त त्यांजविषयीं वैरयुक्त असणार, व वैरयुक्त चित्त झाल्यामुळें त्याचे विचार चूक असणार.

१५ ‘त्याचप्रमाणें, लोहिच्चा, जो असें ह्मणेल कीं, ‘ एखाद्या श्रमणाला अथवा ब्राह्मणाला ...[ = १३ ]... एक नरक किंवा दुसरा जनावराचा जन्म.

१६ ‘लोहिच्चा, या जगांत निंद्य असे तीन शास्ते आहेत. त्यांची कोणीं निंदा केली तर ती खरी, योग्य, धार्मिक व निर्दोष होईल. कोणते तीन-

‘ लोहिच्चा, एका शास्त्यास ज्याकरितां तो घरांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतो तें श्रामण्य मिळत नाहीं, व तें श्रामण्य मिळालें नसतांना, ‘ यानें तुम्हास सुख होईल, यानें तुमचें हित होईल,’ असें म्हणून तो श्रावकांना धर्म शिकावितो. त्याचें ते श्रावक ऐकत नाहींत, त्याच्या बोलण्याकडे लक्ष देत नाहींत, ज्ञान मिळवून आपलें चित्त स्थिर करीत नाहींत व त्या

---

१ चुल्लवग्ग ७.२.२-४ पहा.

शास्त्याचा उपदेश सोडून देऊन निघून जातात. त्या शास्त्याची अशी निंदा करावी कीं, ‘ ज्याकरितां घरांतून बाहेर पडून तूं प्रव्रज्या घेतलीस तें श्रामण्य तुला मिळालें नाहीं व तें श्रामण्य मिळालें नसतांना तूं ‘ यानें तुह्मास सुख होईल, यानें तुमचें हित होईल, ’ असें ह्मणून श्रावकांना धर्म शिकवितोस. तुझे ते श्रावक ऐकत नाहींत, तुझ्या बोलण्याकडे लक्ष देत नाहींत, ज्ञान मिळवून आपलें चित्त स्थिर करीत नाहींत व तुझा उपदेश सोडून देऊन निघून जात आहेत. ज्याप्रमाणें दूर सरणाऱ्या [ बाईच्या ] जवळ जवळ जावें अथवा तोंड फिरवणारीला आलिंगन देऊं लागावें त्याप्रमाणें तुझें हें पापी, लोभी आचरण आहे, असें मी म्हणतों. कारण एक दुसऱ्याचें काय करूं शकणार? ’

‘ हा, लोहिच्चा, एक निंद्य शास्ता होय. त्याची कोणी निंदा केली तर ती खरी, योग्य, धार्मिक व निर्दोष होईल.

१७ ‘ पुन्हा, लोहिच्चा, एका शास्त्यास ज्याकरितां तो घरांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतो तें श्रामण्य मिळत नाहीं, व तें श्रामण्य मिळालें नसतांना ‘ यानें तुम्हास सुख होईल, यानें तुमचें हित होईल, ’ असें म्हणून तो श्रावकांना धर्म शिकवितो. त्याचे ते श्रावक ऐकतात, त्याच्या बोलण्याकडे लक्ष देतात, ज्ञान मिळवून आपलें चित्त स्थिर करितात, व त्या शास्त्याचा उपदेश सोडून जात नाहींत. त्याची अशी निंदा करावी कीं, ‘ तूं ज्याकरितां घरांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतलीस तें श्रामण्य तुला मिळालें नाहीं, व तें श्रामण्य मिळालें नसतांना, ‘ यानें तुम्हांस सुख होईल, यानें तुमचें हित होईल, ’ असें म्हणून तूं श्रावकांना धर्म शिकवितोस. तुझे ते श्रावक ऐकतात, तुझ्या बोलण्याकडे लक्ष देतात, ज्ञान मिळवून आपलें चित्त स्थिर करतात व तुझा उपदेश सोडून जात नाहींत. ज्याप्रमाणें आपलें शेत सोडून देऊन दुसऱ्याचें शेत पेरण्याचा विचार करावा, त्याप्रमाणें तुझें हें पापी, लोभी आचरण आहे. कारण एक दुसऱ्याचें काय करूं शकणार? ’

‘ हा, लोहिच्चा, दुसरा निंद्य शास्ता होय. त्याची कोणी निंदा केली तर ती निंदा खरी, योग्य, धार्मिक व निर्दोष होईल.

१८ ' पुन्हा, लोहिच्चा, एका शास्त्यास ज्याकरितां तो घरांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतो तें श्रामण्य मिळतें, व तें श्रामण्य मिळालें असतां ' यानें तुम्हास सुख होईल, यानें तुमचें हित होईल,' असें म्हणून तो श्रावकांना धर्म शिकवितो. त्याचें तें श्रावक ऐकत नाहींत, त्याच्या बोलण्याकडे लक्ष देत नाहींत, ज्ञान मिळवून आपलें चित्त स्थिर करीत नाहींत, व त्या शास्त्याचा उपदेश सोडून देऊन निघून जातात. त्या शास्त्याची अशी निंदा करावी कीं, ' तूं ज्याकरितां घरांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतलीस तें श्रामण्य तुला मिळालें आहे व तें श्रामण्य मिळालें असतां ' यानें तुम्हास सुख होईल, यानें तुमचें हित होईल, असें म्हणून तूं श्रावकांना धर्म शिकवितोस. तुझें ते श्रावक ऐकत नाहींत, तुझ्या बोलण्याकडे लक्ष देत नाहींत, ज्ञान मिळवून आपलें चित्त स्थिर करीत नाहींत व तुझा उपदेश सोडून देऊन निघून जात आहेत. ज्याप्रमाणें जुनें बंधन तोडून नवें बंधन करावें, त्याप्रमाणें तुझें हें पापी, लोभी आचरण आहे, असें मी म्हणतों. कारण एक दुसऱ्याचें काय करूं शकणार ? '

' हा, लोहिच्चा, तिसरा निंद्य शास्ता होय. त्याची कोणी निंदा केली तर ती खरी, योग्य, धार्मिक व निर्दोष होईल.

' या जगांत, लोहिच्चा, निंद्य असे हे तीन शास्ते आहेत. त्यांची कोणीं निंदा केली तर ती खरी, योग्य, धार्मिक व निर्दोष होईल. '

१९-७६ असें भगवान बोलल्यावर लोहिच्च ब्राह्मण त्यांस म्हणाला, 'गौतम, अनिंद्य असा या जगांत कोणी शास्ता आहे काय ? '

'होय, लोहिच्चा, अनिंद्य असा या जगांत एक शास्ता आहे. तो कोणता ? [ सामञ्ञफलसुत्त ४०—९८ याप्रमाणें ].

७७ ' ज्याच्यामुळें, लोहिच्चा, श्रावक अशा तऱ्हेचा मोठेपणा मिळवूं शकतो तो शास्ता अनिंद्य होय. त्याची कोणी निंदा केली तर ती खोटी, अयोग्य, अधार्मिक व अनुचित होईल. '

७८ असें भगवान् म्हणाल्यावर लोहिच्च ब्राह्मण भगवंतांस म्हणाला, 'ज्याप्रमाणें एखाद्या पुरुषानें नरकाच्या कड्यावरून पडणाऱ्या मनुष्यास केस धरून वर ओढून [ निर्भय ] जागीं ठेवावें, त्याप्रमाणें भगवंतांनीं नरकाच्या कड्यावरून पडणाऱ्या मला ओढून [ निर्भय ] जागीं ठेविलें आहे. वाहवा! गौतम, वाहवा! ज्याप्रमाणें, गौतम, एखाद्यानें उपडें झालेलें सुलटें ठेवावें, अथवा झांकलेलें उघडें करावें, अथवा वाट चुकलेल्यास मार्ग सांगावा, अथवा डोळस मनुष्यांना वस्तू दिसाव्या म्हणून अंधारांत तेलाचा दिवा दाखवावा; त्याप्रमाणें आपण अनेक तऱ्हांनीं धर्माचा उपदेश केलेला आहे. तर हा मी भगवान् गौतमास, धर्मास व भिक्षुसंघास शरण जातों. शरण आलेल्या मला आपण आजपासून मरेपर्यंत उपासक समजावें.'

लोहिच्चसुत्त समाप्त.

---

# परिशिष्ट.

आपल्यास कांहीं विशेष ज्ञान मिळालें तर तें इतरांस सांगावें कीं नाहीं हा या सूत्राचा विषय आहे. मोठ्या परिश्रमानें मिळविलेलें ज्ञान दुसऱ्यास काय म्हणून सांगावें असें कित्येकांचें मत असतें. आपला आपण फायदा करून घेतला म्हणजे झालें, दुसऱ्यांच्याकडे कोण लक्ष देत बसतो ? त्यांनीं काय वाटेल तें करावें आणि स्वतःच्या सामर्थ्यानें ज्ञान प्राप्त करून घ्यावें. कोणी कोणास मदत करीत बसण्यांत कांहीं हंशील नाहीं. अशा मताचे जे लोक असतात त्यांची नजर आपल्यापुरतीच असते. त्यांच्या दृष्टीचा विकासच झालेला नसतो. भगवान् बुद्धांस संबोधी प्राप्त झाली होती, त्यांस सर्व यथाभूतज्ञानाचा साक्षात्कार झालेला होता. परंतु त्यांच्या चरित्रांतील विशेष रहस्य पाहिलें तर ज्ञानाच्या जोडीस त्यांच्या चित्तांत करुणा वास करीत होती हेंच होय असें दिसून येईल. त्यांस केवळ आपल्या एकट्याचाच तेवढा उद्धार करावयाचा नव्हता, तर सर्व जगांतील लोकांस संसारसागर तरून जाण्याचा मार्ग दाखवावयाचा होता. हें काम त्यांनीं किती उत्साहानें आणि कळकळीनें केलें याची साक्ष त्यांचें सर्व चरित्रच देईल. आणि म्हणूनच तर त्यांची एवढी थोरवी ! नाहीं तर एखाद्यास कितीही श्रेष्ठ ज्ञान प्राप्त झालें तरी त्याचें इतरेजनांस काय होय ?

परंतु ज्ञान झालें कीं लागलेंच तें तसें लोकांपुढें टाकणेंही योग्य नाहीं. आपला विचार परिशुद्ध आहे कीं नाहीं हें आधीं पाहिलें पाहिजे व मग नीट काळजीपूर्वक तो लोकांपुढें मांडला पाहिजे. ज्ञान द्यावयाचें तें सर्वांना सारखें, पंक्तिप्रपंच न करितां दिलें पाहिजे, आणि तें कशा रितीनें मांडिलें असतां लोकांना लवकर कळेल याचा विचार करून मग तें दिलें तरच लोक तें लक्षपूर्वक ऐकून घेऊन आपला फायदा करून घेतील. अशा तऱ्हेनें स्वतः श्रेष्ठ ज्ञान प्राप्त करून घेऊन नंतर दयार्द्र अंतःकरणानें त्याचा भूतलावर प्रसार करून सर्व मानवजातीची उन्नति घडवून आणणें हेंच परम कर्तव्य होय, व तेंच येथें भगवंतांनीं सांगितलें आहे.

---

# १३ तेविज्जसुत्त.

१ असें मीं ऐकिलें आहे. एके समयीं भगवान् [ बुद्ध ] कोसल देशांत हिंडत असतां पांचशें भिक्षूंच्या मोठ्या समुदायासह कोसल देशांतील मनसाकट नांवाचें ब्राह्मणाचें गांव होतें तिकडे गेले व मनसाकटाच्या उत्तरेस अचिरवती नदीच्या तीरीं आम्रवनामध्यें राहिले.

२ त्यावेळीं मनसाकटांत चंकी, तारुक्ख, पोक्खरसाती, जानुस्सोणी, तोदेय्य व आणखीही पुष्कळ मोठे व नामांकित ब्राह्मण रहात होते.

३ तेथें वासेट्ठ व भारद्वाज [ हे दोघे तरुण ब्राह्मण ] पाय मोकळे करण्याकरितां इकडे तिकडे फिरत असतां त्यांच्या खरा व खोटा मार्ग याविषयीं गोष्टी चालल्या होत्या.

४ वासेठ म्हणाला, ‘ नीट, सरळ, [ मोक्षास ] नेणारा, त्याप्रमाणें चालणाऱ्यास ब्रह्मसहव्यता प्राप्त करून देणारा जर कोणता मार्ग असेल तर तो पोक्खरसाती ब्राह्मणानेंच सांगितलेला होय. ’

५ भारद्वाज म्हणाला, ‘ नीट, सरळ, ...... तर तो तारुक्ख ब्राह्मणानेंच सांगितलेला होय.’

६ परंतु एवढ्यानें वासेट्ठाला भारद्वाजाचें समाधान करितां येईना व भारद्वाजाला वासेट्ठाचें समाधान करतां येईना.

७ तेव्हां वासेट्ठ भारद्वाजास म्हणाला, ‘भारद्वाजा, शाक्यपुत्र श्रमण गौतम शाक्यकुलांतून बाहेर पडला असून हल्लीं तो मनसाकटाच्या उत्तरेस अचिरवती नदीच्या तीरीं आम्रवनांमध्यें रहात आहे. त्या भगवान् गौतमाविषयीं अशी कीर्ती पसरली आहे कीं, अर्हत्, सम्यक्संबुद्ध, विद्या आणि आचरण यांनीं संपन्न, सुगत, सर्व लोक जाणणारा, सर्वश्रेष्ठ,

---

१ चंकी ओपसाद ( ओपसाद ! ) वासी, तारुक्ख इच्छानंगलवासी, पोक्खरसाती उक्कट्ठावासी, जानुस्सोणी सावात्थिवासी व तोदेय्य तुदिगामवासी असे होते. मंत्रपाठ करण्याकरितां ते मधून मधून मनसाकटांत रहात असत (बुद्धघोष). २ सं. तारुक्ष्य अथवा तार्क्ष्य. ( ऐतरेय आरण्यक ३-१-६, शांखायन आरण्यक ७-१९ पहा. )

दमन करण्यास योग्य अशा जनांचा मार्गदर्शक व देव आणि मनुष्य यांचा शास्ता, असा भगवान् बुद्ध आहे. तर, भारद्वाजा, चल, आपण श्रमण गौतमाकडे जाऊं व त्याला हा प्रश्न विचारूं, आणि तो जसें त्या प्रश्नाचें उत्तर देईल तसेंच आपण समजूं.' 'ठीक आहे,' असें म्हणून भारद्वाजानें वासेट्ठाच्या म्हणण्यास अनुमोदन दिलें.

८ नंतर वासेट्ठ व भारद्वाज भगवंतांकडे गेले व त्यांना कुशल प्रश्न विचारून एके बाजूस बसले. एका बाजूस बसून वासेट्ठ भगवंतांस म्हणाला, 'आम्ही पाय मोकळे करण्याकारितां इकडे तिकडे फिरत असतां खरा व खोटा मार्ग याविषयीं आमच्यामध्यें गोष्टी निघाल्या. मी असें म्हणालों कीं, 'नीट, सरळ, ......तर तो पोक्खरसाती ब्राह्मणानेंच सांगितलेला होय.' भारद्वाज असें म्हणाला कीं, 'नीट, सरळ, ...... तर तो तारुक्ख ब्राह्मणानेंच सांगितलेला होय.' अशा रितीनें आमच्यामध्यें भांडण, विवाद, मतभेद पडला आहे.'

९ 'काय, वासेट्ठा, तूं असें म्हणतोस कीं, 'नीट, सरळ,...... तर तो पोक्खरसाती ब्राह्मणानेंच सांगितलेला होय,' आणि भारद्वाज असें म्हणतो कीं, 'नीट, सरळ,......तर तो तारुक्ख ब्राह्मणानेंच सांगितलेला होय?' मग कशासंबंधानें तुमच्यामध्यें भांडण, विवाद, मतभेद आहे?'

१० 'खरा व खोटा मार्ग यासंबंधीं. कारण कीं अद्धरिय[1], तित्तिरिय, छन्दोक, छन्दवा, ब्रह्मचरिय वगैरे अनेक ब्राह्मण अनेक मार्ग सांगतात.

१ अद्धरिय म्हणजे अध्वर्यव वेदाचें पठन करणारे. यजुर्वेदास अध्वर्यव वेद असेंही नांव आहे ( Muir, Original Sanskrit Texts, III 212 पहा ). तित्तिरिय म्हणजे यजुर्वेदीय. तैत्तिरिय संहिता म्हणून कृष्णयजुर्वेदाची संहिता आहे हें सुप्रसिद्धच आहे. छन्दोक अथवा छन्दोग म्हणजे सामवेदी. छन्दवा म्हणजे छन्दोगच. हें नांव पुष्कळ पोथ्यांमधून गाळलेलेंच आहे. ब्रह्मचरिय याबद्दल बव्हारिज असा पाठ आहे व तोच अधिक चांगला होय. कारण ऋग्वेद पठन करणाऱ्या ब्राह्मणांस बह्वृच् असें नांव आहे. ब्रह्मचरिय या शब्दाचा अर्थ ब्रह्मवेद म्हणजे अथर्ववेद जाणणारे असा करितां येईल. परंतु या सूत्राच्या त्रैविद्य या नांवावरूनच अथर्ववेद हा चवथा वेद असा येथें मानिलाच नाहीं हें उघड आहे.

हे सर्वच मार्ग [मोक्षास] नेणारे व त्याप्रमाणें चालणाऱ्यास ब्रह्मसहव्यता प्राप्त करून देणारे आहेत काय? ज्याप्रमाणें, हे गौतम, एखाद्या गांवाच्या अथवा शहराच्या जवळ अनेक मार्ग असावेत, त्याप्रमाणें अद्धरिय ... अनेक मार्ग सांगतात. हे सर्वच मार्ग [ मोक्षास ] नेणारे व त्याप्रमाणें चालणाऱ्यास ब्रह्मसहव्यता प्राप्त करून देणारे आहेत काय? '

११ ' काय, वासेट्ठा, हे सर्व मार्ग [ मोक्षाला ] नेतात असें तुझें म्हणणें आहे? '

' होय, गौतम, असेंच माझें म्हणणें आहे. '

' काय, वासेट्ठा, हे सर्व मार्ग [मोक्षाला] नेतात असें तुझें म्हणणें आहे? '

' होय, गौतम, असेंच माझें म्हणणें आहे. '

' काय, वासेट्ठा, हे सर्व मार्ग [मोक्षाला] नेतात असें तुझें म्हणणें आहे? '

' होय, गौतम, असेंच माझें म्हणणें आहे. '

१२ ' पण, कायरे, वासेट्ठा, हे जे त्रैविद्य ब्राह्मण आहेत, त्यांपैकीं एकानें तरी ब्रह्मा स्वतः पाहिला आहे काय? '

' नाहीं, गौतम. '

' पण, वासेट्ठा, हे जे त्रैविद्य ब्राह्मण आहेत त्यांपैकीं एखाद्याच्या आचार्यानें तरी ब्रह्मा स्वतः पाहिला आहे काय? '

' नाहीं, गौतम. '

' पण, वासेट्ठा, हे जे त्रैविद्य ब्राह्मण आहेत त्यांपैकीं एखाद्याच्या आचार्याच्या आचार्यानें तरी ब्रह्मा स्वतः पाहिला आहे काय? '

' नाहीं, गौतम. '

'पण, वासेट्ठा, हे जे त्रैविद्य ब्राह्मण आहेत, त्यांच्या आचार्यांच्या पूर्वींच्या सात पिढ्यांत तरी कोणी एखाद्यानें ब्रह्मा स्वतः पाहिला आहे काय? '

' नाहीं, गौतम. '

१३ ' पण, वासेट्ठा, हे जे त्रैविद्य ब्राह्मण आहेत त्यांचे पूर्वींचे ऋषी, मंत्रकर्ते व प्रवर्ते, ज्यांनीं गाइलेले, रचिलेले, व ग्रथिलेले जुने मंत्र ते जसे

पूर्वी गाइले अथवा म्हटले होते तसे बरोबर हे त्रैविद्य ब्राह्मण गातात व म्हणतात—ते ऋषी म्हणजे अष्टक, वामक, वामदेव, विश्वामित्र, जमदग्नी, अंगीरस, भारद्वाज, वसिष्ठ, काश्यप व भृगु—त्यांनीं असें कोठें म्हटलें आहे काय कीं ब्रह्मा कोठें आहे, तो कोठून आला व कोठें जाणार हें आम्हीं पाहिलेलें आहे, जाणिलेलें आहे ? '

' नाहीं, गौतम. '

१४ ' तर मग, वासेट्ठा, हे जे त्रैविद्य ब्राह्मण आहेत त्यांपैकीं एखाद्यानें किंवा त्यांच्या आचार्यांपैकीं एखाद्यानें किंवा त्यांच्या आचार्यांच्या आचार्यांपैकीं एखाद्यानें किंवा त्यांच्या आचार्यांच्या पूर्वींच्या सात पिढ्यांत एखाद्यानें सुद्धां ब्रह्मा स्वतः पाहिलेला नाहीं आणि त्यांचे पूर्वींचे ऋषी, मंत्रकर्ते व प्रवर्ते यांनींही कोठें असें म्हटलें नाहीं कीं, ब्रह्मा कोठें आहे, तो कोठून आला व कोठें जाणार हें आम्हीं पाहिलेलें आहे, जाणिलेलें आहे. आणि त्रैविद्य ब्राह्मण म्हणतात कीं जो आम्हीं पाहिलेला नाहीं, जाणिलेला नाहीं, त्याच्या सहव्यतेचा मार्ग आम्हीं सांगतों कीं, ' हाच नीट, सरळ, [मोक्षास] नेणारा, त्याप्रमाणें चालणाऱ्यास ब्रह्मसहव्यता प्राप्त करून देणारा मार्ग होय.' तर मग, वासेट्ठा, तुला काय वाटतें ? असें असतांना त्रैविद्य ब्राह्मणांचें हें म्हणणें मूर्खपणाचें नाहीं काय ?[१]'

' होय, गौतम, हें त्या त्रैविद्य ब्राह्मणांचें म्हणणें मूर्खपणाचें आहे. '

१५ ' हे त्रैविद्य ब्राह्मण जो त्यांनीं जाणिलेला नाहीं त्याच्या सहव्यतेचा मार्ग—हाच मार्ग नीट, सरळ, [ मोक्षास ] नेणारा, त्याप्रमाणें चालणाऱ्यास ब्रह्मसहव्यता प्राप्त करून देणारा आहे असें म्हणून—दाखवूं शकतील ही गोष्टच संभवत नाहीं. ज्याप्रमाणें, वासेट्ठा, आंधळ्यांची मालिका एकामेकांशीं संसक्त असते. त्यांत पहिल्यालाही दिसत नाहीं, मधल्यालाही दिसत नाहीं, शेवटल्यालाही दिसत नाहीं. त्याप्रमाणें या त्रैविद्य ब्राह्मणांचें भाषण आंधळ्यांच्या मालिकेप्रमाणें आहे. पहिल्यालाही

---

१ पृष्ठ १२१ पहा. २ पृष्ठ २१३ टीप १ पहा.

दिसत नाहीं, मधल्यालाही दिसत नाहीं, शेवटल्यालाही दिसत नाहीं. तेव्हां या त्रैविद्य ब्राह्मणांचें भाषण हास्यास्पद, केवळ शब्दमात्र, फुकट व तुच्छ आहे.

१६ ‘ तर मग, वासेट्ठा, तुला काय वाटतें ? जेव्हां हे त्रैविद्य ब्राह्मण चंद्र व सूर्य जिकडे उगवतात व जिकडे मावळतात, तिकडे हात जोडून याचना व स्तुती करितात, तेव्हां त्यांना इतर लोकांप्रमाणें ते चंद्रसूर्य दिसतात ना? ’

‘ होय, गौतम. ’

१७ ‘ तर मग, वासेट्ठा, तुला काय वाटतें ? जेव्हां हे त्रैविद्य ब्राह्मण चंद्र व सूर्य जिकडे उगवतात व जिकडे मावळतात तिकडे हात जोडून याचना व स्तुती करितात तेव्हां त्यांना इतर लोकांप्रमाणें ते चंद्रसूर्य दिसतात. तर हे त्रैविद्य ब्राह्मण ‘ हाच नीट, सरळ, [ मोक्षास ] नेणारा, त्याप्रमाणें चालणाऱ्यास चंद्रसूर्यसहव्यता प्राप्त करून देणारा मार्ग आहे, ’ असें म्हणून चंद्रसूर्यांच्या सहव्यतेचा मार्ग दाखवूं शकतील काय ? ’

‘ नाहीं, गौतम. ’

१८ ‘ याप्रमाणें, वासेट्ठा, जेव्हां इतर लोकांप्रमाणें हे त्रैविद्य ब्राह्मण चंद्र व सूर्य जिकडे उगवतात व जिकडे मावळतात तिकडे हात जोडून याचना व स्तुती करितात, तेव्हां सुद्धां ते ‘ हाच नीट, सरळ... मार्ग आहे, ’ असें म्हणून चंद्रसूर्यांच्या सहव्यतेचा मार्ग दाखवूं शकत नाहींत. परंतु या त्रैविद्य ब्राह्मणांनीं स्वतः ब्रह्मा पाहिला नाहीं, त्यांचे आचार्य किंवा आचार्यांचे आचार्य किंवा आचार्यांच्या पूर्वीच्या सात पिढ्या यांतही कोणीं ब्रह्मा स्वतः पाहिलेला नाहीं, आणि त्यांचे पूर्वीचे ऋषी,

१ ‘ एका धूर्तानें कांहीं आंधळ्यांस तुम्हांस जेथें पुष्कळ भिक्षा मिळेल अशा गांवीं नेतों असें सांगून त्यांजवळून पैसे उपटून एका आडवाटेंत नेऊन सोडिलें, व आपणास काम आहे असें सांगून तेथून पळ काढिला. ते आंधळे तसेच एकमेकांची पाठ धरून इकडे तिकडे हिंडतां हिंडतां मरण पावले. ’ ( बुद्धघोष ).

‘ अविद्यायां अन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पण्डितंमन्यमानाः ।
दंद्रम्यमाणा परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ॥ कठ० २·५ मुण्डक० १·२·८.

मंत्रकर्ते व प्रवर्ते यांनींही कोठें असें म्हटलें नाहीं कीं ब्रह्मा कोठें आहे, तो कोठून आला व कोठें जाणार हें आम्ही पाहिलेलें आहे, जाणिलेलें आहे. आणि तरी हे त्रैविद्य ब्राह्मण म्हणतात कीं जो आम्हीं पाहिलेला नाहीं, जाणिलेला नाहीं, त्याच्या सहव्यतेचा मार्ग आम्ही सांगतों कीं, ‘ हाच नीट, सरळ ... मार्ग होय. ’ तर मग, वासेट्ठा, तुला काय वाटतें ? असें असतां त्रैविद्य ब्राह्मणांचें हें म्हणणें मूर्खपणाचें नाहीं काय ? ’

‘ होय, गौतम. हें त्या त्रैविद्य ब्राह्मणांचें म्हणणें मूर्खपणाचें आहे. ’

‘ ठीक, वासेट्ठा, हे त्रैविद्य ब्राह्मण जो त्यांनीं पाहिलेला नाहीं त्याच्या सहव्यतेचा मार्ग ‘ हाच मार्ग नीट, सरळ ... देणारा आहे, ’ असें म्हणून दाखवूं शकतील ही गोष्टच संभवत नाहीं.

१९ ‘ ज्याप्रमाणें, वासेट्ठा, एखाद्या पुरुषानें म्हणावें कीं, ‘ या देशांतील जी अत्यंत सुंदर स्त्री ती मला आवडते, तिच्यावर माझें प्रेम आहे.’ त्याला दुसऱ्यानें विचारावें कीं, ‘ हे पुरुषा, या देशांतील जी अत्यंत सुंदर स्त्री आहे, जी तुला आवडते व जिच्यावर तुझें प्रेम आहे ती क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य किंवा शूद्र यांपैकीं कोणत्या जातीची आहे हें तुला माहीत आहे काय? ’ असें त्याला विचारिलें असतां त्यानें नाहीं म्हणून म्हणावें. त्याला पुन्हा विचारावें कीं, ‘ हे पुरुषा, या देशांतील जी अत्यंत सुंदर स्त्री आहे, जी तुला आवडते व जिच्यावर तुझें प्रेम आहे, तिचें नांव अमुक, गोत्र अमुक, ती उंच आहे अथवा ठेंगणी आहे कां मध्यम आहे, ती काळी आहे कीं सांवळी आहे कीं फिकट आहे व अमुक गांवांत अथवा नगरींत ती राहते हें तुला ठाऊक आहे काय?’ असें त्याला विचारिलें असतां त्यानें नाहीं म्हणून म्हणावें. त्याला पुन्हा विचारावें कीं, ‘हे पुरुषा, जी तुला माहीत नाहीं, जिला तूं पाहिलें नाहींस, ती तुला आवडते, तिच्यावर तुझें प्रेम आहे?’ असें त्याला विचारिलें असतां त्यानें होय म्हणून म्हणावें. तर मग तुला काय वाटतें, वासेट्ठा? या ठिकाणीं त्याचें हें बोलणें मूर्खपणाचें होणार नाहीं काय? ’

---

१ पृ० २१३ –२१४ पहा.

' होय, गौतम, खरोखरीच मूर्खपणाचें होईल. '

२० ' याप्रमाणें, वासेट्ठा, हे जे त्रैविद्य ब्राह्मण आहेत त्यांनीं किंवा त्यांच्या आचार्यांनीं किंवा त्यांच्या आचार्यांच्या आचार्यांनीं किंवा त्यांच्या आचार्यांच्या पूर्वींच्या सात पिढ्यांनीं ब्रह्मा स्वतः पाहिलेला नाहीं, आणि त्यांचे पूर्वींचे ऋषी, मंत्रकर्ते व प्रवर्ते यांनींही कोठें असें म्हटलें नाहीं कीं, ' ब्रह्मा कोठें आहे, तो कोठून आला व कोठें जाणार हें आम्हीं पाहिलेलें आहे, जाणिलेलें आहे. ' आणि तरी त्रैविद्य ब्राह्मण म्हणतात कीं, ' जो आम्हीं पाहिलेला नाहीं, जाणिलेला नाहीं, त्याच्या सहव्यतेचा मार्ग आम्ही सांगतों कीं, ' हाच नीट, सरळ ... मार्ग होय. ' तर मग, वासेट्ठा, तुला काय वाटतें ? असें असतां त्रैविद्य ब्राह्मणांचें हें म्हणणें मूर्खपणाचें नाहीं काय ? '

' होय, गौतम, हें त्या त्रैविद्य ब्राह्मणांचें म्हणणें मूर्खपणाचें आहे. '

' ठीक, वासेट्ठा, हे त्रैविद्य ब्राह्मण जो त्यांनीं पाहिलेला नाहीं, जाणिलेला नाहीं, त्याच्या सहव्यतेचा मार्ग ' हाच नीट, सरळ .... देणारा आहे,' असें म्हणून दाखवूं शकतील ही गोष्टच संभवत नाहीं. '

२१ ' ज्याप्रमाणें, वासेट्ठा, एखाद्या मनुष्यानें चौकांत प्रासादावर चढण्याकरितां जिना तयार करावा. त्याला एखाद्यानें विचारावें कीं, ' हे पुरुषा, ज्या प्रासादावर चढण्याकरितां तूं जिना तयार करीत आहेस तो प्रासाद पूर्व दिशेस आहे, कीं दक्षिण दिशेस आहे, कीं पश्चिम दिशेस आहे, कीं उत्तर दिशेस आहे, उंच आहे कीं लहान आहे कीं मध्यम आहे, हें तुला माहीत आहे काय ? ' असें त्याला विचारिलें असतां त्यानें नाहीं म्हणून म्हणावें. त्याला पुन्हां विचारावें कीं, ' हे पुरुषा, जो प्रासाद तुला माहीत नाहीं, जो तूं पाहिलेला नाहींस, त्यावर चढण्याकरितां तूं हा जिना तयार करीत आहेस? ' असें त्याला विचारिलें असतां त्यानें होय म्हणून म्हणावें. तर तुला काय वाटतें, वासेट्ठा ? या ठिकाणीं त्याचें हें बोलणें मूर्खपणाचें होणार नाहीं काय ?'

' होय, गौतम, खरोखरीच मूर्खपणाचें होईल ! '

२२–२३ ' याप्रमाणें, वासेट्ठा, ...[ =२० ]... हा गोष्टच संभवत नाहीं.

२४ ' ज्याप्रमाणें, वासेट्ठा, ही अचिरवती नदी उदकानें कांठोकांठ तुडुंब भरलेली असावी आणि एखादा मनुष्य पलीकडे जाण्याच्या इच्छेनें तेथें येऊन त्यानें अलीकडील तीरावर उभें राहून पलीकडील तीराला हाक मारावी कीं, ' ए पलीकडील तीरा, इकडे ये, इकडे ये. ' तर तुला काय वाटतें, वासेट्ठा, त्याच्या त्या हाकेमुळें, याचनेमुळें, प्रार्थनेमुळें व स्तुतीमुळें अचिरवती नदीचा पलीकडील तीर अलीकडील तीराकडे येईल काय ? '

' नाहीं, गौतम. '

२५ ' याचप्रमाणें, वासेट्ठा, त्रैविद्य ब्राह्मण जे धर्म ब्राह्मण्य देतात ते धर्म टाकून देऊन जे धर्म अब्राह्मण्य देतात त्या धर्मांचा स्वीकार करितात व म्हणतात कीं, ' इंद्राला आम्ही बोलावितों, सोमाला आम्हीं बोलावितों, वरुणाला आम्ही बोलावितों, ईशानाला आम्ही बोलावितों, प्रजापतीला आम्ही बोलावितों, ब्रह्म्याला आम्ही बोलावितों, महिद्धीला आम्ही बोलावितों, यमाला आम्ही बोलावितों. ' वासेट्ठा, हे त्रैविद्य ब्राह्मण जे धर्म ब्राह्मण्य देतात ते धर्म टाकून देऊन जे धर्म अब्राह्मण्य देतात त्या धर्मांचा स्वीकार करितात, तेव्हां ते त्यांच्या या हाकेमुळें मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर ब्रह्म्याशीं जाऊन मिळतील ही गोष्टच होणें शक्य नाहीं.

२६ 'ज्याप्रमाणें, वासेट्ठा, ही अचिरवती नदी उदकानें कांठोकांठ तुडुंब भरलेली असावी, आणि एखादा मनुष्य पलीकडे जाण्याच्या इच्छेनें तेथें यावा व जाड साखळीनें त्याचे हात पाठीमागें घट्ट बांधिलेले असावे. तर तुला काय वाटतें, वासेट्ठा ? तो पुरुष अचिरवती नदीच्या अलीकडील तीरावरून पलीकडील तीरास जाईल काय ? '

' नाहीं, गौतम. '

---

१ ' समतित्तिका काकपेय्या. ' म्हणजे कांठोकांठ पाण्यानें भरली असल्यामुळें तीरावर बसून एखाद्या कावळ्याला सुद्धां पाणी पितां येईल अशी. पाणिनी २·१·३३ पहा.

२७ ' याचप्रमाणें, वासेट्ठा, आर्यांच्या शासनामध्यें पंच कामगुणांस साखळदंड अथवा बंधन असें म्हणतात. ते पांच कोणते? इष्ट, कान्त, आवडते, प्रियरूप, कामयुक्त व आनंद देणारे असे डोळ्यांस दिसणारे पदार्थ, कानांस ऐकूं येणारे शब्द, नाकास कळणारे गन्ध, जिव्हेनें चाखतां येणारे रस व शरीरास स्पर्श करणारे पदार्थ. या पंच कामगुणांस आर्यांच्या शासनामध्यें साखळदंड अथवा बंधन असें म्हणतात. वासेट्ठा, या पंच कामगुणांमध्यें त्रैविद्य ब्राह्मण अडकले आहेत, मोहित झाले आहेत, सांपडले आहेत. त्यांतील दोष त्यांस कळत नाहींत. त्यांतून सुटावें कसें हें त्यांस कळत नाहीं. अशा रितीनें ते त्यांचा उपभोग घेत असतात.

२८ ' वासेट्ठा, जे त्रैविद्य ब्राह्मण ब्राह्मण्य देणारे धर्म टाकून देऊन अब्राह्मण्य देणाऱ्या धर्मांचा स्वीकार करितात, ते या पंच कामगुणांमध्यें अडकतात......उपभोग घेत असतात, कामबंधनांत बद्ध होतात, ते मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर ब्रह्मचाशीं जाऊन मिळतील ही गोष्टच संभवत नाहीं.

२९ ' ज्याप्रमाणें, वासेट्ठा, ही आचिरवती नदी उदकानें कांठोकांठ तुडुंब भरलेली असावी, आणि एखादा मनुष्य पलीकडे जाण्याच्या इच्छेनें तेथें यावा व त्यानें अलीकडील तीरावर डोक्यावरून पांघरूण घेऊन निजून रहावें. तर तुला काय वाटतें, वासेट्ठा? तो पुरुष अलीकडील तीरावरून पलीकडील तीरास जाईल काय? '

' नाहीं, गौतम. '

३० ' याचप्रमाणें, वासेट्ठा, आर्यांच्या शासनामध्यें पंच नीवरणांस आवरणें किंवा नीवरणें किंवा अडथळे किंवा जाळीं म्हणतात. तीं पांच कोणतीं ? कामच्छंद, व्यापाद, थीनमिद्ध, उद्धच्चकुक्कुच्च व विचिकिच्छा. या पंच नीवरणांनां आवरणें किंवा नीवरणें किंवा अडथळे किंवा जाळीं म्हणतात. या पंच नीवरणांनीं त्रैविद्य ब्राह्मण आच्छादिलेले, अटक-

---

१ विषयवासना, द्वेष, आळस, अस्वस्थता व शंका हीं पांच नीवरणें आहेत. यांचा नाश केल्याशिवाय कोणतेंही कार्य नीट करतां येणें शक्य नाहीं. पृष्ठ ७०–७१ पहा.

विलेले, थांबविलेले, बांधलेलें आहेत. वासेट्ठा, जे त्रैविद्य ब्राह्मण ब्राह्मण्य देणारे धर्म टाकून देऊन अब्राम्हण्य देणाऱ्या धर्माचा स्वीकार करितात, ते या पंच नीवरणांनीं आच्छादिले... बांधिले जातात. ते मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर ब्रह्मयाशीं जाऊन मिळतील ही गोष्टच संभवत नाहीं.

३१ ‘ तर तुला काय वाटतें, वासेट्ठा ? तूं वृद्ध व मोठे ब्राह्मण अथवा त्यांचे आचार्य अथवा आचार्यांचे आचार्य यांच्या तोंडून काय ऐकिलें आहेस ? ब्रह्मयाला परिग्रह[1] आहे कीं नाहीं ? ’

‘ नाहीं, गौतम. ’

‘ त्याचें चित्त वैरानें युक्त आहे कीं नाहीं ? ’

‘ नाहीं, गौतम. ’

‘ त्याचें चित्त द्वेषानें युक्त आहे कीं नाहीं ? ’

‘ नाहीं, गौतम. ’

‘ त्याचें चित्त मलिन आहे कीं शुद्ध आहे ? ’

‘ शुद्ध आहे, गौतम. ’

‘ तो स्वतंत्र आहे कीं परतंत्र आहे ? ’

‘ स्वतंत्र आहे, गौतम. ’

३२ ‘ तर तुला काय वाटतें, वासेट्ठा ? त्रैविद्य ब्राह्मणांना परिग्रह आहे कीं नाहीं ? ’

‘ आहे, गौतम. ’

‘ त्यांचें चित्त वैरानें युक्त आहे कीं नाहीं ? ’

‘ आहे, गौतम. ’

‘ त्यांचें चित्त द्वेषानें युक्त आहे कीं नाहीं ? ’

‘ आहे, गौतम. ’

‘ त्यांचें चित्त मलिन आहे कीं शुद्ध आहे ? ’

---

१ परिग्रह म्हणजे स्त्रिया एवढाच अर्थ बुद्धघोषाचार्यांनीं घेतला आहे. परंतु टीकाकार म्हणतो कीं पांचही कामगुण असा अर्थ घ्यावा.

'मलिन आहे, गौतम.'

'ते स्वतंत्र आहेत कीं परतंत्र आहेत?'

'परतंत्र आहेत, गौतम.'

३३ 'तेव्हां, वासेट्ठा, त्रैविद्य ब्राह्मणांनां परिग्रह आहे व ब्रह्मचाला नाहीं. तर मग सपरिग्रह अशा त्रैविद्य ब्राह्मणांचें अपरिग्रह अशा ब्रह्मचाशीं मीलन होईल काय?'

'नाहीं, गौतम.'

३४ 'ठीक, वासेट्ठा, सपरिग्रह त्रैविद्य ब्राह्मण मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर अपरिग्रह अशा ब्रह्मचाला जाऊन मिळतील ही गोष्टच संभवत नाहीं.

३५ 'वासेट्ठा, त्रैविद्य ब्राह्मणांचें चित्त वैरयुक्त, द्वेषयुक्त व मलिन झालेलें असून ते परतंत्र आहेत. पण ब्रह्मचाचें चित्त वैर व द्वेष यांपासून मुक्त व शुद्ध असून तो स्वतंत्र आहे. तेव्हां अशा स्थितींत त्रैविद्य ब्राह्मणांचें ब्रह्मचाशीं मीलन होईल काय?'

'नाहीं, गौतम.'

३६ 'ठीक, वासेट्ठा, ज्यांचें चित्त वैरयुक्त, द्वेषयुक्त व मलिन झालेलें असून जे परतंत्र आहेत असे त्रैविद्य ब्राह्मण मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर ज्याचें चित्त वैर व द्वेष यांपासून मुक्त व शुद्ध असून जो स्वतंत्र आहे अशा ब्रह्मचाला जाऊन मिळतील ही गोष्टच संभवत नाहीं. याप्रमाणें, वासेट्ठा, त्रैविद्य ब्राह्मण भरंवशानें स्वस्थ बसले असतां खालीं बुडत आहेत व बुडण्यामुळें विषाद पावत आहेत. परंतु त्यांनां आपण अधिक सुखकारक अशा प्रदेशांत जात आहों असेंच वाटतें. म्हणून या त्रैविद्य ब्राह्मणांच्या तीन विद्यांस अरण्य[1], विपिन, विनाश म्हणतात.'

३७ असें भगवान् बोलल्यावर वासेट्ठ त्यांस म्हणाला, 'गौतम, मीं असें ऐकिलें आहे कीं, आपणास ब्रह्मसहव्यतेचा मार्ग ठाऊक आहे.'

---

१ ईरिणं. अगामकं महाअरञ्ञं (बुद्धघोष). अरञ्ञानी (टीका).

‘ तर तुला काय वाटतें, वासेट्ठा, मनसाकट येथून जवळच आहे, दूर नाहींना ? ’

‘ होय, गौतम, मनसाकट येथून जवळच आहे, दूर नाहीं. ’

‘ तर तुला काय वाटतें, वासेट्ठा ? समज कीं एखादा पुरुष मनसाकटांतच जन्मलेला व वाढलेला आहे, आणि मनसाकटांतून नुकताच बाहेर पडलेल्या त्या पुरुषाला मनसाकटाचा मार्ग एखाद्यानें विचारावा. तर, वासेट्ठा, या मनसाकटांतच जन्मलेल्या व वाढलेल्या पुरुषास मनसाकटाचा मार्ग विचारिला असतां त्याला कांहीं शंका अथवा विचार[१] पडेल काय ? ’

‘ नाहीं, गौतम. ’

‘ तें कां ? ’

‘ गौतम, हा पुरुष मनसाकटांत जन्मलेला व वाढलेला आहे. तेव्हां त्याला मनसाकटाचे सर्व मार्ग पूर्णपणें माहीत आहेतच. ’

३८ ‘ वासेट्ठा, मनसाकटांत जन्मलेल्या व वाढलेल्या पुरुषास देखील मनसाकटाचा मार्ग विचारिला असतां शंका अथवा विचार पडेल. परंतु तथागताला ब्रह्मलोकाविषयीं अथवा ब्रह्मलोकच्या मार्गाविषयीं विचारिलें असतां त्यास मुळींच शंका अथवा विचार पडणार नाहीं.

‘ वासेट्ठा, मला ब्रह्मा, ब्रह्मलोक, ब्रह्मलोकचा मार्ग व काय केलें असतां ब्रह्मलोकांत उत्पन्न होतां येतें[२], हें सर्व माहीत आहे. ’

३९ असें भगवान् म्हणाल्यावर वासेट्ठ त्यांस म्हणाला, ‘ गौतम, मी असें ऐकिलें आहे कीं, आपणास ब्रह्मसहव्यतेचा मार्ग ठाऊक आहे. तर भगवंतानीं मला तो मार्ग सांगून ब्रह्मचाच्या प्रजेचें तारण[३] करावें. ’

‘ तर मग ऐक, वासेट्ठा, व नीट लक्षांत ठेव. मी सांगतों. ’

‘ ठीक आहे, ’ असें वासेट्ठानें भगवंतांस उत्तर दिलें.

---

१. दन्धायितत्तं वा वित्थायितत्तं वा. २. यथापटिपन्नो च ब्रह्मलोकं उप्पन्नो तं च पजानामि. र्‍हिस् डेव्हिड्स् याचा अर्थ ‘ब्रह्मलोकांत गेलेल्या, उत्पन्न झालेल्या माणसां प्रमाणें मला ब्रह्मलोक ( पूर्णपणें ) माहीत आहे असा घेतात. ३. उल्लुंपतु ब्रह्मणिं पजं. ब्राह्मणाची प्रजा जो मी त्या माझा अपायलोकापासून उद्धार करावा. (बुद्धघोष).

४०—७५ भगवान् म्हणाले, ‘ तथागत, अर्हत्, सम्यक्संबुद्ध [ वगैरे सामञ्ञफलसुत्त ४०-७५ याप्रमाणें ].’

७६ ‘ तो मैत्रीयुक्त अंतःकरणानें एक दिशा भरून टाकून राहतो, त्याचप्रमाणें दुसरी, तिसरी, चवथी दिशाही भरून टाकून राहतो. याप्रमाणें वर, खालीं, बाजूस, सर्व जागीं, सर्व जग मैत्रीयुक्त, विपुल, महद्गत, अप्रमाण, निर्वैर व द्वेषरहित अशा अंतःकरणानें भरून टाकून राहतो.

७७ ‘ ज्याप्रमाणें, वासेट्ठा, शंख वाजविणारा शक्तिमान् पुरुष सहज चारी दिशांनां आवाज पाठवितो, त्याप्रमाणें तो अशा रितीनें चिंतिलेल्या चित्तास स्वातंत्र्य देणाऱ्या, मैत्रीभावनेनें ज्यास ज्यास म्हणून प्रमाण आहे तें तें सर्व भरून टाकितो, त्यांत कांहींही शिल्लक अथवा अवशिष्ट उरत नाहीं. वासेट्ठा, हाच तो ब्रह्मसहव्यतेचा मार्ग होय.

७८ ‘ पुन्हा, वासेट्ठा, तो भिक्षु करुणायुक्त, मुदितायुक्त, व उपेक्षायुक्त अंतःकरणानें एक दिशा भरून टाकून राहतो, त्याचप्रमाणें दुसरी, तिसरी, चवथी दिशाही भरून टाकून राहतो. याप्रमाणें वर, खालीं, बाजूस, सर्व जागीं, सर्व जग करुणायुक्त, मुदितायुक्त व उपेक्षायुक्त, विपुल, महद्गत, अप्रमाण, निर्वैर व द्वेषरहित अशा अंतःकरणानें भरून टाकून राहतो.

७९ ‘ ज्याप्रमाणें, वासेट्ठा, शंख वाजविणारा शक्तिमान् पुरुष सहज चारी दिशांनां आवाज पाठवितो, त्याप्रमाणें तो अशा रितीनें चिंतिलेल्या, चित्तास स्वातंत्र्य देणाऱ्या, करुणा, मुदिता व उपेक्षा या भावनांनीं ज्यास ज्यास म्हणून प्रमाण आहे तें तें सर्व भरून टाकितो, त्यांत कांहींही शिल्लक अथवा अवशिष्ट उरत नाहीं. वासेट्ठा, हाच तो ब्रह्मसहव्यतेचा मार्ग होय.

८० ‘तर तुला काय वाटतें, वासेट्ठा ? अशा तऱ्हेनें विहार करणाऱ्या भिक्षूला परिग्रह असेल कीं नाहीं ? ’

‘ नाहीं, गौतम. ’

‘ त्याच्या चित्तांत वैर असेल कीं नाहीं ? ’

‘ नाहीं, गौतम. ’

---

१. सिंहली पुस्तकांतून ४०–९८ घ्यावयाचे असें दिलें आहे. परंतु विशुद्धिमार्ग परिच्छेद ९ यावरून असें स्पष्ट दिसतें कीं ब्रह्मविहारभावना ध्यानांच्या **नंतर** करावयाची नसून **ब्रह्मविहारांमध्येंच** निरनिराळीं ध्यानें परिपूर्ण करावयाचीं असतात.

‘ त्याच्या चित्तांत द्वेष असेल कीं नाहीं ? ’

‘ नाहीं, गौतम. ’

‘ त्याचें चित्त मलिन असेल कीं शुद्ध असेल ? ’

‘ शुद्ध असेल, गौतम. ’

‘ तो स्वतंत्र असेल कीं परतंत्र असेल ? ’

‘ स्वतंत्र असेल, गौतम. ’

८१ ‘ तेव्हां, वासेट्ठा, त्या भिक्षूला परिग्रह नाहीं, ब्रह्मचालाही परिग्रह नाहीं. मग अशा अपरिग्रह भिक्षूचें अपरिग्रह ब्रह्मचाशीं मीलन होईल कीं नाहीं ? ’

‘ होईल, गौतम. ’

‘ ठीक, वासेट्ठा, अपरिग्रह भिक्षूचें मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर अपरिग्रह ब्रह्मचाशीं मीलन होईल ही गोष्ट शक्य आहे. त्याचप्रमाणें वैर व द्वेष यांपासून ज्याचें चित्त मुक्त व शुद्ध आहे व जो स्वतंत्र आहे, अशा भिक्षूचें वैर व द्वेष यांपासून ज्याचें चित्त मुक्त व शुद्ध आहे व जो स्वतंत्र आहे अशा ब्रह्मचाशीं मीलन होईल कीं नाहीं ? ’

‘ होईल, गौतम. ’

‘ ठीक, वासेट्ठा, वैर व द्वेष यांपासून ज्याचें चित्त मुक्त व शुद्ध आहे व जो स्वतंत्र आहे अशा भिक्षूचें मरणानंतर शरीराचा भेद झाल्यावर वैर व द्वेष यांपासून ज्याचें चित्त मुक्त व शुद्ध आहे व जो स्वतंत्र आहे अशा ब्रह्मचाशीं मीलन होईल ही गोष्ट शक्य आहे. ’

८२ असें भगवान बोलल्यावर वासेट्ठ व भारद्वाज त्यांस म्हणाले, ‘ वाहवा, गौतम, वाहवा ! ज्याप्रमाणें, गौतम, एखाद्यानें उलटें झालेलें सुलटें ठेवावें अथवा झांकलेलें उघडें करावें, अथवा वाट चुकलेल्यास मार्ग सांगावा अथवा डोळस मनुष्यांनां वस्तु दिसाव्या म्हणून अंधारांत तेलाचा दिवा दाखवावा, त्याप्रमाणें आपण अनेक तऱ्हांनीं धर्माचा उपदेश केला आहे. तर आम्ही आपणास, धर्मास, व भिक्षुसंघास शरण जातों. शरण आलेल्या आम्हांस आजपासून मरेपर्यंत आपण उपासक समजावें. ’

तेविज्जसुत्त समाप्त.

---

## परिशिष्ट.

मागील सूत्रें व हें सूत्र यांमध्यें हा मोठा फरक आहे कीं, यांत अर्हत्त्वप्राप्ती-पर्यंत विषय नेऊन पोंचविला नाहीं; पंच नीवरणांचा त्याग केल्यानंतर ध्यानें, ज्ञानदर्शन, मनोमय काय, अभिज्ञा व अर्हत्त्वप्राप्ती असा मार्ग दाखविला नसून नीवरणांनंतर एकदम ब्रह्मविहारभावना सांगितली आहे. याचें कारण उघड आहे. पूर्वींच्या सूत्रांतील उपदेश साध्या लोकांकरितां होता. म्हणून तेथें त्यांकरितां अर्हत्त्वप्राप्ती हें उद्दिष्ट दाखवून दिलें होतें, पण येथें प्रश्न मुळां-तच ब्रह्मसहव्यता असा आहे, म्हणून ब्रह्मयाशीं मीलन ज्या मार्गानें करून घेतां येईल तेवढाच मार्ग येथें दाखविला आहे.

ब्रह्मसहव्यता हें त्रैविद्य ब्राह्मणांचें उद्दिष्ट होतें. तें प्राप्त करून घेण्याचा खरा मार्ग कोणता याविषयीं वाद उपस्थित झाला असतां बुद्धांनीं असें दाखवून दिलें कीं, हल्लीं ब्राह्मण ज्या तऱ्हेनें वागतात त्या तऱ्हेनें चाललें असतां ब्रह्मसह-व्यता प्राप्त होणें अशक्यच आहे. ब्रह्मा कसा आहे, त्याचे गुण काय आहेत, तो असतो कोठें, वगैरे कांहींही या ब्राह्मणांनीं पाहिलें नाहीं, त्यांच्या गुरूंनींही पाहिलें नाहीं व पूर्वींच्या ऋषींनींही पाहिलें नाहीं. मग त्याजकडे जाण्याचा योग्य मार्ग त्यांस कसा सांपडणार? शिवाय चंद्रसूर्य हे त्यांना दिसत असूनही त्यांच्या सहव्यतेचा मार्ग जर त्यांस ठाऊक नाहीं, तर जो माहीत नाहीं अशा ब्रह्म्याच्या सहव्यतेच्या मार्गाची तरी काय कल्पना असणार? ज्याप्रमाणें एखाद्यानें माहीत नसलेल्या प्रासादावर चढण्याकरितां जिना बांधूं लागावें, त्याप्रमाणेंच ही गोष्ट आहे.

बरें ब्रह्म्याकडे पहावें तर तो अपरिग्रह, वैररहित, द्वेषरहित, शुद्धचित्त व स्वतंत्र आहे, आणि हे ब्राह्मण पाहिले तर परिग्रहयुक्त, वैरयुक्त, द्वेषयुक्त, मलि-नचित्त व परतंत्र असून शिवाय पंच कामगुणांनीं जखडून टाकिलेले व पंच नीवरणांत गुरफटलेले आहेत. तेव्हां अशा असमान गोष्टींचें मीलन कसें होऊं शकणार? मग ब्रह्मसहव्यतेचा खरा मार्ग कोणता? तर मैत्री, करुणा, मुदिता व उपेक्षा या चार ब्रह्मविहारांची भावना करणें हा होय. त्यांचे योगानें मनुष्य अपरिग्रह, वैररहित, द्वेषरहित, शुद्धचित्त व स्वतंत्र होतो व समानगुण अशा ब्रह्म्याशीं मीलन पावतो. हाच ब्रह्मसहव्यतेचा खरा मार्ग होय.

---

१. Oldenberg. Buddha p. 59 व कोसंबी, बुद्ध, धर्म आणि संघ. पृ. १९ पहा.

२. महाराष्ट्रीयांमध्यें या सूत्रासंबंधीं अशी एक चुकीची समजूत झाली आहे कीं, बुद्धानें या ठिकाणीं ब्राह्मणांचें जें ब्रह्म म्हणून आहे त्याची थट्टा उडविली आहे, आणि

[पुढें चालू

## शील, समाधि आणि प्रज्ञा.

शीलस्कंधाच्या तेराही सूत्रांत येणारे जे भाग आहेत, त्यांचें वर्गीकरण प्रत्येक ठिकाणीं वेगवेगळ्या प्रकारानें केलेलें आहे. त्यावरून श्रामण्याच्या मार्गाची अधिक स्पष्ट कल्पना येण्यासारखी आहे, म्हणून त्याविषयीं येथें थोडासा विचार केलेला आहे. त्यांतील मुख्य भाग कलमवार पुढीलप्रमाणें आहेत.

१ तथागत उत्पन्न होऊन एखाद्या गृहस्थानें त्याचा उपदेश घेणें ( दीघ. २. ४०-४२ ). २ शीलें ( ४३-६२ ). ३ निर्भयता ( ६३ ) ४ इंद्रियसंवर ( ६४ ). ५ स्मृती व जागृती (६५). ६ संतुष्टी ( ६६ ) ७ पंच नीवरणांचा त्याग करणें ( ६७-७४ ). ८ चार ध्यानांची भावना ( ७५-८२ ). ९ ज्ञानदर्शन ( ८३-८४ ) १० मनोमय काय (८५-८६). ११ सहा अभिज्ञा व अर्हत्त्वप्राप्ती ( ८७-९८ ).

यांची वांटणी निरनिराळ्या सूत्रांत पुढीलप्रमाणें केली आहे.

| | |
|---|---|
| १ ब्रह्मजाल. | येथें फक्त २ शीलेंच तेवढीं आलीं आहेत. |
| २ सामञ्ञफल. | येथें त्यांमध्यें कांहींही वर्गीकरण केलेलें नाहीं. |
| ३ अंबट्ठ. | १,२ हें शील व ३-८ हें चरण. दोन्हीही मिळून चरणच समजावयाचें. ९-११ ही विद्या. |
| ४ सोणदण्ड. | १,२ हें शील व ८-११ ही प्रज्ञा. |
| ५ कूटदन्त. | वर्गीकरण नाहीं. |
| ६ महालि. | ” |
| ७ जालिय. | ” |
| ८ कस्सपसीहनाद. | १-३ ही शीलसंपदा, ४-८ ही चित्तसंपदा व ९-११ ही प्रज्ञासंपदा. |

---

त्यामुळें संतापून जाऊन ते विचारितात कीं, 'आमचें ब्रह्म म्हणजे वैतृष्ण्य आणि बुद्धाचें निर्वाणही रागद्वेषमोहक्षय उर्फ वैतृष्ण्यच असतां त्यानें उगाचच्या उगाच निष्कळ आकसानें ब्राह्मणांवर प्रहार करण्याकारितां हीं अशा तऱ्हेचीं विधानें करावीं हें योग्य आहे काय !' ( उदाहरणार्थ प्रो. शिवराम महादेव परांजपे यांचा चित्रमयजगत् वर्ष ५ अंक १२ ( १९१४ पृ. ५४१ ) येथील ' धर्मप्रसाराच्या पद्धतीचा बौद्धधर्मातील एक नमुना ' हा लेख पहा.) परंतु ही समजूत मुळांतच चुकीची आहे. बुद्धाच्या थट्टेचा विषय ब्रह्मही नाहीं व ब्रह्माही नाहीं, तर रागद्वेषलोभयुक्त असतां आम्ही ब्रह्मसहव्यतेचा मार्ग सांगतों अशी बढाई मारणारे ब्राह्मण होत

| | |
|---|---|
| ९ पोट्ठपाद. | वर्गीकरण नाहीं. |
| १० सुभ. | १-३ शीलस्कंध, ४-८ समाधिस्कंध व ९-११ प्रज्ञास्कंध. |
| ११ केवट्ट. | वर्गीकरण नाहीं. |
| १२ लोहिच्च. | " |
| १३ तेविज्ज. | १-७ व तदनंतर ब्रह्मविहारभावना. |

यावरून असें दिसून येईल कीं, तेरापैकीं आठ सुत्तांत मुळींच वर्गीकरण केलेलें नाहीं. बाकीच्या पांचांमध्यें अंबट्ठसुत्तांत विद्या व चरण असे दोनच भेद आहेत, सोणदण्डसुत्तांत शील व प्रज्ञा असे दोन भाग आहेत, व तेविज्ज-सुत्तांत तर सबंध भाग नाहींच. उरलेल्या दोन सुत्तांमध्यें ( कस्सपसीहनाद व सुभ ) शील, समाधि व प्रज्ञा असें त्रिविध वर्गीकरण केलेलें आहे.

[ या टीपा पृ. १३५ येथें यावयास पाहिजे होत्या. परंतु चुकीनें तेथें घालावयाच्या राहून गेल्यामुळें येथें दिल्या आहेत. ]

## भावाबहिणींचे विवाह.

ही विलक्षण चाल प्राचीनकाळीं अस्तित्वांत असावी असें दिसतें. संस्कृत वाङ्मयामध्यें या चालीचें उदाहरण कोठेंही आढळत नाहीं. ऋग्वेद १०.१० येथील यम आणि यमी यांच्या संवादांत तर या चालीचा पूर्णपणें निषेध केलेला आढळतो. ( पापं आहुः यः स्वसारं निगच्छात् ). परंतु मूळ पारशी लोकांत ही चाल सुरू होती याविषयीं शंका नाहीं. तीस Khvetuk-das ( Xvaêtvadatha, Pahlavi Xvêtôkdas, next-of-kin marriage ) असें नांव होतें. अगदीं जुन्या आवेस्ताग्रथांत या चालीचा उल्लेख सांपडत नाहीं. फक्त वेंदिदाद ८-३६ येथें पुरुष व स्त्रिया दोघांनींही या चालीचा अवलंब करावा असें म्हटलें आहे. त्यावरून पारशी धर्मात आरंभीं ही चाल नसावी असें दिसतें. पह्लविग्रंथांतून तिचा जागोजागीं निर्देश केलेला आढळतो. त्यावरून त्या काळीं ही चाल जोरांत सुरू होती असें दिसतें; परंतु पुढें ती नाहिशी होऊन चुलत अथवा मामे—भावाबहिणींचीं लग्नें करण्याची चाल पडली व ती अजूनही चालू आहे.

---

१ पण ऋग्वेद १.७१.५; १०. ६१.५–७ पहा. २. The attempt to clear Yama of the guilt of incest shows that the belief in that incest already existed.' Macdonell Vedic Mythology p. 173. ३. ऐतरेय ब्राह्मण ७.१३.९ पहा. ' Für den Menschen ist das Entsprechende als Blutschande verboten. ' Windisch. Buddha's Geburt p. 61 n. 2.

या सुत्तांत अशा विवाहांचें कारण कुलाची शुद्धता नाहिंशी होऊं नये अशी इच्छा होय असें सांगण्यांत आलें आहे. पारशांच्या धर्मग्रंथांतून अशा संबंधांचीं दोन कारणें दिलीं आहेत. त्यांपैकी पहिलें अन्यकुलाविषयीं जिला कांहीं कर्तव्यें राहणार नाहींत अशा संततीची आवश्यकता हें होय. त्यामुळें पितरांचे संस्कार अविच्छिन्न चालूं राहतात. दुसरें कारण असें कीं दुसऱ्या कुलांशीं विवाहसंबंध झाले असतां कदाचित् तीं कुलें हलकीं अथवा नास्तिक असल्यास धार्मिक शुद्धता नाहिंशी होण्याची भिती असे.

इतर लोकांमध्यें सुद्धां असे विवाह आढळून येतात. ग्रीक व रोमन पुराणकथांमध्यें अशीं अनेक उदाहरणें आहेत. इजिप्तमधील फाराओ ( Pharaoh ) व टॉलेमी ( Ptolemy ) या राजघराण्यांत तर अव्याहत ही चाल सुरू होती. बायबलामध्येंही यासंबंधीं उल्लेख सांपडतात. Lev. XVIII 6–16 येथें असे विवाह होऊं नयेत यासाठीं कायदे दिले आहेत, त्यावरून तसे विवाह त्यापूर्वी होत असत हें स्पष्टच आहे. नाहींतर कायद्यांचा काय जरूर ? Gen xix 30–38 येथें लोटच्या मुलींना त्याजपासून मुलगे झाल्याची कथा आहे. तसेंच Deut. xxv. 5–10 येथें आपल्या भावाच्या निपुत्रिक बायकोशी लग्न लाविण्यासंबंधीं कायद्याचा उल्लेख आहे[१].

---

## सनत्कुमार ब्रह्मा.

सनत्कुमार हा हिंदुधर्मांत ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांपैकीं एक मानिला आहे. कोणी तो व स्कंद एकच असें मानितात. तो योगशास्त्राचा प्रवर्तक होता अशीही समजूत आहे[२]. बौद्धधर्मांत तो इतर ब्रह्म्यांप्रमाणेंच एक मानिला

---

१. E. W. West. Pahlavi Texts ( S. B. E. XVIII ). pp 389-430 Frazer. Totemism and Exogamy ii. 40, 118, 23, 538, 541; iii 118, 362, 541, 575, 579; iv. 307, 315 पहा.

The case in which we have the most definite evidence for this form of marriage is that of royal families. Examples of the marriage of brother and sister are known from history in the royal families of Egypt and Persia and occurred also among the Incas of Peru. In recent time the marriage of brother and sister is, or has been, the custom in Siam, Burma, Ceylon, Uganda and the Hawa'i Islands. In the last case the highest kind of chief was one whose father and mother were own brother and sister, who were themselves the offspring of a similar union. In this case certainly, and probably in the others, this form of marriage is definitely forbidden to those of other than royal or chiefly rank, and the practice is due to the belief in the virtue of royal blood and the desire to keep the blood as pure as possible. ERE. viii. 425.

२. महाभारत २·११·२३ ( सनत्कुमारो भगवान्योगाचार्यो महातपः). १३·३८ ( योगवित्तमः ).

आहे. त्याच्या तोंडची ही गाथा आपल्या म्हणण्याचें समर्थन करण्याकरितां बुद्धांनीं पुष्कळदां पुढें आणिली आहे.

ही गाथा संस्कृतवाङ्मयांत अद्यापपर्यंत सांपडलेली नाहीं. परंतु ती भगवंतांची स्वतःची असून त्यांनीं ती सनत्कुमाराच्या नांवावर दडपिली असें म्हणतां यावयाचें नाहीं. क्षत्रिय श्रेष्ठ आहेत हें दाखविण्यास त्यास संस्कृत वाङ्मयांत पुष्कळ वाक्यें सांपडलीं असतीं. शिवाय ही गाथा खोटी असती तर भगवंतांचें हें धाष्टर्य ताबडतोब उघडकीस येण्यासारखें होतें. कदाचित् Chalmers ( J. R. A. S. 1894 p 345) म्हणतात त्याप्रमाणें ब्राह्मणांचें वर्चस्व स्थापित झाल्यावर साहजिकच ही गाथा त्यांच्या ग्रंथांतून गाळिली गेली असेल. कदाचित् Buhler च्या (J. R. A.S. 1897 p. 587)मताप्रमाणें ही गाथा बुद्धांनीं सनत्कुमाराच्या म्हणण्याचा गोषवारा म्हणून स्वतः रचिली असावी. गाथेच्या दुसऱ्या ओळीवरून हेंच अनुमान अधिक योग्य वाटतें.

महाभारत ३. १८८ येथें अशी कथा दिली आहे कीं अत्रि ऋषी एकदां वैन्यराजानें करविलेल्या अश्वमेधांत हजर असतां त्यानें राजाची अतोनात स्तुती केली. त्यावरून गौतम ऋषीस अत्यंत चीड येऊन त्यानें अत्रीची निर्भर्त्सना केली. तेव्हां दोघांचें भांडण जुंपून तें इतर ऋषींच्यापर्यंत जाऊन पोहोंचलें व त्यांनीं या गोष्टीचा निवाडा करून घेण्यासाठीं सनत्कुमारास बोलाविलें. सनत्कुमारानें असा निकाल दिला कीं ब्रह्म आणि क्षत्र हे एकत्र झाले असतां सर्व शत्रूंचा संहार करूं शकतील, आणि एकंदरीनें अधर्मापासून रक्षण व्हावें म्हणून क्षत्रियास ऋषींनीं बल दिलें. अतएव राजा हाच श्रेष्ठ होय[3].

---

१मज्झिम५३ यावरील बुद्धघोषाचार्यांची अट्ठकथा. 'सनंकुमारेनाऽति पोराणककुमारेन । चिरकालतो पट्ठाय कुमारोऽति पञ्ञातो । सो किर मनुस्सपथे पंचचूळककुमारकाले झानं निब्बत्तेत्वा अपरिहीनज्झानो ब्रह्मलोके निब्बत्ति । तस्स सो अत्तभावो पियो अहोसि मनापो। तस्मा तादिसेनऽव अत्तभावेन चरति। तेन तं संनकुमारोऽति संजानन्ति.' बुद्धचरित २. २७ येथें बुद्ध व सनत्कुमार यांचें साम्य दर्शविलें आहे.

२ दीघ २७.३२, मज्झिम ५३, संयुत्त ६.२.१ व २१.११.५.१, अंगुत्तर ११.११ Buhler( J. R. A. S. 1894 p. 587 ) तिचें भाषांतर पुढीलप्रमाणें करितात. The Kshatriya is best among those men who record their Gotras; endowed with learning and virtue, he is best among gods and men.

३ राजा वै प्रथितो धर्मः प्रजानां पतिरेव च । स एव शक्रः शुक्रश्च स धाता स बृहस्पतिः ॥ २७॥...... अधर्मादृषयो भीता बलं क्षत्रे समादधन् । तस्माद्धि ब्रह्मणा क्षत्रं क्षत्रेणं ब्रह्म चाव्ययम् ॥ ३० ॥ आदित्यो दिवि देवेषु तमो नुदति तेजसा। तथैव नृपतिर्भूमावधर्मान्नुदते भृशम् ॥ ३१ ॥ ततो राज्ञः प्रधानत्वं शास्त्रप्रामाण्यदर्शनात् । उत्तरः सिध्यते पक्षो येन राजेति भाषितम् ॥ ३२॥

यास श्रुति व स्मृति यांमधून आधार सांपडतात. काठकसंहितेंत ( २८.५ ) क्षत्रिय ब्राह्मणापेक्षां श्रेष्ठ आहे असें म्हटलें आहे. शतपथब्राह्मणांत ( ५·४·४·५ ) राजा हाच धर्माचा उद्धर्ता आहे असें सांगितलें आहे. छांदोग्यउपनिषदावरून ( १·८·१;५·३ इत्यादि ) विर्येतही क्षत्रिय श्रेष्ठ असत असें दिसतें. बृहदारण्यकउपनिषदांत ( १·४·२३ ) तर क्षत्रियापेक्षां श्रेष्ठ कोणीही नाहीं ( क्षत्रात्परं नास्ति ) असें म्हटलें आहे. गौतमप्रणीत धर्मसूत्रांतही ( ८.१ ) वेदाध्ययन केलेले क्षत्रिय व ब्राह्मण हेच धर्माचे आधार आहेत असें वचन आढळतें. बौद्धग्रंथांतून तर जागोजागीं क्षत्रियांचीच थोरवी वर्णिली आहे[3].

यावरून असें दिसतें कीं या गाथेसारखी एखादी गाथा महाभारत हल्लींच्या स्थितींत ज्यांनीं आणून ठेविलें त्यांस व ज्यांनीं त्रिपिटकांतील सूत्रें रचिलीं त्यांस माहित असावी व त्या गाथेवरूनच अथवा मूळ प्रसंगावरूनच महाभारत व त्रिपिटक यांमधील हे भाग रचिले गेले असावेत.

१. Muir, Original Sanskrit Texts. i. 431 पहा.

२. परंतु तेथेंही ब्राह्मण हे क्षत्रियांची योनी आहे असें म्हटलेंच आहे!

३. मिलिंद ४.३.१ ( S. B. E. XXXV 229 note) पहा.

